






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य पत्रिका



# महाराष्ट्र
# साहित्य पत्रिका

अंक क्र. ३०१
एप्रिल-मे-जून २००२

## मराठी साहित्याची
## एकविसाव्या शतकातील
## आशास्थाने

अनुक्रमणिका



## ज्येष्ठ कवयित्री शांता शेळके यांचे दु:खद निधन

गुरूवार दि. ६ जून २००२ रोजी रात्री नऊ वाजता शांताबाईंचे निधन झाले आणि म. सा. परिषदेचा एक आधारवड कोसळला.

शांताबाईंच्या मनात पुण्याला एक खास असे भावनिक स्थान होते. व्यवसायाच्या निमित्ताने त्यांना दीर्घ काल मुंबईत काढावा लागला. पण त्या मनाने कधी मुंबईकर झाल्या नाहीत; पुणेकरच राहिल्या.

पुणे जिल्ह्यातील इंदापूर येथे त्या १९२३ साली जन्मल्या. आजच्या राजगुरुनगर आणि मंचर येथे त्यांचे बालपण गेले. पुढे पुण्याच्या हुजुरपागा आणि स. प. महाविद्यालयातून त्यांनी शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुरे केले. बी. ए. आणि एम्. ए. या दोन्ही परीक्षांत त्यांनी अव्वल दर्जाचे यश संपादन केले. श्री. म. माटे किंवा डॉ. के. ना. वाटवे यांच्या त्या प्रत्यक्ष शिष्या होत्या; तर प्रा. रा. श्री. जोग यांच्या अप्रत्यक्ष शिष्या होत्या. या लोकोत्तर शिक्षकांमुळेच बहुजनसमाजातून आलेल्या शांताबाईंना संस्कृत व मराठी या भाषांची आणि त्यातील साहित्याची गोडी लागली. आणि एकूण साहित्याचाच त्यांनी जन्मभर व्यासंग केला.

एम्. ए.नंतर आचार्य अत्रे यांच्या 'नवयुग' साप्ताहिकात काम करण्यासाठी त्यांनी मुंबईस प्रयाण केले. पुढे रामनारायण रुईया आणि महर्षी दयानंद महाविद्यालयात प्राध्यापन केले. तिथे त्यांनी एक अव्वल दर्जाची शिक्षिका म्हणून मोठा लौकिक मिळविला.

शांताबाई कवयित्री म्हणूनच सर्व परिचित असल्या तरी त्यांनी चौफेर लेखन केलेले आहे. गीते, कथा, बालसाहित्य, समीक्षा, अनुवाद अशा अनेक क्षेत्रात त्यांनी यशस्वी संचार केलेला आहे. म्हणूनच १९९६ साली आळंदी येथे भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थान त्यांना बहाल केले गेले.

नवसाहित्याच्या ऐन भराच्या काळात त्यांनी लेखन केले. पण त्या लेखनाला खास स्वत:ला साज दिला. पिंडाने त्या सौंदर्यपूजकच होत्या. अतिशय साधे, सरळ आणि वाचकाच्या भावनाकंदाचा ठाव घेईल असे लेखन त्यांनी केले. तीव्र संवेदनक्षमतेबरोबरच त्यांना तीव्र स्मरणशक्तीची देणगी होती. त्यांच्या निधनाने माधव जूलियन किंवा यशवंत या कवींच्याही रचना आम्हापर्यंत सतत पोहोचविणारे एक स्मरण-भांडारच नाहीसे झाले आहे. शांताबाईंचे वक्तृत्वही त्यांच्या ऋजू व्यक्तिमत्त्वाला साजेसे अलवार होते. गद्य भाषणही संगीतासारखे मधुर असू शकते, याचा प्रत्यय त्यांची भाषणे देत असत.

म. सा. परिषदेवर त्यांचा मोठाच लोभ होता. म्हणून परिषदेचे सर्व कार्यकारी मंडळ त्यांच्या निधनाबद्दलचा तीव्र खेद व्यक्त करीत आहे. पुढच्या अंकात म. सा. पत्रिका यांच्या कार्याचे समालोचन करणारा स्वतंत्र लेख प्रसिद्ध करील.

— संपादक

*(छायाचित्र 'दै. लोकमत'चे संपादक श्री. अरविंद गोखले यांच्या सौजन्याने.)*

टिळक रस्ता पुणे ४११०३०.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र
# साहित्य पत्रिका

अंक ३०१

एप्रिल-मे-जून २००२



संपादक
प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४४७५९६३

# अनुक्रमणिका





**मुद्रक-प्रकाशक** : रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, पुणे ४११ ०३०.

**अक्षरजुळणी** : यशश्री एंटरप्रायझेस, २४, ईशदान सोसायटी, अभ्यंकर स्टीलजवळ, पौड फाटा, कोथरूड, पुणे ४११ ०२९. फोन : ५४६०६०२.

**मूल्य** : रुपये ३०/- **वार्षिक वर्गणी संस्थांसाठी :** रु. १००/-

**आजीव सदस्य शुल्क** : रुपये १०००/- **वार्षिक सदस्य शुल्क :** रु. १००/-

**अंक क्र. ३०१** : एप्रिल २००२ ते जून २००२

*(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेलच असे नाही.)*

# संपादकीय

'म. सा. पत्रिके'च्या वाचकांना आणि हितचिंतकांना संतोष वाटेल अशी बाब म्हणजे गेल्या ३०० क्रमांकाच्या अंकाच्या निमित्ताने 'पत्रिके'ने आपली पाऊणशे वर्षे सलगपणे पुरी केली आहेत. आणि या ३०१ क्रमांकाच्या अंकाने तिने शंभरीच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण अशा चतुष्पादात प्रवेश केलेला आहे. 'पत्रिके'ला आपण सर्वजण मिळून निरोगी व सकस असे दीर्घायुरोग्य चिंतू या.

या प्रसंगी माझ्यासारख्या (खरोखरच) सामान्य संपादकाला आधीचे संपादक आणि त्यांचे नेटके संपादन आठवून जाते. सर्वच संपादकांचा निर्देश अशक्य आणि काहींचाच उल्लेख वादग्रस्त होण्याची शंका, म्हणून त्या सर्वांना फक्त मन:पूर्वक दंडवत घालणे आज माझ्या हाती आहे. नामवंत लेखकही असलेल्या संपादकांच्या त्या परंपरेचे स्मरण ठेवून विनम्रपणे माझ्यासारखा आजचा संपादक या प्रसंगी त्या सर्व साहित्यिक-संपादकांना अभिवादन करतो आहे आणि त्यांनीच हाती दिलेला संपादनाचा वसा पेलण्याचे सामर्थ्य त्यांच्याकडेच मागतो आहे.

हा ३०१ क्रमांकाचा अंक उभा करताना काही विशिष्ट आराखडा बेतावा असे तीव्रतेने वाटले. तो कसा असावा याबद्दल काही पर्यायही अनेकांनी सुचविले. पण असे वाटले की, गेल्या पंचवीसेक वर्षात ज्यांनी उल्लेखनीय लेखन केलेले आहे आणि जे अजून प्रस्थापित झालेले नाहीत, अशा स्वत:च्या ताज्या दमाच्या लेखकांची लेखनाबद्दलची प्रतिक्रिया नोंदविणारा हा अंक असावा.

त्यासाठी अपेक्षांचा एक आराखडा तयार करून संपादन समिती आणि सल्लागार समितीची बैठक ३० मार्च २००२ रोजी घेतली. ५०-६० लेखक-लेखिकांच्या नावाचा खल झाला. त्यातून वीसेक नावे निवडण्यात आली. सर्वच साहित्य प्रकारांचा — अगदी समीक्षा वा वैचारिक लेखनाचाही त्यात विचार करण्यात आला. भिन्न साहित्यप्रवाहही लक्षात घेण्यात आले. सर्वांना पत्रे पाठविली गेली. दोन-तीन जण सोडून इतरांची होकाराची उत्तरेही आली. मिलींद बोकील आणि अतुल पेठे या कसदार लेखकांचा काही तात्त्विक कारणासाठी रास्त नकार होता. त्यांचीही समजूत घालून मान्यता मिळविली गेली. जे लेख हाती आले, ते या अंकात आहेतच. तारा किंवा विनंतीची पत्रे पाठवूनही काही नव-मान्यवरांना लेखन पाठविणे जमले नाही. ही खरे तर या उपक्रमाला लागलेली खोटच आहे. छायाचित्र आणि परिचय याही बाबतीत असाच अनुभव आला. पण शेवटी 'मराठी साहित्याची २१ व्या शतकातील आशास्थाने' असे उपनाम दिले गेलेल्या या उपक्रमात जे आमच्या झोळीत जमले ते आपल्यासमोर ठेवले आहे. आणि विश्वासपूर्वक असे सांगावेसे वाटते की, गुणदृष्ट्या ते नक्कीच लक्षणीय म्हणू असे आहे.

या गटाशिवाय अंकात डॉ. पुंडे यांच्याकडून दुर्गाबाई भागवत यांच्यावर खास लिहवून घेतलेला लेख आहे. वसुंधरा पटवर्धन आणि डॉ. के. रं. शिरवाडकर यांचेही दोन लेख आहेत. वसुंधराबाई आज ऐंशीच्या घरात असलेल्या, गेल्या दोन पिढ्या निवांतपणे अनुभवलेल्या ज्येष्ठ कथालेखिका. या लेखिकेने खूप पाहिले, अनुभवलेले आहे. त्यातही 'ना खंत ना खेद' अशी उदासीन वृत्तीही सहजपणे राखलेली आहे. पुरस्काराच्या निमित्ताने त्यांनी शरदबाबूंच्या कादंबऱ्यातील जीवनदर्शनाचे सामान्य रसिकांच्या भूमिकेवरून केलेले अवलोकन मनोज्ञ वाटले. म्हणून या अंकात मुद्दाम



अनुक्रमणिका







समाविष्ट केले आहे. तसेच 'ग्रामची' या मार्क्सवादी मीमांसकाचा 'हेजिमनी'चा सिद्धांत ही मराठीतील अलीकडच्या काळात जोरावलेल्या साहित्य-प्रवाहामागची सैद्धांतिक बैठक असल्याची प्रस्तुत संपादकाची धारणा आहे. गेले काही दिवस केलेल्या आग्रही विनंतीला डॉ. शिरवाडकर यांनी नेमका याचवेळी मान दिला. त्यांचाही भक्कम लेख या नवमान्यवरांच्या लेखांआधी देताना, म्हणून, आम्हाला दिशादर्शक असे काही दिल्यागत वाटत आहे. कारण बंडखोर म्हटले जाणारे आजच्या भिन्न प्रवाहांतील लेखक-लेखिका या प्राधान्याने संकेत-विरोधक असून वास्तव अशा खऱ्या आत्मानुभूतीच्या, म्हणजेच Counter hegemony च्या वाहक आहेत, असे म्हणता येईल. मार्क्सवादी समीक्षेतील एका महत्त्वाच्या सिद्धांताचा खल करणाऱ्या प्रस्तुत लेखामुळे या ३०१ क्रमांकाच्या अंकाचे वजन वाढले आहे, असे म्हणावेसे वाटते.

जरुरीपेक्षा जास्त लांबत असले तरी या संपादकीयाला एका शोककारक गोष्ट करायलाच हवी. गेल्या तीनेक महिन्यात अनेक साहित्य व कलाक्षेत्रातील मान्यवर दिवंगत झाले. त्यांची आवर्जून आठवण ठेवणे हे क्रमप्राप्त आहे. ज्येष्ठ क्रीडा पत्रकार सुहास आगाशे, ब्रिटिश कौन्सिलचे ग्रंथपाल डॉ. अहमद दळवी, हिंदी कवी आनंद बक्षी, 'अभिरुची'कार पु. आ. चित्रे, कादंबरीकार देवदत्त पाटील, चाळीसगावचे 'सोनाली'वाले डॉ. वा. ग. उर्फ काकासाहेब पूर्णपात्रे, आंबेडकर चळवळीचे अभ्यासक वसंत मून, आझाद हिंद सेनेचे संगीतकार कॅप्टन रामसिंह, कोळीगीतकार बालकराम वरळीकर, 'पाणी पंचायत'वाले विलास साळुंके, ज्ञानेश्वर विद्यापीठाचे मनोहर आपटे, संगीतकार राम किंकर, मधुकर पाठक, खिस्ती लेखिका विजया पुणेकर, द्रष्टा मानवतावादी हिंदी कवी कैफी आझमी, 'जयहिंद प्रकाशन'चे ग. का. रायकर, लीलाताई अदवंत अशी ही काही नावे आहेत. म. सा. परिषदेच्या दृष्टीने परिवारातील म्हणावी अशी तीन नावे म्हणजे 'तेजाची शलाका' दुर्गा भागवत, पंडितराव आवळीकर आणि अरविंद भुजबळ. अरविंद हा तर म. सा. परिषदेचा विद्यमान उत्साही कार्यवाह आणि कवी होता. तरुण वयातील त्याचे अपघाती निधन हा त्याच्या घराप्रमाणे परिषदेवरही आघात म्हटला पाहिजे. डॉ. आवळीकर हे 'पत्रिके'चे एक लेखक होते. या सर्वांच्या निधनाने परिषदेच्या कार्यकारी मंडळास अतिशय दुःख होत आहे. डॉ. जोगळेकरांनी या दोघांविषयी प्रस्तुत अंकात लिहिले आहे.

खास अंकाचे स्वरूप दिल्यामुळे प्रस्तुत अंकातील लेखांची संख्या वाढलेली आहे. त्यासाठी 'हा तो साहित्यकुसुमांचा आस्वादु' हे सदर देता आलेले नाही. त्याबद्दल वाचकांनी माफी करावी. कार्यालयीन वृत्त वगैरे इतर मजकूर नेहमीप्रमाणे दिलेला आहेच.

पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजातील नामवंत असे भूतपूर्व प्राध्यापक आणि म. सा. प. शी अनेकविध नात्यांनी निगडित अशी प्रा. दे. द. वाडेकर यांची यावर्षी जन्मशताब्दी साजरी होत आहे. तशीच श्रेष्ठ उद्योगपती शंतनुराव किर्लोस्कर यांचीही. त्यांना मनःपूर्वक अभिवादन ! या अंकाच्या तयारीचा परिषदेच्या कार्यालयीन कर्मचाऱ्यांपासून सर्वांवरच ताण आला आहे. त्यात अंक सिद्ध करून पेश करण्यापर्यंतचे टप्पे साध्य करणारे हितचिंतक, तंत्रज्ञ आलेच. त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार! अस्तु. इति लेखनसीमा. ❑

अरविंद वामन कुळकर्णी

१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११ ०३८. दूरध्वनी : ५४३६१२९.



अनुक्रमणिका

# दुर्गा भागवत : एक वाङ्मयीन घटना

❑

द. दि. पुंडे

❑

इंदूर येथे १० फेब्रुवारी १९१० रोजी जन्मलेल्या दुर्गा भागवत मुंबई येथे ७ मे २००२ रोजी मृत्यू पावल्या. दुर्गाबाईंचे ९२ वर्षांचे आयुष्य मराठीतल्याच नव्हे तर कोणत्याही भारतीय भाषेतल्या लेखकाला केवळ हेवा वाटावा असे लखलखीत होते. भारतात साहित्यिकाकडून वाचकाची, नागरिकाची, विचारवंताची, देशप्रेमीची आणि एकूण समाजाची जी जी अपेक्षा असते, ती ती परिपूर्ण करणाऱ्या एकमात्र भारतीय मनोवृत्तीच्या साहित्यिक म्हणून दुर्गा भागवतांचे सहज वर्णन करता येते. आणि म्हणूनच त्यांच्या साहित्याचा आस्वाद आणि समीक्षा साहित्यक्षेत्रातील प्रस्थापित अशा कोणत्याही एका किंवा अनेक निकषांवर करता येते. 'सत्यकथे'ने दूरवर पोहोचलेल्या ऐन कलावादाच्या काळातही दुर्गाबाई लेखन करीत होत्या आणि त्या कलावादाला ढळ पोहोचल्यावर ही संज्ञासंकल्पनाच दूर भिरकावली गेल्याच्या काळात, साहित्याची सामाजिक बांधिलकी, साहित्याची सामाजिक सामिलकी, साहित्याचे समाजशास्त्र इत्यादी तत्त्वे नि तंत्रे प्रभाव गाजविण्याच्या काळातही दुर्गाबाई लिहीतच होत्या. मराठी साहित्य प्रवाहाने एका पाठोपाठ एक असे दोन परस्परविरुद्ध वैचारिक प्रेरणांचे कालखंड पाहिले; पण या दोन्ही कालखंडात दुर्गाबाईंचे लेखन एकसंधपणे होत होते. या दोन्ही कालखंडांना ते विपरीत, विरोधी वा विसंवादी वाटलेले नव्हते. दुर्गाबाईंवर श्रद्धांजली लेख लिहिताना ग. प्र. प्रधान यांनी ''दुर्गाबाईंनी त्यांच्या विचारांची, जीवनाची दिशा कधी बदलली नाही'' असे जे निष्कर्षात्मक विधान केले आहे, त्याचे इंगित येथे कळावे. अस्सल लेखक हा अशा रीतीने युगप्रेरणांच्या पातळीपेक्षा चार अंगुळे वरच वावरत असतो. किंबहुना कालिक प्रेरणांच्या बंधात तो अडकत नाही, म्हणूनच तो अस्सल असतो.

दुर्गाबाईंसारखे लेखक कालिक प्रेरणांच्या मर्यादांच्या कक्षेत वावरू शकत नसतात; उलट ते स्वत:च एक नवा प्रेरणास्रोत बनून राहतात. उदाहरणार्थ, मराठी लघुनिबंधाचे ललितनिबंधात रूपांतर करण्याच्या प्रक्रियेत दुर्गाबाईंच्या ललितगद्याचा फार मोठा वाटा आहे. मराठी लघुनिबंधाच्या कृतक् आत्मचिंतनाला शह देणाऱ्या, ते पार नेस्तनाबूत करणाऱ्या वाङ्मयीन घटनांमध्ये दुर्गाबाईंचे लेखन हीही एक वाङ्मयीन घटना समाविष्ट आहेच आहे. याचे कारण दुर्गाबाई लघुनिबंध किंवा ललितगद्य यांसारखे लेखन करण्यास सरसावून बसल्या नव्हत्या किंवा सिद्ध झाल्या नव्हत्या. तर त्यांनी जे आत्मीय प्रेरणेने लिहिले, त्यातून ललितगद्य हा वाङ्मयबंध आपसूकच सिद्ध झाला. 'विशाखा'च्या प्रस्तानेत वि. स. खांडेकरांनी अशा प्रकारचे एक विधान केले आहे की, खरा कलावंत हा प्रचार करीत नसतो, तर तो प्रचार










त्याच्या कलाकृतींतून आपोआप होत असतो. इथेही ह्याच चालीवर आपणास असे म्हणता येईल की, खरे कलावंत नवनवीन वाङ्मयबंधांना जन्म देत नसतात, ते वाङ्मयबंध त्यांच्या लेखनांतून आपसूक जन्माला येत असतात. पन्नासोत्तरी दशकामध्ये इरावती कर्वे, दुर्गा भागवत, गो. वि. करंदीकर इत्यादींनी ज्या अंत:प्रेरणेने लेखन केले, त्यातून मराठीतल्या ललितनिबंधाचा जन्म झाला. ललितनिबंध हा प्रकार आकारास आणून स्थिर करण्यात दुर्गाबाईंचा खूप मोठा वाटा होता, एवढेच येथे म्हणायचे आहे.

कलात्म लेखन करायचे तर सामाजिक जाणिवेविषयी दुरात्मभाव बाळगलाच पाहिजे, अशी एक समजूत (किंवा गैरसमजूत) रूढ होऊ पाहण्याच्या काळात दुर्गाबाईंचे ललितलेखन पुढे आले. त्यांनी आपली सामाजिक जाणीव, आपल्याला गवसलेले समाजचिंतन अशा सशक्त कलात्म आकारांनिशी अभिव्यक्त केले की, या गैरसमजुतीला 'डूब' मिळाली आणि मराठी साहित्याच्या आविष्काराचा 'पैस' रुंदावला. 'देअर इज नो नीड ऑफ सोशल क्रिटिसिझम ऑफ लिटरेचर, ॲज लिटरेचर इज अ क्रिटिसिझम ऑन द प्रेझेंट डे सोसायटी', अशा तऱ्हेचे एक विधान मी एका चर्चेत (बहुधा प्रा. सीताराम रायकरांकडून) ऐकले होते. दुर्गा भागवतांचे समग्र लेखनच 'अ क्रिटिसिझम ऑन द प्रेझेंट डे सोसायटी' या स्वरूपाचे आहे; मग ते 'ऋतुचक्र' असो, 'व्यासपर्व' असो, 'गोधडी' असो की 'ऐसपैस गप्पा...' असो. मराठी व्यक्तिमत्त्वाची आणि त्याचवेळी अवघ्या मराठी समाजमनाची स्पंदने त्यांच्या सर्व प्रकारच्या लेखनातून जाणवत राहतात. यामुळेच दुर्गाबाईंचे कोणतेही लेखन समाजातील कोणत्याही एका विशिष्ट वर्गाला उद्देशून केलेले नाही (जसे आमच्या अनिल अवचटांचे असते. कारण अवचटांचे लेखनच सहेतुक असते. यात पुन्हा अवचटांना कमीपणा येण्याचा/देण्याचा प्रश्नच नाही. कारण त्यांचे लेखन "हेतुसुंदर'च आहे.). ते तमाम रसिकतेला, ते तमाम मराठी संवेदनशीलतेला उद्देशून केलेले आहे. (ते वेगळ्या अर्थाने वर्गजाणीवनिरपेक्ष आहे.)

म्हणूनच इतिहासदृष्ट्या पाहता दुर्गा भागवतांचे वाङ्मय आणि त्या वाङ्मयातून प्रगटणारी त्यांची जीवनजाणीव ही एक 'वाङ्मयीन घटना' (लिटररी इव्हेन्ट) ठरते. प्रत्येकच लेखक वाङ्मयप्रवाहात आपापल्या शक्तीनुसार, आपापल्या मगदुरानुसार भर घालीत असतो आणि त्यामुळे वाङ्मयप्रवाहात कमी-अधिक खळबळ होत असते, किमान एखादा दुसरा बुडबुडा तरी उठत असतो. पण काही लेखक व त्यांचे वाङ्मय अशा काही ताकदीचे असते की, ते वाङ्मयाचा प्रवाहच बदलवून टाकतात; केवळ वरवरचे बुडबुडे न उठविता ते प्रवाहाच्या आत थेट खोलवर अशा काही आंतरक्रिया घडवून आणतात, की आडावरच्या वाङ्मयप्रवाहाची गती आणि दिशाच बदलून जावी. अशा लेखकांना व त्यांच्या कृतींनाच 'वाङ्मयीन घटना' (लिटररी इव्हेन्ट) म्हणता येते. दुर्गा भागवत व त्यांचे समग्र साहित्य यांना मराठीच्या साहित्यप्रवाहातील 'वाङ्मयीन घटना' म्हणावे लागेल. कारण साहित्य म्हणजे काय आणि साहित्याचे प्रयोजन काय असावे, याबाबतच्या आपल्या समजुतींना दुर्गा भागवतांनी आणि त्यांच्या समग्र साहित्यव्यूहाने आरपार छेद दिलेला आहे.

दुर्गाबाई जे वाङ्मयीन व सामाजिक वाद खेळल्या त्यांकडेही याच दृष्टीने पाहता येईल.

त्यांमध्ये हिरीरीपेक्षा मूल्यात्मकता व नैतिकता अधिक होती. म्हणून त्या एखाद्या वादात जिंकल्या की हरल्या, पुढे गेल्या की हतप्रभ झाल्या हे मुळीच महत्त्वाचे ठरत नाही. याचे मुख्य कारण असे की, बहुतांश वाङ्मयीन वादांचे आणि सामाजिक वादांचे न्यायालयात लागतात, तसे अखेरचे निर्णय लागतच नसतात. दुर्गाबाईंसारख्यांना हे चांगलेच माहितीही असते. तरीही त्या वादाच्या खोल भोवऱ्यात का उतरतात? तर उत्तर असे आहे की, अशाने साहित्यक्षेत्राचे व एकूण समाजाचे रुधिराभिसरण नीट होत राहते; समाजाची स्पंदने अपेक्षित गतीने होत राहतात आणि मग मूल्यात्मक निकष सशक्त व मुख्य म्हणजे कार्यरत होण्यास अनुकूल वातावरण निर्माण होते. कराडच्या साहित्य संमेलनात अध्यक्ष या नात्याने दुर्गा भागवतांनी जी कामगिरी बजावली, तिचे महत्त्वमापन या दृष्टीने करता येईल.

त्यासाठी कराडच्या साहित्यसंमेलनाची पार्श्वभूमी व तेथील प्रत्यक्ष घटना जशी आठवते तशी, पण संक्षेपाने पाहू. भारतीय लोकशाहीवर सदैव लांच्छन म्हणून राहणारी आणीबाणी जाहीर झालेली होती. सर्व दिग्गज केवळ 'अवाक्' केले गेले होते. अशा वेळी उद्गार-स्वातंत्र्याची एक ठिणगी म्हणून दुर्गा भागवत उभ्या होत्या. त्याच एका प्राप्त कर्तव्यापायी जणू त्यांनी अध्यक्षपद स्वीकारले होते. संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते केंद्रीय मंत्रीपदी आरूढ असणारे राजकारणातले मुरब्बी मा. यशवंतराव चव्हाण. कित्येक हजार श्रोत्यांनी खच्चून भरलेला मंडप शांत वाटत होता. पण ती शांतता नव्हती, तणावाखाली दबलेली अस्वस्थता होती. दुर्गा भागवतांचे भाषण अगोदरच नियंत्रित (सेन्सार) झाले होते. तरी त्यात लेखकाच्या स्वातंत्र्याचा मुद्दा होताच. ''पारतंत्र्यापेक्षा स्वातंत्र्यात लेखकाची प्रतिष्ठा राहिली नाही'' येथपर्यंत दुर्गाबाई सरळ भाषण वाचत आल्या. ''वैचारिक क्षेत्रात, जनमानसांत लेखकाला अधिकारत्व वाटत नाही.'' असेही त्या म्हणाल्या आणि मग आपले छापील भाषण बाजूला सारून त्यांनी स्वत:ची नि स्वत्वाची छाप पाडणारे भाषण सुरू केले. त्यांनी निर्भयपणे जयप्रकाशजींचे नावही घेतले व आविष्कार-स्वातंत्र्याची स्वच्छ मागणीही केली. तत्काळ मांडपात पेरलेल्या शेकडो गुप्तचर पोलिसांनी श्रोत्यांच्या हातातल्या भाषणांच्या छापील प्रती गोळा करायला सुरुवात केली. सेन्सार झालेले भाषण एक व श्रोत्यांच्या हातात दुसरेच अशी त्यांना शंका आली आणि इकडे दुर्गाबाई भाषणात सांगत होत्या त्याचा आशय असा होता की, जेव्हा राष्ट्रीय आपत्ती येते, तेव्हा राष्ट्रातला सामान्यातला सामान्य माणूसही तेज धारण करतो. हा इतिहास राजकारण्यांनी आठवावा आणि मग दुर्गाबाई मा. यशवंतरावांच्या डोळ्याला डोळा देत म्हणाल्या, ''याच महाराष्ट्रातली एक सर्वसामान्य स्त्री एका थोर राजकारण्याला म्हणाली होती, ''बापू गोखल्या सांभाळ कासोटा। अरे, ताई तेलीण मारील सोटा.''

हा प्रसंग आठवेल तसा वर्णन करून सांगण्याचे कारण हेच की, दुर्गा भागवत यांनी आपले नाव आणि आडनावही सार्थ करीत त्या दिवशी 'पुरुषार्थ' गाजविला होता. दुर्गेचे रूप तर त्यांनी साक्षात् धारण केलेच होते, पण 'नाठाळाच्या पाठी पाठी' घालणाऱ्या भागवत संतांचे कार्य करणाऱ्या भूमिकेतही त्या गेल्या होत्या. महात्मा गांधींच्या विचारांचा आपल्यावर प्रभाव आहे, असे दुर्गाबाई नेहमी सांगत. तो प्रभावच कराडच्या संमेलनात साक्षात् झाला होता.

गांधीजींनी १९२७ किंवा १९३०च्या आसपास कधीतरी भारतीय स्त्रियांना 'निर्भय बना' ('बी फियरलेस') असा आदेश दिला होता. तो आदेश दुर्गाबाईंच्या 'आतल्या आवाजा'ने ऐकला होता आणि मुख्य म्हणजे जन्मभर प्रतिपाळला होता.

प्रश्न असा आहे की, कराडच्या साहित्य संमेलनात दुर्गा भागवतांनी ही निर्भयता का दाखविली? त्यांचा आणीबाणीला किंवा इंदिरा गांधींना विरोध होता म्हणून? (या प्रश्नाचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागेल. कारण केवळ आणीबाणीला किंवा केवळ एका हुकूमशहाला विरोध करणे हे दुर्गाबाईंच्या दृष्टीने फार मर्यादित किंवा संकुचित ध्येय ठरले असते.) राजनीतीवर अंकूश ठेवणे हे साहित्याचे कार्य आहे म्हणून? (याही प्रश्नाचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागेल. कारण साहित्याने राजनीतीवर अंकुश ठेवायचा म्हणजे एका प्रकारे साहित्याचे वर्चस्व किंवा हुकूमशाहीच मानणे झाले. हेही दुर्गाबाईंच्या विचारसणीत बसणारे नाही.) असे आणखीही मर्यादित परिघांचे प्रश्न उपस्थित करता येतील. पण तुम्हाला-आम्हाला ज्या दुर्गा भागवत माहिती आहेत, दुर्गा भागवतांची जी वैचारिक बैठक माहिती आहे ती जर येथे नीट आठवून पाहिली तर कराडच्या संमेलनात दुर्गा भागवतांनी नेमका कशाला विरोध केला, हे कळेल.

दुर्गा भागवत या बौद्ध साहित्याच्या अभ्यासक होत्या आणि त्या जयप्रकाश नारायण यांच्या अनुयायी होत्या. गौतम बुद्ध आणि जयप्रकाशजी या दोघांनाही एकच गोष्ट मान्य होती, ती म्हणजे दुःख, क्लेश, अन्याय आणि बंधन यांपासूनचे 'संपूर्ण स्वातंत्र्य.' राजनीती जितकी स्वायत्त आहे, तितकीच साहित्यही स्वायत्त आहे आणि म्हणूनच राजनीतीने साहित्यावर बंधने घालू नयेत, आविष्कार-स्वातंत्र्याची गळचेपी करू नये आणि अंकित ठेवू नये, अशी दुर्गाबाईंची सदासर्वकाळची भूमिका होती. बक्षीसे, पारितोषिके आणि पुरस्कार साहित्यिकांची स्वायत्तता धोक्यात आणतात, आणू शकतात, म्हणून आणीबाणीनंतरच्या काळात दुर्गा भागवतांनी शासकीय अशासकीय असे सर्वच संस्थांनी देऊ केलेले पुरस्कार नाकारले. महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या स्वायत्त साहित्यसंस्थेने १९८९ साली देऊ केलेला ग्रंथपुरस्कार नाकारण्यामागेही दुर्गा भागवतांचा लहरीपणा नव्हता तर त्यांची ही 'संपूर्ण स्वातंत्र्य' अबाधित राखण्याचीच भूमिका होती, हे आपण समजून घेतले पाहिजे.

दुर्गा भागवतांना श्रद्धांजली वाहताना त्यांच्या समग्र किंवा महत्त्वपूर्ण वाङ्मयकृतींचा ताळेबंद मांडत बसण्याची गरज नाही. दुर्गाबाईंसारख्या लेखकांनी काय लिहिले अन् किती लिहिले याची मोजमापे घेणे खरोखरीच महत्त्वाचे नसते, उलट त्यांनी का लिहिले आणि कसे लिहिले अशा प्रश्नांची होता होतील, तेवढी उत्तरे शोधणे महत्त्वाचे आणि स्वारस्याचे असते. त्यांचे ललितलेखन जितके कसदार आहे, तितकेच त्यांचे वैचारिक लेखनही सकस नि सशक्त आहे. कारण अभ्यासासकट कोणतीही गोष्ट वरवरची न करता थेट समरसून करण्याची त्यांची वृत्ती होती. बुद्ध अभ्यासायचा तर जातककथा मुळातून वाचणे त्यांना आवश्यक वाटले. त्यासाठी त्या पालीप्राकृतासारख्या मध्ययुगीन भाषेच्या अभ्यासात रमल्या; बंगाली लोककथांचे विश्व उमजून घेताना त्या बंगाली भाषेच्या अभ्यासात रमल्या. आपल्या शोधप्रबंधाचा विषय खरेपणाने जाणून घेण्यासाठी त्यांनी थेट आदिवासींमध्येच वास्तव्य केले. अशी बालकसदृश्य अनाघ्रात

जिज्ञासा (म्हणजे जीवनकलहात तरून जाण्यासाठी कळतनकळत फायद्यातोट्याची गणिते न मांडणारी जिज्ञासा) जीवनातून अपार श्रद्धा असल्याखेरीज शक्य नसते. ''मला जगण्याचं सुख वाटतं,'' असे प्रतिभा रानड्यांकडे त्यांनी जे सहजोद्गार काढले होते, त्यामागे या अनाघ्रात जिज्ञासेचाच स्रोत उभा आहे. अन्यथा जीवनाबद्दल असुख वाटावे, घृणा वाटावी असे प्रसंग सर्वांना येतात तसे दुर्गाबाईंच्या वाट्याला आलेलेच असणार की ! पण ते दूर सारून दुर्गा भागवतांच्या प्रज्ञाप्रतिभेने सतत साजरा केला तो जीवनोत्सवच. पण हा जीवनोत्सव कसा, तर मानव-निर्धारित किंवा मानव-संकल्पित नव्हे, तर निसर्गप्रणित. दुर्गा भागवतांचा मानवाच्या कर्तृम्-अकर्तृम् शक्तींवर जेवढा विश्वास होता, तेवढाच विश्वास निसर्गचक्रावरही होता. त्या म्हणतात, 'निसर्गाच्या कवेत नाही असे मला काहीच दिसत नाही. मी, माझा देव, माझ्या भावना, माझे जीवन निसर्गाचाच एक चेतनभाग आहे. मी निसर्गात विरघळून गेलेली आहे. मला एकटे वाटत नाही. निसर्ग आणि माझ्यात अद्वैत निर्माण होताना जाणवते. मरण देखील निसर्गच आहे.'' त्यामुळेच खरे तर आपल्याला दुर्गाबाईंच्या निधनाचे वाईट वाटता कामा नये. पण असे होत नाही. आपल्याला वाईट वाटतच राहते. एखाद्या सुंदर, सदा टवटवीत फुलाची एकेक पाकळी मिटत-कोमेजत जाते. तशीच दुर्गाबाईंच्या देहातली एकेक स्मरणपाकळी मिटत-कोमेजत गेली. त्यांचे देहफूल गळून पडले. कुठल्याही फुलाचे अस्तित्व संपुष्टात येणे ही घटना संवेदनशील माणसाला दु:खदायक, क्लेशकारक वाटणारच. दुर्गाबाईंच्या शब्दांत सांगायचे झाले तर असे वाटणे, अशी मनभर पसरणारी दु:खसंवेदना निर्माण होणे, हाही निसर्गाचाच भाग नाही का?

शेवटी एक गोष्ट मुद्दाम नमूद करावीशी वाटते. वि. स. खांडेकरांच्या निधनानंतर दुर्गाबाई म्हणाल्या होत्या, 'ज्या पायांवर मस्तक टेकवावे असे पाय आता उरलेच नाहीत.' दुर्गाबाईंच्या निधनाने हीच वस्तुस्थिती पुन्हा एकवार निर्माण झालेली नाही काय? म्हणूनच दुर्गाबाईंच्या निधनाने समग्र मराठी संवेदनशीलता दु:खमग्न झाली आहे, ही वस्तुस्थिती आहे.

❑

द. दि. पुंडे

४/९, अर्चनानगर, एरंडवन, पुणे ४११०३८.





अनुक्रमणिका

# म. सा. परिषदेचे दोन सोबती गेले

❑

डॉ. गं. ना. जोगळेकर

❑

**डॉ. पंडित आवळीकर**

(जन्म : ९।५।१९३१ निधन : १।५।२००२ )

मराठीतील सुप्रसिद्ध कवी व प्राचीन वाङ्मयाचे संशोधक डॉ. पंडित आवळीकर यांचे पुणे येथे १।५।२००२ रोजी वयाच्या ७१ व्या वर्षी निधन झाले.

कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयातील विद्यार्थीकालापासून डॉ. आवळीकर लेखन करीत होते. स्वप्नवंती, दीपराग, प्रणयिनी, श्रेयसी असे त्यांचे अनेक कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. संशोधनक्षेत्रात राहूनही त्यांनी आपले कवित्व अखेरपर्यंत जपले होते.

१९५६ पासून धारवाड येथील कर्नाटक कॉलेज व नंतर कर्नाटक विद्यापीठ येथे मराठी विभागप्रमुख म्हणून त्यांनी काम केले. १९९१ मध्ये निवृत्त झाल्यानंतर गुलबर्गा विद्यापीठात सुप्रतिष्ठ प्राध्यापक म्हणून ते काम करीत होते. कर्नाटकातील वास्तव्याचा डॉ. पंडित आवळीकर यांनी तौलनिक अभ्यासासाठी उपयोग करून घेतला. कन्नड भाषा त्यांना अवगत होती. उत्तर कर्नाटकामध्ये त्यांना अनेक मराठी हस्तलिखिते उपलब्ध झाली. त्यांचे संशोधन, संपादन त्यांनी दक्षतेने केले. 'मुडलगीचे स्वामी', 'विवेक चिंतामणी', 'जुने वाङ्मय नवे संशोधन' या त्यांच्या ग्रंथांमुळे प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासात चांगली भर पडली आहे. मराठी-कन्नड संबंधाबद्दल व महाराष्ट्र-कर्नाटक संस्कृतीबद्दल त्यांचे अनेक लेख प्रकाशित झाले आहेत.

ज्ञानपीठ पारितोषिक विजेते लेखक प्राचार्य विनायक कृष्ण गोकाक या आपल्या गुरूच्या स्मरणार्थ त्यांनी म. सा. परिषदेस दिलेल्या देणगीच्या व्याजातून दरवर्षी तौलनिक साहित्याभ्यासासाठी पारितोषिक दिले जाते.

डॉ. आवळीकर यांनी रशियन भाषेचा अभ्यास केला होता. त्यांना रशियाचा प्रवास करण्याची संधीही मिळाली होती. पुश्किन या आद्य रशियन कादंबरीकाराची एक कादंबरी 'कॅप्टनची मुलगी' या नावाने मराठीत अनुवादित केली आहे. रशियन साहित्याबाबतही त्यांनी अनेक लेख लिहिले आहेत.

कर्नाटक शासनाने त्यांचा 'कवी' म्हणून तसेच 'पंडित' म्हणून सन्मान केला होता.

❑

**अरविंद भुजबळ**

मराठीतील एक नवोदित कवी व साहित्यक्षेत्रातील धडपडणारा कार्यकर्ता म्हणून सर्वांना माहीत झालेले श्री. अरविंद भुजबळ यांचे २५ मार्च २००२ रोजी अपघाती निधन झाले. 'अंतर्नाद', 'ऊनपाऊस ओलांडताना' या त्यांच्या कवितासंग्रहाचे काव्यरसिकांनी चांगले स्वागत केले होते. त्यांच्या कवितांनी सर्व काव्यप्रेमींचे लक्ष वेधून घेतले होते. आपल्या कविता ते प्रभावीपणाने सादर करीत असत. कविसंमेलनाचे रंगतदार सूत्रसंचालनही करण्यात त्यांचा हातखंडा होता.

श्री. अरविंद भुजबळ परिषदेचे अतिशय उत्साही व धडाडीचे कार्यकर्ते होते. म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळावर पुणे जिल्ह्याचे प्रतिनिधी म्हणून ते निवडून आले होते. परिषदेच्या कार्यविस्तारासाठी बारामती, पिंपरी, चिंचवड, देहू, सासवड, आळंदी अशा सर्व ठिकाणी त्यांचा सतत संचार चालू असे. त्यांचा लोकसंग्रह फारच मोठा होता. परिषदेच्या अनेक उपक्रमांत त्यांचा महत्त्वाचा सहभाग आहे.

अरविंद भुजबळ यांच्या अकाली निधनाने एक भावसंपन्न कवी व धडपडणारा कार्यकर्ता काळाच्या पडद्याआड गेला. त्यांचे स्मरण सर्वांना दीर्घकाळ होत राहील.

■

डॉ. गं. ना. जोगळेकर
२२, मनीषा गृह. संस्था, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

---

प्रा. देवदत्त दत्तात्रेय वाडेकर : एम्. ए. (तत्त्वज्ञान)
जन्म : २५ मे १९०२ मृत्यू : ५ मार्च १९८५.
संशोधन : १९२२ ते १९२६ - सीनिअर दक्षिणा फेलो
अध्यापन : १९२६ ते १९३२ - डेक्कन कॉलेज, पुणे आणि राजाराम कॉलेज, कोल्हापूर.
१९३२ ते १९६२ फर्ग्युसन कॉलेज, पुणे आणि विलिंग्डन कॉलेज, सांगली.

- १९५१ ते १९६२ - पुणे विद्यापीठात तत्त्वज्ञान विभागाचे प्रभारी प्रमुख.
- १९६२ ते १९७५ - मराठी तत्त्वज्ञान महाकोशाचे संपादन आणि निर्मिती.
- तर्कशास्त्र आणि मानसशास्त्र यावर ग्रंथरचना अणि निबंधलेखन
- इंडियन फिलॉसॉफीकल काँग्रेसचे आजीव सदस्य
- विभागीय अध्यक्ष (१९४४) व जनरल प्रेसिडेंट (१९६९)

१९२७-२८ साली मुंबईहून पुण्यात म. सा. प.चे कार्यालय आले तेव्हाच्या पहिल्या कार्यवाहांपैकी एक. पुढे अनेक वर्षे परिषदेच्या प्रत्येक सर्वसाधारण सभेस हजर राहणारे जागरुक मार्गदर्शक सभासद.

---



अनुक्रमणिका

# शरदबाबूंचे वाङ्मयीन सामर्थ्य



**वसुंधरा पटवर्धन**



*(दि. ८-३-२००२ रोजी पुरस्कार-स्वीकाराच्या समारंभात व्यक्त केलेले मनोगत.)*

आजच्या समारंभाच्या अध्यक्षा लीलाबाई भागवत व उपस्थित मान्यवर मंडळी,

सुप्रसिद्ध बंगाली लेखक शरच्चंद्र चतर्जी यांच्या नावानं आज दिला जाणारा पुरस्कार प्रसिद्ध लेखिका ज्योत्स्ना देवधर यांनी ठेवला आहे. यासाठी ज्योत्स्ना देवधर यांचं कौतुक करावं असं मला कितीही वाटलं, तरी माझा तो अधिकार नाही. म्हणून हा शब्द मी वापरत नाही. हा पुरस्कार त्यांना आपल्या नावानं ठेवता आला असता. पण त्यांनी तसं केलं नाही. ज्या लेखकाला त्या विशेषत्वानं मानतात, त्या शरच्चंद्र चतर्जी यांच्या नावानं त्यांनी हे पारितोषिक देऊ केलं आहे. एक प्रकारे शरच्चंद्रांना या निमित्तानं त्यांनी वंदनच केलं आहे. या नमस्कारात शरदबाबूंचा गौरव तर आहेच; पण ज्यांना हा पुरस्कार प्रदान केला जाईल, त्यांनाही धन्यता वाटावी असा हा अपूर्वाईचा सोहळा आहे. शरदबाबूंच्या वाङ्मयात मोठ्या मनाची माणसं पुष्कळ आहेत. ज्योत्स्नाबाईंना कदाचित शरदबाबूंच्या एखाद्या नायिकेनं ही स्फूर्ती दिली असेल. एखादे वेळी लेखकाच्या लेखणीचा हा प्रभाव असणं अगदी शक्य आहे. ते कसंही असलं तरी ज्योत्स्नाबाईंचे मी मनापासून अभिनंदन करते. असो.

शरदच्चंद्र चतर्जी हे माझे अत्यंत आवडते लेखक. त्यांचं बंगाली साहित्य मी मराठी नाटककार भा. वि. वरेरकर, तसंच श्री. कुलकर्णी, श्री. गुर्जर यांनी केलेल्या मराठी भाषांतरातून वाचलं आहे. विशेषत: वरेरकरांची भाषांतरं मला जास्त आवडत होती. राजकारणात मी अगदीच अनभिज्ञ असल्यानं, त्यांच्या राजकीय कादंबऱ्यांत मी रमले नाही. पण त्यांच्या जवळ जवळ बहुतेक सामाजिक कादंबऱ्या मी झपाटून गेल्यासारख्या वाचल्या. पैकी काही कादंबऱ्या पुन्हा पुन्हा वाचल्या. देवदास, श्रीकांत, गृहदाह, चरित्रहीन इत्यादी कादंबऱ्यांची पारायणं झाली. 'बिंदूचे बाळ' अशासारख्या काही दीर्घकथा फार आवडीनं वाचल्या. त्या वयात कथा-कादंबरीतले प्रसंग, त्यातली आशयसंपन्न अशी संभाषणं, वाद-संवाद आणि एकंदर कथानकाचा तपशीलही लक्षात राहात होता. पण शरदबाबूंच्या वाङ्मयाचा माझ्यावर झालेला परिणाम जसाच्या तसा कायम आहे. शरदचंद्रांचं साहित्य म्हटलं की माझ्या डोळ्यासमोर बंगाली माणसांची वेगळी वाटणारी व्यक्तिमत्त्वं उभी राहतात. 'बिंदूचं बाळ' या दीर्घकथेत, सर्वसामान्याने असामान्याचा आणि त्यामुळे होणारं गुंतागुंतीचं व्यक्तिमत्त्व, यांची गोष्ट लेखकानं बिंदूच्या निमित्तानं सांगितली आहे. बिंदूला मूल नसतं. तिचा पुतण्या हाच तिचा मुलगा. तिच्या दीरानं आणि जावेनं तो मोठ्या मनानं तिच्या हवाली केला आहे. पुतण्याला स्वत:चा

मुलगा मानणारी बिंदू कमालीच्या वात्सल्यानं भरलेली एक तुडुंब नदीच झाली आहे. एका परीनं अजब वाटणारी ही आई, आईच्या प्रेमालाही मागे टाकील अशी आहे. पण तिच्या स्वभावाच्या काही अटीही आहेत. जितकी प्रेमळ तितकीच हट्टी, आग्रही आणि आक्रस्ताळी आहे. मूल नसल्याने की काय, थोडीशी मानसिक संतुलन बिघडलेली आहे. तिचा तोल जाऊ नये म्हणून इतरांना आपला तोल सांभाळत वागावे लागते आणि काही झाले तरी बहुतेक सर्वांना तिच्या इच्छेला शरण जावे लागते. तिचं मुलावरचं प्रेम इतकं अपरंपार की मुलगा क्षणभरही नजरेआड होता कामा नये. मग तो शाळेत जाणार कसा? तर मोठ्या दिराच्या मुलासाठी बिंदूनं घरातच शाळा उघडायला लावली. पडद्याआड बसून मुलाची शिकवणी ऐकू लागली. तरी या मायमाऊलीचा जीव मुलासाठी सदैव व्याकुळ झालेला असे. फक्त आपल्या हातानं मुलाला खीर भरवताना जे काय चार क्षण सुख शांतीचे जातील तेवढेच खरे.

मुलाशिवाय एकही क्षण जगू न शकणारी बिंदू, एका प्रसंगी अभिमानानं पेटून उठते. मानापमानाच्या अतिरेकी कल्पनेनं मुलाला आपल्या खोलीत येऊ देत नाही. रात्रभर घराबाहेर ठेवण्याइतकी ती निष्ठुर होते. याच्यापुढची कथा कुणीही स्वत:च वाचावी अशा उंचीवर गेली आहे. बिंदूची ही कथा मानसशास्त्राच्या कसोटीला उतरण्याइतकी परिपूर्ण झाली आहे. कथा आपण वाचत जातो आणि आपल्याला सगळं खरं वाटतं. आपल्या डोळ्यासमोर घडत असल्याचा प्रत्यय येतो. हेच तर शरदबाबूंचं वाङ्मयीन सामर्थ्य आहे. त्यांनी निर्माण केलेल्या सृष्टीतून आपल्या मूळ जागी यायला वाचकाला वेळ लागतो.

शरदबाबूंच्या कादंबऱ्यांत अनेक तऱ्हेची पात्रं वावरत असतात. त्यात काही वेश्याही आहेत. अध:पतित जीवनाचे भोग जगणाऱ्या दुर्दैवी स्त्रियाही आहेत. पण आपण समजतो तशा या वेश्या नाहीत. एखाद्यानं भांगेतल्या तुळशी वेचून घ्याव्यात किंवा चिखलातली कमळं काढून देवाला वाहावीत, तशी ही चित्रं चरित्र-लेखकानं वाचकांना उलगडून दाखवली आहेत. या सगळ्या स्त्रिया परिस्थितीनं, कुणाच्या तरी चुकीमुळे किंवा एखाद्याच्या स्वार्थी वृत्तीमुळे या विपरीत जगात ढकलल्या गेल्या आहेत. या व्यवसायातील परंपरा हा त्यांचा भूतकाळ नाही. या बायकांच्या दुर्दैवाला कारणीभूत असलेली स्वार्थी, दुष्ट माणसंही, त्या काळातल्या रूढी आणि संस्कार यांचे बळी आहेत. शरदबाबूंच्या वाङ्मयीन जगात जगणारी माणसं ही देवानं किंवा दैवानं निर्माण केलेली नाहीत. माणसांच्या जीवनांत एखादं दु:ख आकांत करीत शिरतं त्याला आपणच निमंत्रण दिलेलं असतं. आपल्या खोट्या समजुती, क्षुद्र मन आणि माणसाला निसर्गाकडून मिळालेला अपुरेपणाचा शाप, याच गोष्टी दु:खाला अधिकतर जबाबदार आहेत, अशी शरदबाबूंची विचारधारा असावी आणि हेच विचार त्यांच्या लेखनाचं अधिष्ठान असावं असं माझ्या अल्पबुद्धीला वाटतं. त्यांच्या लेखनाचा हेतू मनोरंजन नाही. आपलं जीवन कसं असावं आणि कसं आहे हे सांगण्यासाठी त्यांनी लेखणी उचलली आहे. समाजदर्शन आणि समाजप्रबोधन या दोन्ही गोष्टींकडे अंगुलीनिर्देश करताना शरदबाबू कमालीचे गंभीर झाले आहेत. त्यांची समाजसुधारणेची तळमळ अगदी पोटातून आल्यासारखी वाटते. ''बुडती हे जन। न देखवे डोळा। म्हणूनी कळवळा। येत असे।'' या जातीचा हा दु:खोद्गार आहे.



अनुक्रमणिका

त्यांची 'श्रीकांत' ही कादंबरी उदाहरण म्हणून सांगता येईल. असंच एक सुंदर, बुद्धिमान, सुसंस्कृत, सुवासिक फूल ! परिस्थितीच्या दूषित फुंकरीनं भलतीकडेच उडवलेलं ! नाव राजलक्ष्मी! कुठल्यातरी निमित्तानं श्रीकांत व राजलक्ष्मी एकत्र येतात. श्रीकांतने तिला आयुष्यात प्रथम स्थान दिलं आहे. राजलक्ष्मीला स्वतःचा चमत्कारिक असा भूतकाळ आहे. आपल्या प्रियकराला ती पती किंवा देवता मानते. त्याची सेवा करते. सर्व तऱ्हेची उत्तम व्यवस्था ठेवते. प्रवासाला जाताना वाटेत हवेतच म्हणून फराळाचे डबेच्या डबे भरून देते. दिमतीला एक चांगला नोकरही पाठवते आणि हा सगळा खर्चही तीच करत असते.. इतके सगळे करूनही नवऱ्यासाठी स्वयंपाकघरात जाऊन स्वयंपाक करण्याची तिला हिंमत होत नाही. स्वयंपाकघराच्या दाराबाहेर बसून नोकराकडून सगळे पदार्थ करवून घेते. आपण पतित आहोत या विचारानं तिचं मन सारखं पापपुण्याचा हिशोब मांडत असतं. या घालमेलीत श्रीकांतला आपल्या हातचं जेवण चालणार नाही अशी तिची समजूत असते किंवा तिनंच तसं ठरवलेलं असतं. हा तिचा संस्कार आहे. या संस्कारांची ती गुलाम आहे. धर्मशास्त्र तिच्या परीनं ती जाणते आणि त्याप्रमाणं कर्मकांडाची कास धरून ती जगते. श्रीकांतकडून तिला जास्त अपेक्षा नाहीत. शुद्ध मराठीत सांगायचं तर कुंकवाला आधार! या साऱ्यातून जे सुखदुःख वाट्याला येतं तेच ाजलक्ष्मीचं जग आहे.

शरदच्चंद्रांच्या नायिका किंवा एकूणच स्त्रीपात्रं अत्यंत मानी, बाणेदार, कर्तृत्ववान, विलक्षण त्यागी, आग्रही आणि सारं काही मनात ठेवून सोसत राहणाऱ्या. त्या मानानं पुरुष मात्र बहुधा निष्क्रिय पण तत्त्वचिंतक, मितभाषी आणि एकलकोंडे. भरीला आपले विचार, भावना मनाच्या तळघरात कोंडून ठेवणारे. कधीही झालं तरी खुलासा म्हणून करणार नाहीत. मोकळ्या मनानं आपला स्वभाव व दुसऱ्याचा मनस्ताप कमी करणार नाहीत. बंगाली स्त्रीपुरुषांचा हा स्वभाव आहे की काय कोण जाणे! अती झालं की बॅग भरून हा पुरुष माणूस कलकत्याला जायला निघतो आणि परत येईल तेव्हा अचानक धूमकेतूसारखा उगवतो. पुरुषप्रधान संस्कृतीचा अंगीकार केलेल्या या पुरुषाची एक गोष्ट मात्र नक्की दिसते की आपल्याला सर्वतोपरी सांभाळणाऱ्या स्त्रीचा, तिनं पायावर माथा ठेवून केलेला नमस्कार स्वीकारताना त्याला जराही संकोच वाटत नाही. कारण या परित्यक्ता स्त्रिया अशा पुरुषांचा फारसा आधार प्रत्यक्षात नसतानाही तो आहे असंच मानतात. त्यांची ती मानसिक गरज असते. खात्री, विश्वास, संरक्षण नसलेलं हे अधांतरी नातंही त्यांना पुरतं, हे पाहून तोही सहसा अस्वस्थ होत नाही. खरं तर या उपेक्षित स्त्रीचा त्यालाच आधार असतो. तो इतका सहज मिळतो की तिच्यासाठी आपण काही केलं पाहिजे अशी जाणीवच त्याला एकंदरीत होत नाही.

शरदबाबूंनी मनुष्य स्वभावातील अनेक तऱ्हेचे नाईलाज, अतिशय सहृदयतेने रंगवलेले आहेत. परिस्थितीजन्य, बौद्धिक, भावनिक आणि स्वाभाविक अशा कमजोरी दाखवत दाखवत इहलोकीच्या माणसांचा जीवनपट उलगडून त्यांनी आपल्यासमोर ठेवला आहे. मनुष्यस्वभावाचं उत्तम ज्ञान आणि त्यामुळे येणारी कमालीची समजूत, हा एकंदर लेखनाचा पायाभूत गुण त्यांच्याजवळ भरपूर होता. शरदबाबूंची समजूत ही त्यांच्या वाङ्मयाने वाचकांना आणि

लेखकांनाही प्रेरणा देणारी अपूर्व अशी देणगी आहे. मी तरी त्यांच्या लेखनातील या लोकोत्तर गुणाने प्रभावित झाले होते.

शेवटी इतकंच म्हणते की, शरदबाबूंचं साहित्य, हे त्यांनी केलेलं समाजदर्शन आहे. ते इतकं उत्कट, मर्मग्राही आणि वाचकांना ढवळून काढणारं आहे, की आपण त्यांची एखादी कादंबरी वाचून संपवतो, तेव्हा एखादा महासागर पार करून आल्यासारखं वाटतं. अशा महान लेखकाच्या नावानं मला जो पुरस्कार दिला जात आहे, त्यानं माझं मन आनंदानं भरून आलं आहे. आज मी मला भाग्यवान समजत आहे. माझ्यासारख्या छोट्या लेखिकेच्या आयुष्यात असा कृतार्थतेचा क्षण येईल, असं माझ्या स्वप्नातही कधी आलं नव्हतं. या धन्य क्षणी मी शरच्चंद्र चतर्जींना पुन्हा पुन्हा नमस्कार करते.

❑

वसुंधरा पटवर्धन
१४८१ शुक्रवार पेठ, पटवर्धन वाडा पुणे ४११ ००२.





अनुक्रमणिका

# ग्रामचीचा 'हेजिमनी' सिद्धान्त आणि साहित्य

❑

के. रं. शिरवाडकर

❑

सर्व सांस्कृतिक इतिहासाची प्रेरणा अर्थकारणात आहे असे मानून मार्क्स-एंगल्स्‌चा पाया-इमला सिद्धान्त मानवी इतिहासाला संकुचित आणि एकांगी रूप देतो अशी त्या सिद्धान्तावर आणि एकूण मार्क्सवादावर टीका झाली. त्याचे निराकरण करण्यासाठी मार्क्सच्या निधनानंतर म्हणजे सप्टेंबर १८९० मध्ये ब्लॉक या विचारवंताला लिहिलेल्या पत्रात एंगल्स्‌ म्हणतो, ''जर कोणी आमच्या म्हणण्याचा अर्थ आर्थिक घटक हाच फक्त (सामाजिक प्रगतीमध्ये) निर्धारक असतो असा करीत असेल तर तो आमच्या सिद्धान्ताला भोंगळ, अर्थशून्य आणि विकृत स्वरूप देतो असेच म्हणावे लागेल. वस्तुत: जीवनाच्या विविध कृतींचा परस्परांवर परिणाम होऊनच इतिहास बनतो. मात्र शेवटी आर्थिक संचरण (Economic movement) अग्रेसर ठरते.'' एंगल्स्‌च्या विधानावरून 'पाया-इमला' सिद्धान्तात यांत्रिकता नाही हे स्पष्ट होते. ''माणसं स्वत:चा इतिहास स्वत:च बनवितात''(men make their own history) ह्या एंगल्स्‌च्या (२५ जानेवारी १८९४ रोजी स्टाईनबर्गला लिहिलेल्या पत्रातील) विधानाकडे दुर्लक्ष करून मार्क्सवाद इतिहासाला अर्थकारणांचा गुलाम बनवितो. असा आक्षेप घेण्यात आला आणि येत आहे. उलट, पाया-इमला सिद्धान्ताची कुऱ्हाड सापडल्यावर कित्येक अविचारी मार्क्सवाद्यांनी वैचारिक जगात अनर्थ माजविला हेही खरेच आहे. एंगल्स्‌नेच अशा एकांगी, अतिरेकी भावसंवादाची 'टॉमीरॉट' म्हणून संभावना केली आहे. पुढील काळात अनेक प्रगल्भ मार्क्सवादी विचारवंतांनी मार्क्सवादातील विचारांचे मंथन करून त्याला अधिक समावेशक आणि विस्तृत स्वरूप देण्याचा प्रयत्न केला.

अशा मार्क्सवादी विचारवंतात इटालियन मार्क्सवादी अंटोनियो ग्रामची (Antonio Gramsci, १८९१-१९३७) प्रमुख आहे. मार्क्सपासून प्रेरणा घेऊनच त्याने आपला 'हेजिमनी'चा, धुरीणत्त्वाचा, सम्मतीवर आधारित सत्तेचा सिद्धान्त मांडून मार्क्सवादी विचारात मोलाची भर टाकली.

आपल्या ४६ वर्षांच्या अल्पआयुष्यात केवळ १५/१६वर्षे (१९१४-१९३७) ग्रामचीला चिंतन आणि लेखन करावयास मिळाली आणि तीही बव्हंशी प्रतिकूल परिस्थितीत. १९२६मध्ये मुसोलिनीने ग्रामचीला तुरुंगात घातले. १९३१ ते १९३७ या सहा वर्षात तो तुरुंगातच मेंदूच्या रक्तस्रावाने गंभीरपणे आजारी होता. १९३७साली मुसोलिनीच्या कैदेतच त्याचे निधन झाले. १५/१६ वर्षांच्या चिंतनातून त्याने मार्क्सवादात आणि एकूण राजकीय-

सामाजिक विचारात महत्त्वाचे योगदान केले. सामाजिक आणि राजकीय क्रांतीचा विचार करताना ग्रामचीने दोन महत्त्वाचे मुद्दे मांडले. एक, परिवर्तनातील बुद्धिवाद्यांची भूमिका आणि दोन, 'हेजिमनी' (hegemony)अथवा धुरीणत्त्व म्हणजेच सम्मतीवर आधारलेल्या सत्तेची स्थापना. आणि तीसाठी करावे लागणारे बौद्धिक नेतृत्त्व. अशा धुरीणत्त्वाचे उद्दिष्ट असते लोकांच्या जाणिवांचे परिवर्तन किंवा रूपांतर (करणे) (modification of consciousness). मार्क्सने म्हटले आहे की समाजावर वर्चस्व गाजविणाऱ्या परिकल्पना (ideas) या नेहमीच वर्चस्व असलेल्या वर्गाच्या परिकल्पना असतात आणि त्यांच्या आधारावर त्या वर्गाची मतप्रणाली (ideology) स्थिर होते. ग्रामचीने वर्चस्व (domination) आणि धुरीणत्त्व (hegemony) या मध्ये फरक केला. अधिशास्त्या वर्गाचे (भारतीय संदर्भात वर्णाचे) आपले प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे दोन मार्ग असतात. एक मार्ग असतो सक्तीवर आधारलेल्या सत्तेचा तर दुसरा सम्मतीवर आधारलेल्या प्रभुत्त्वाचा. पहिल्या पद्धतीला ग्रामची 'डॉमिनेशन' म्हणतो तर दुसऱ्याला 'हेजिमनी'.

सर्व शासने दोन्हीही पद्धतींचा कमीअधिक प्रमाणात वापर करतात. एकात सक्ती पायाभूत असते तर दुसऱ्यात सम्मती. सक्तीचा मार्ग सोपा आणि सरळ असतो. त्यात शासक वर्ग/वर्ण शासित जनतेला आपल्या हितसंबंधांच्या दावणीला बांधून समाज रचनेची उभारणी करतात. अशा शासनात शासित/शोषित वर्ग शासनाविरुद्ध बंड करण्याच्या मनस्थितीत सदैव असल्याने शासनाला नेहमीच अस्थिरता असते. अमेरिकेत अथवा दक्षिण आफ्रिकेत गोऱ्यांनी काळ्यांवर प्रस्थापित केलेली सत्ता ही अशाच प्रकारची सत्ता होती. उलट 'हेजिमनी' अथवा प्रभुत्त्वामध्ये वरिष्ठ, शासकवर्ग उत्कट आणि विस्तृत प्रयत्नाने आपल्या श्रद्धा, आपली मूल्ये, आपली विचारप्रणाली - एका शब्दात आपली संस्कृती समाजाच्या बौद्धिक वातावरणात संपृक्त करून जनतेच्या जाणिवांना सोयीस्कर रूप देतो. पर्यायाने वरिष्ठ वर्गाची वा शासक वर्गाची संस्कृती - जीमध्ये त्याच्या श्रद्धा, त्याची नीती, त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान ह्या सर्वांचा समावेश आहे, ती - सर्वांची संस्कृती आहे अशी समाजाची मनोभूमिका तयार होते. 'हेजिमनी' म्हणजे एका नवीन जीवनदर्शनाची निर्मितीच असते. ग्रामचीच्या मते अधिशास्तावर्ग सर्वांगीण प्रभुत्वाचे कार्य बौद्धिक आणि नैतिक नेतृत्त्व प्रस्थापित करून साधतो. प्रामुख्याने समाजातील विविध संस्थांमधून (प्रसारमाध्यमे, शिक्षणसंस्था, साहित्य इत्यादींमधून) आपल्या वर्गीय/वर्णीय हितसंबंधांचे पोषण होईल अशा परिकल्पनांनी समाजातील बौद्धिक, नैतिक आणि भावनात्मक वातावरण संपृक्त करण्याचे कार्य अशा धुरीणत्त्वाचे प्रमुख उद्दिष्ट असते. अशा तऱ्हेने एक नवीन संस्कृतीच जनमानसाचे सोयीस्कर पालनपोषण करण्यास सिद्ध होते. ही संस्कृती सर्वांची म्हणून सर्वमान्य झालेली असली तरी तिच्या कोशात सांभाळ होतो तो मुख्यतः वरिष्ठ अधिशास्ता वर्गाच्या हितसंबंधांचा. एका वर्गाचा जो जीवनविषयक दृष्टिकोण असतो तो सर्व समाजाचा दृष्टिकोण म्हणून समजला जातो. अशा जीवनसंदर्शनाला सर्वांची सम्मतीही मिळालेली असते. कुलाभिमान, स्वामीनिष्ठा, धर्माभिमान, देशप्रेम इ. मानवी











इतिहासापाठोपाठ येणाऱ्या श्रद्धांचा इतिहास हेच सांगतो.

एक समाजव्यवस्था म्हणून चातुर्वर्ण्य अशा प्रकारच्या प्रभुत्त्वांची वा 'हेजिमनी'चे उत्तम उदाहरण आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्था केवळ एका फतव्याने निर्माण झाली नाही. तिच्या प्रस्थापनेसाठी, तिच्या स्थैर्यासाठी आणि तिच्या समाजमान्यतेसाठी, उत्कट प्रयास आणि प्रसार झाला. तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, पुराण, साहित्य आणि इतर प्रभावी संस्थांमधून त्या विचारप्रणालीचा पद्धतशीर प्रसार आणि प्रचार होऊन सर्व समाजाची एक निश्चित मानसिकता तयार करण्यात आली आणि त्या व्यवस्थेला सर्वसम्मती घेण्यात आली. चातुर्वर्ण्य ही परमेश्वरी निर्मिती आहे, वर्णीय कनिष्ठता ही आदल्या जन्मातील पापांचे अनिवार्य फळ आहे, दैवगती सार्वभौम आहे इ. विचार सर्वत्र खेळले गेले. अशा पुरेपूर संपृक्ततेमुळे शूद्रांच्या मनाचेही संपूर्ण अभिसंधान (कंडिशनिंग) होऊन त्यांची वरिष्ठांच्या जीवनदृष्टीला मनोमन संमती मिळाली.

स्त्रियांच्या सामाजिक स्थानाबाबतही ही कथा अधिक प्रकर्षाने लिहिली गेली. तत्त्वज्ञान, धर्म, नीती यांमधून पुरुषाच्या, पतीच्या श्रेष्ठत्वाची प्रस्थापना करून तिचा संस्कृतीच्या सर्वमुखातून जल्लोष केला गेला. सती, पतिव्रता, पतिसेवा इ.कल्पना यांना श्रेष्ठ नैतिक मूल्ये म्हणून समाजासमोर ठेवण्यात आली व स्त्रियांची त्याला सम्मती मिळविण्यात आली. परंतु एखादे मूल्य अथवा एखादा आदर्श केवळ विचार म्हणून पुढे ठेवला तर त्याला स्वीकृती मिळविणे सोपे नसते. असा स्वीकार मिथके, पुराण, साहित्य यांच्या साहाय्याने अधिक सुकर होतो. वरिष्ठ वर्गाच्या साहित्यकृती त्यांच्या मिथकांबरोबर हे कार्य विशेष परिणामकारकतेने करताना दिसतात. सती, पतिव्रता इत्यादी संकल्पना आणि त्यांच्या मूर्ती (icons) ह्यांचे देव्हारे माजवून त्या कल्पना चिरंतन मूल्ये म्हणून प्रस्थापित झाली. त्याची मनोमन पूजा केली. त्याचा सांभाळ केला तो स्त्रियांनी. भारतीय संस्कृती हे सांस्कृतिक प्रभुत्त्वाचे, सांस्कृतिक 'हेजिमनी'चे व्यामिश्र, सुनियोजित आणि चतुर उदाहरण आहे. केवळ पाशवी बळावर आधारलेली गोऱ्यांची सत्तीची सत्ता फार काळ टिकू शकली नाही. उलट चातुर्वर्ण्याला प्रदीर्घ इतिहास आहे. सत्तीची सत्ता आणि सम्मतीचे प्रभुत्त्व यातील हा फरक आहे. एकात शासकाने ताबा मिळवला असतो तो शासिताच्या शरीराचा; तर दुसऱ्यात त्याच्या मनाचा. दुसऱ्या प्रक्रियेतील यशाचा वाटा मोठ्या प्रमाणात मिथके, पुराणे आणि साहित्य यांचा असतो.

'हेजिमनी'ची अथवा 'धुरीणत्त्वाची' प्रक्रिया मात्र बंद स्वरूपाची नसते. आपल्या मूळ हितसंबंधांना मोठा धक्का बसणार नसेल तर वेगळ्या वा विरोधी परिकल्पनाही ती समाविष्ट करून घेण्याचा प्रयत्न करते.तिच्या विकासाला अशा परिवर्तनशीलतेची आवश्यकताही असते. पाया-इमला सिद्धान्ताच्या संदर्भात आपण पाहतो की उत्पादन साधने आणि संबंध यांच्या बदलाबरोबर सांस्कृतिक इमल्यात परिवर्तनाचे वारे वाहू लागतात. अशा वेळीच प्रतिधुरीणत्त्वाची, counter hegemonyची चळवळ सुरू होते. दोन जीवसंदर्शने एकमेकांसमोर नेतृत्त्वाच्या स्पर्धेत आव्हानात्मक भूमिका घेऊन उभी राहतात आणि शेवटी

परिस्थितीचे द्वंद्वात्मक निराकरण होते. येथेही भारतातील सांस्कृतिक प्रभुत्त्वाचे, 'हेजिमनी'चे उदाहरण सार्थ ठरते. भारताच्या सांस्कृतिक इतिहासात विविध, कित्येक वेळा विरोधी संकल्पनांना आणि चळवळींना संस्कृतीच्या मूळ संरचनेमध्ये (structure) अंतर्भूत करून तिच्या स्वरूपात बदल करणे जमले. हे दक्षिण आफ्रिकेत गोऱ्यांच्या संस्कृतीला जमू शकले नाही. परिणामी दक्षिण आफ्रिकेतील गोरी संस्कृती कोसळून पडली. इतिहासाने भारतीय संस्कृतीची प्रकृतीच अशी बनविली आहे की ज्यावेळी बदल अनिवार्य ठरले त्यावेळी 'वाकेन पण मोडणार नाही' हेच तिचे उत्तर ठरले.

वर म्हटल्याप्रमाणे केवळ विचारांनी अथवा तत्त्वज्ञान मांडण्याने सांस्कृतिक प्रभुत्त्व प्रस्थापित होणे सोपे नसते. त्यासाठी समाजमनाला भावनांनी भारून टाकणे आवश्यक होते. साहित्य आणि मिथके ( आणि आता मिथके दुष्कर झाल्याने मुख्यत: साहित्य) हे काम सुलभतेने करू शकतात. प्रस्थापित वर्गाचे वा वर्णाचे वैचारिक संपृक्तीकरण सुरू झाले की साहित्यातील मोठा भाग जाणता अजाणता त्या विचारांनी भारावला जातो आणि अनुषंगिक भावना उसळून येतात.

मराठी साहित्याकडे एक दृष्टीक्षेप टाकल्यावर लक्षात येते की प्राचीन साहित्यातून (जसे 'ज्ञानेश्वरी') प्रस्थापित परंपरांनी ठरविलेल्या मूल्यांना अग्रेसरत्त्व मिळाले आहे. स्त्रीची कनिष्ठ प्रतिमा, चातुर्वर्ण्याचा पुरस्कार, कर्मवादावर श्रद्धा, इत्यादींना या साहित्यातून उठाव मिळणे अपेक्षितच होते. ब्रिटिश सत्ता आणि त्याबरोबर आलेली भौतिकवादी विचारसरणी येईपर्यंत प्रस्थापित संस्कृतीला परिवर्तनाच्या दिशेने मोठेसे आव्हान मिळाले नाही. १९व्या शतकात विशेषत: शेवटी प्रतिधुरीणत्त्व किंवा प्रतिप्रभुत्त्व झपाट्याने समोर आले. ब्रिटिश सत्ता आणि तिचा प्रवक्ता म्हणून कार्य करणारा शिक्षित मध्यमवर्ग आपले सांस्कृतिक प्रभुत्व प्रस्थापित करू लागला आणि त्यात तो यशस्वीही झाला. २०व्या शतकाच्या उत्तरार्धात साहित्य आणि संस्कृती यांपासून अद्यापही दूर पडलेल्या दलितांनी आव्हानात्मक भूमिका घेऊन प्रभुत्त्वाच्या परिवर्तनाला दिशा दिली. दलितांच्या साहित्यातील विद्रोह हे साहित्याचे महत्त्वाचे मूल्य ठरले. अशा तऱ्हेने मराठी साहित्य प्रभुत्व आणि प्रतिप्रभुत्त्व यांच्या आवर्तनातून प्रगत होताना दिसते. खरे तर ही घटना (phenomenon) सर्वच साहित्य आणि संस्कृती यांच्या प्रगतीचे गमक मानावे लागेल. कोठल्याही संस्कृतीत तिच्या अनेक अंगातून अशी आंदोलने उद्‌भवतात. त्यांच्या सूक्ष्म आणि चिकित्सक अभ्यासातूनच त्या त्या संस्कृतीच्या आणि पर्यायाने समाजाच्या केंद्रवर्ती आकांक्षांची ओळख होऊ शकते.

❑

डॉ. के. रं. शिरवाडकर,
'विशाखा', ३८ नवकेतन हौसिंग सोसायटी,
कोथरूड, पुणे ४११ ०२९.



अनुक्रमणिका






# लेखकपणाचे भान

❑

## मिलिंद बोकील

❑

**आ**पण लेखक आहोत म्हणजे नक्की काय आहोत असा प्रश्न लिहिणाऱ्या प्रत्येक माणसाला कधी ना कधी पडतोच. त्यातून तो लेखक जर कल्पनेच्या म्हणजे प्रतिभेच्या स्फुरणाने लिहिणारा असेल तर त्याला वा तिला हा प्रश्न हमखासच पडतो. लिहायची ऊर्मी माणसाला नकळत येते आणि थोडीफार फुरसद मिळाली की कागदावर अक्षरे काढता येतात. पण एवढे केले म्हणजे लेखकपणाचे भान येते असे नाही. त्यासाठी काही प्रश्न समोर असावे लागतात. आपण का लिहितो? लिहिण्यातून काय साधतो? ज्या सामाजिक-साहित्यिक परिस्थितीत आपण लिहितो तिच्याशी आपला संबंध कसा असतो? किंवा लेखक म्हणून आपले कार्य काय असे हे प्रश्न असतात. ह्या प्रश्नांना भिडण्यावाचून आणि त्यांच्या सोडवणुकीतून लेखकपणाचे भान येत असते.

मी का लिहितो, या प्रश्नाचे माझे उत्तर तसे केल्यावाचून मला गत्यंतर नाही हे आहे. अवघड भाषेत बोलायचे तर लेखन हे माझे श्रेयस आहे किंवा वेगळ्या भाषेत तो माझा स्वधर्म आहे. त्याचा पाठपुरावा केल्यावाचून मला गती नाही. आपल्या प्रत्येकापुढचा सनातन प्रश्न आपले आयुष्य सार्थ कसे होईल हा असतो. आयुष्यभर आपण त्याच धडपडीत असतो. खरं तर जगण्याचा प्रत्येक क्षण हा सार्थकी लागायला हवा पण व्यवहारांत ते शक्य होत नाही म्हणून आयुष्याची गोळाबेरीज तरी सार्थ असावी अशी प्रत्येकाची इच्छा असते. मी लिहितो तेव्हा मला माझे आयुष्य सार्थ होते आहे असे वाटते. लिहिताना एक प्रकारचा निर्मळ आनंद होत राहतो. दैनंदिन कटकटी मागे लागलेल्या असतात, प्रवास असतो, एकटेपणा सापडत नाही अशा अडचणी नेहमीच असतात पण एकदा लिहायला बसलो — मग ते ललित असो वा वैचारिक — की सर्व चिंता, बेचैनी, उद्विग्नता निघून



मिलिंद बोकील, जन्म : १ मे १९६०, एम्. ए. पीएच्. डी.

- महाराष्ट्र राज्याच्या जन्मदिनी आणि कामगारदिनी जन्मलेले मिलिंद बोकील नुसतेच आजचे आघाडीचे कथाकार नाहीत तर एक डोळस सामाजिक कार्यकर्ते आहेत.
- 'उदकाचिया आर्ती' आणि 'सेन गार्डन' हे त्यांचे दोन कथासंग्रह, परदेशी समाजचित्रणे करणारे 'समुद्रापारचे समाज' हे पुस्तक आणि 'जन्माचे अनुभव पुसता' हा समाजशास्त्रीय लेखसंग्रह ही सर्वच नाना पुरस्कारप्राप्त आणि जाणत्या वाचकांत गाजलेली पुस्तके आहेत.



अनुक्रमणिका

जाते. आपण जे करतो आहोत ते योग्य आहे, महत्त्वाचे आहे, आपल्या जगण्याकरता केवळ आवश्यकच नाही तर ते जगणे अधिक उन्नत करणारे आहे असा प्रत्यय कायम येत राहतो.

म्हणून लेखनासाठी लसलस करावी असे वाटत नाही. आपण कशावर का होईना सारखे काहीतरी लिहित राहिले पाहिजे अशी इच्छा होत नाही. जे लेखक आयुष्यभरात पाच-सातशे कथा किंवा डझनावारी पुस्तके लिहू शकतात त्यांचा मला अपार हेवा आणि कौतुक वाटते. लेखन ही दुष्कर गोष्ट आहे असं नाही पण ती एक गंभीर बाब आहे हे निश्चित. तुम्ही तिच्याकडे थिल्लरपणे बघू शकत नाही. तुमचे अस्तित्त्व तिथे पणाला लागलेले असते. हे सामाजिक किंवा वैचारिक विषयांबाबतही खरे आहे. आपल्याला लिहायचे आहे म्हणून मुद्दाम विषय धुंडाळत राहणे, 'फील्ड व्हिजिट्स्' करणे, माणसांच्या मुलाखती घेणे असे करावेसे वाटत नाही. सामाजिक संशोधनाचे जे काम चालले होते त्यातून ते लेख निघाले. मराठीत चांगले समाजशास्त्र आणावे ही भूमिका त्यामागे आहे. पण लोकांना सुधारावे हा अट्टहास नाही. लिहायला बसलो असताना प्रत्येक वेळी आपण हे जे लिहितो आहोत ते लिहिणे आवश्यक आहे का असा प्रश्न फणा काढून कायम उभा असतो. त्याच्याशी मुकाबला केल्याशिवाय पुढे जाता येत नाही.

ह्याच्या जोडीचाच प्रश्न लिखाणातून आपण काय साधतो, हा आहे. निरनिराळ्या लोकांच्या लिहिण्याच्या प्रेरणा निरनिराळ्या असतात. त्यामुळे निरनिराळे वाङ्मयप्रकार तर संभवतातच पण त्यांचे वाङ्मयीन साध्य वा परिणामही वेगवेगळे असतात. प्रतिभेने प्रेरित झालेल्या साहित्यातून आपण काय साधतो हा त्यातला एक विशिष्ट प्रश्न आहे. हा प्रश्न पूर्वी अनेकदा चर्चेला आला आहे आणि पुढेही येणारच आहे. प्रत्येक काळातल्या लेखकांनी आपापल्या परीने त्याचे उत्तर द्यायचे असते.

माझी साहित्यनिर्मितीची प्रेरणा ही कलानिर्मितीची प्रेरणा आहे. आपल्याला काहीतरी निर्माण करायची जी ऊर्मी येते तिला कलात्मक आकार वा रूप असावे असे वाटते. इथे आकार वा रूप याचा अर्थ भाषिक कृतीला असलेले दृश्य परिमाण असा घ्यायचा. न पेक्षा रूपवादी वा तत्सम संकल्पनाव्यूहात फसण्याचा धोका संभवेल. माणसाच्या सांस्कृतिक जीवनात कलेचे महत्त्व वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. माणसाच्या चित्तवृत्तींना एकतान करून, नेहमीच्या चाकोरीबद्ध, एकसुरी पार्थिव पातळीवरून त्याला अद्भुत, अलौकिक पातळीवर कला नेत असते. सर्व कलांमध्ये साहित्याचे स्थान विशेष आहे. कारण भाषा हे साहित्याचे माध्यम आहे आणि भाषेच्याद्वारे जे सूचन होते ते जीवनदर्शी, सखोल आणि दीर्घकाळ टिकणारे असते. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे ही प्रक्रिया निरामय आनंदाची असते. जीवनात एरवी जरी दु:ख, वेदना, अन्याय, हिंसा असली तरी ह्या सर्वांच्या पार नेण्याचे सामर्थ्य कलेमध्ये असते.

कलानिर्मितीची प्रेरणा जरी विशुद्ध, सुंदर आणि आत्मिक असली तरी लेखकाला एक व्यक्ती म्हणून सामाजिक अस्तित्व असते. त्यामुळे सामाजिक परिस्थितीचा व तीत घडणाऱ्या बदलांचा त्याच्यावर परिणाम होत असतो. शिवाय लेखकाच्या साहित्यकृतीतून व तिच्या वाचनाच्या व आस्वादाच्या प्रक्रियेतून एक साहित्यिक विश्व वा परिस्थिती आकारत असते. लेखक या परिस्थितीचाच एक घटक असल्याने तो त्यापासून अलिप्त तर राहू शकत नाहीच, पण तिने निर्माण

अनुक्रमणिका

केलेल्या आव्हानांचा वेधही त्याला घ्यावा लागतो.

एक लेखक म्हणून एकविसाव्या शतकातील महाराष्ट्राकडे बघताना मला मुख्य सामाजिक आव्हान दिसते ते शिक्षणाचे. स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या पन्नास वर्षांत आपल्या शिक्षणाचा जो नामांकित विचका आपण करून ठेवला आहे त्याला इतिहासात तोड नाही. महाराष्ट्रासारख्या तथाकथित राज्यातही सुमारे ५०% विद्यार्थी सातवीपर्यंत शाळेतून गळतात. पुढे दहावी व बारावीला त्यातली निम्मी, निम्मी गळतात. दहा पंधरा टक्के मुलेच कॉलेजला जातात. खऱ्या अर्थाने उच्च शिक्षण घेणारी आणखी कमी. शालेय पातळीवर गळणाऱ्या विद्यार्थ्यांत दलित, आदिवासी, भटके-विमुक्त अशा घटकांचे आणि मुलींचे प्रमाण मोठे आहे. शिक्षणाची प्रक्रिया तर कंटाळवाणी आहेच पण जे शिक्षण मिळते त्याचा दर्जाही साधारण आहे. या बाबतीत केवळ सरकारला दोष देऊन उपयोग नाही. एक समाज म्हणून आपण शिक्षणाकडे कधीही गंभीरपणे पाहिलेले नाही. आपल्या समोरचे सर्व प्रश्न — मग ते बेकारीचे असोत, लोकशाहीचे असोत वा असंस्कृतपणाचे — हे शिक्षणाच्या दुर्दशेतून निर्माण झालेले आहेत.

ह्या दुरवस्थेचा परिणाम साहित्यिक जगावरही होतोच. जिथे शिक्षण पुरेसे नाही तिथे वाचक कसे तयार होणार? लेखक तयार होणे तर लांबची बात. समाजातील निरनिराळ्या वर्गांचा आणि लोकसमूहांचा भाषिक आविष्कार प्रकट झाल्याने भाषा आणि समाज समृद्ध होत असतात पण चांगले शिक्षण सर्वदूर पोहोचलेच नाही तर साहित्यव्यवहाराचा विस्तार होणार तरी कसा?

जे शिक्षित आहेत ते वाचत नाहीत हे दुसरे आव्हान. बंगाली किंवा मल्याळी लोकांसारखी मराठी लोकांना वाचनाची भूक का नाही हा एक यक्षप्रश्न आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाच्या सुरुवातीला देशात महाराष्ट्राची अग्रेसरता होती, त्यात लेखन-वाचनाच्या प्रसाराचा मोठा वाटा होता. सध्या साक्षरतेचे प्रमाण वाढलेले असले तरी त्याप्रमाणात वाचनाचे प्रमाण वाढलेले नाही, उलट कमी झालेले आहे. टीव्हीसारख्या माध्यमांमुळे करमणुकीखातर वाचणाऱ्यांची संख्याही रोडावली आहे. पुस्तकांना मागणी नाही म्हणून मराठीतला प्रकाशनव्यवहार सुस्त आणि मरगळलेला आहे. त्यामुळे लेखकांना उभारी राहात नाही. लोकांना विकत घेऊन वाचायचे नाही पण मग वाचनालयांचा प्रसार तरी का होत नाही? वाचायचे नाही ही प्रवृत्ती आपल्या समाजाच्या मुळावर येणार आहे.

वाचनाचे क्षेत्र मर्यादित असल्याने साहित्यव्यवहाराला तर थिटेपणा येतोच पण वाचकांची अभिरुचीही खुरटलेली राहते. मराठीतील साहित्यव्यवहाराचे वैचित्र्य असे आहे की सभा-संमेलनांच्या उत्सवी वातावरणाने तो भरगच्च वाटतो, पण प्रत्यक्षात अगदी पोकळ आहे. वाचकांची अभिरुची साचेबंद आणि ढोबळ स्वरूपाची आहे. तिला लेखक चटकन बळी पडतात. त्याचे उत्तम उदाहरण म्हणजे सध्या आत्मकथन आणि अनुभवकथन यांचे वाढत असणारे प्राबल्य. ह्या दोन्ही प्रकारांनी साहित्याचा विस्तार वाढतो हे खरे आहे, पण उंची वाढत नाही. आत्मकथन हे एकदाच करता येते. कलानिर्मितीसारखी ती सर्जनशील प्रक्रिया नव्हे. तर अनुभवकथनात प्रतिभेचे म्हणून जे कार्य, ते काहीच नसते. अनुभवकथन हे लेखकाचे कार्य नव्हे तर अनुभवाच्या संयुगांना कल्पनेच्या रसायनात घुसळून एक नवीनच अद्‌भुत द्रव्य तयार करणे हे निर्मितीशील लेखकाचे

काम आहे. आत्मकथन व अनुभवकथन हा खऱ्या कलावंताचा पराभव आहे. हे कशामुळे होतेय? चांगल्या कलाकृती वाचायला मिळत नाहीत म्हणून वाचक आत्मकथनांकडे वळताहेत की चांगल्या कलाकृती निर्माण करता येत नाहीत म्हणून लेखक हा दुय्यम मार्ग स्वीकारताहेत ? काहीही असले तरी ह्या प्रवृत्तीने मराठीचा कलात्मक उत्कर्ष झाकोळला जाणे संभवते.

मराठी साहित्यव्यवहारातली आणखी एक विचित्र गोष्ट म्हणजे एकारलेल्या निरर्थक वादविवादांना मिळणारे महत्त्व. चाळीस-पन्नास वर्षांपूर्वी कलेसाठी कला की जीवनासाठी कला असा वाद होता. कला हे जीवनाचेच दर्शन आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ असताना हा वाद खेळण्यात काय हशील होते? त्याचा पायाच मुळी कच्चा होता पण तरीही अनेकांनी त्यावर बौद्धिक इमले चढविले. सध्याच्या काळातला असाच एक वाद म्हणजे देशीवाद. कुठलाही लेखक लिहिताना स्वत:च्या भाषेतूनच लिहिणार आणि त्याचा प्रदेश, समाज आणि संस्कृती यांच्या ऐतिहासिक भानातून त्याचे साहित्य प्रकट होणार ही गोष्ट उघड आहे. पण त्याचबरोबर जागतिक किंवा परभाषिक स्तरावर काय घडामोडी चालल्या आहेत, ते लेखक काय करू पाहतायत, कसे करू पाहतायत याचा मागोवा तो जागृतपणे घेत राहणार आणि त्या घडामोडींचा काही प्रभाव त्याच्यावर पडला तर तो पचवून पुढे जाणार ही गोष्टही तितकीच खरी आहे. असे असताना ह्यात वाद करण्यासारखे काय आहे? दोन्हीही प्रक्रिया वैध आहेत, निरंतर चालणाऱ्या आहेत. देशीयता ही 'कॉमन सेन्स' गोष्ट आहे. तिचा हिरीरीने पुरस्कार करण्याची काहीही गरज नाही. इंग्रजीत ज्याला 'नॉन इश्यू' म्हणतात अशा प्रकारचा हा वाद आहे. मराठीचे अभ्यासक-समीक्षक तो का खेळतात आणि स्वत:चा व समाजाचा वेळ, पैसा, शक्ती आणि संसाधने नाहक का खर्च करतात ते समजत नाही. वाद-विवादातून प्रबोधन होते हे बरोबर, पण काही काही वाद राजकारण्यांप्रमाणे लोकांना गंडवण्यासाठीच खेळले जातात बहुतेक.

पण अशा गोष्टी मराठी साहित्यात कायम घडत असतात. समाजासमोर वा साहित्यासमोर प्रश्न नाहीत असे नाही. अनेक उग्र, भीषण आणि जीवघेणे प्रश्न आपल्यासमोर आहेत. पण त्यांना समजून घेण्यासाठीची आवश्यक ती संवेदनशीलता आणि राजकीय-सामाजिक समज आपल्यामध्ये नाही. साहित्यव्यवहारात परस्पर आदर, सामंजस्य आणि निकोप वातावरण याऐवजी कंपूशाही, शुद्र राजकारण आणि वैयक्तिक अहंकाराचे स्तोम माजलेले आहे. जातीयवादाची लागण तर आहेच. गुणवत्तेचे निकषही ढिसाळ होत चाललेले आहेत. तुच्छतावाद हा तर मराठी साहित्यव्यवहाराचा खास गुणविशेष. मुळात ती ब्राह्मणी मनोवृत्तीची देणगी, पण आता तिचा प्रसार बहुजनवर्गातही झाला आहे. अशा साहित्यव्यवहारात लेखकांचे पोषण तर होत नाहीच उलट शक्तीपात होतो.

ह्या सोबतचे आव्हान मराठी भाषेच्या भवितव्याचे आहे. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे इंग्रजी फार प्रबळ झाली आहे आणि तिच्या रेट्यापुढे विभागीय भाषा हतबल होत आहेत असे चित्र दिसते. महानगरातील परभाषिकांचा लोंढा, दैनंदिन जीवनात हिंदी व इंग्रजीचा वाढता वापर, मराठी भाषिकांची भिडस्तवृत्ती आणि शालेय शिक्षणासाठी मातृभाषेऐवजी इंग्रजीचा स्वीकार यामुळे मराठीवर संकट ओढवले आहे अशी भावना सर्वत्र दिसते. यातील बाहेरच्या कारणांची मातब्बरी मला तेवढी वाटत नाही पण मराठी भाषिकांच्या मनातच भयगंड निर्माण होणे आणि त्यांनी त्यापायी

मराठीची हेळसांड करणे धोक्याचे आहे. संभ्रम मनात असणे साहजिक आहे पण त्यातून सत्वहीनतेचा जन्म होणे योग्य नाही.

या पार्श्वभूमीवर लेखकाचे कार्य काय असा प्रश्न पुढे उभा राहतो. या प्रश्नाला एक सनातन अंग आहे तर दुसरे तात्कालिक. सनातन अंग सर्वांना माहीत असणारे आहे. आपल्या भाषिक कृतीद्वारे लेखक एक सांस्कृतिक ऐवज किंवा ठेवा निर्माण करत असतो आणि त्यायोगे मानवी जीवन, संस्कृती आणि समाज अधिक दिव्य, शुभंकर आणि उन्नत करत असतो. हे काम न संपणारे आहे. तात्कालिक कार्य एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीचे आहे. गेल्या पन्नास वर्षांत मराठी साहित्याचा विस्तार बऱ्यापैकी झाला आहे. नेहमीच्या प्रतिमांच्या भाषेत बोलायचे झाले तर ते एका पठारावर येऊन पोहोचले आहे. भोवताली मोकळा, विस्तृत परिसर दिसतो आणि त्या परिसराचा धांडोळा घेण्याचे काम पुढची काही वर्षे पुरेल. पण ते करत असतानाच दूरवर जी शिखरे अंधुक दिसतात ती सर करण्याच्या कामालाही नेटाने लागले पाहिजे. कथा श्रेष्ठ की कादंबरी श्रेष्ठ असल्या निरर्थक वादात पडण्याऐवजी सर्वच वाङ्मयप्रकारात उंच, भव्य काम कसे करता येईल याच्या फिकीरीत आपल्याला असायला हवे. कलात्मकतेचा बळी न देता नवीन प्रयोग कसे करायचे हे एक मोठे कोडे आहे, ते प्रत्येकाने सोडवायची गरज आहे. याबरोबर हे पण लक्षात ठेवायला हवे की लेखन म्हणजे ऑलिंपिक स्पर्धा नव्हे की ज्यात एकजण पहिला आणि बाकीचे दुसरे तिसरे, पाचवे, दहावे असतात किंवा एकाच शिखरावर कोण आधी चढतो आहे असंही नाही. शिखरे अगणित आहेत. प्रत्येकाला अमर्याद अवकाश आहे. सभोवतालचा सर्व कल्लोळ विसरून, क्षुद्र अहंकार आणि तुच्छतावादाचा त्याग करून आणि आत्मसंतुष्टतेचा विळखा तोडून आपल्याला उंच उठायला हवे. आणि हे ही लक्षात ठेवायला हवे की आपली जर कुणाशी स्पर्धा असलीच तर ती जागतिक वाङ्मयात उत्तुंग कामगिरी केलेल्या लेखकांशी आहे. आपल्या-आपल्यातच नव्हे.

एकविसाव्या शतकासमोर उभे असताना म्हणून मनात संमिश्र विचार येतात. एका बाजूने आव्हानांची धग जाणवते. आपला समाज संभ्रमित आहे, आपली भाषा बावरलेली आहे, लौकिक समस्या फणा काढून उभ्या आहेत. ज्या भव्य कलात्मक यशाची आपण इच्छा करतो ते आपल्या कवेत कधी येईल की नाही अशी आशंकाही आहे. पण दुसऱ्या बाजूने मराठी भाषेचे अंगभूत सामर्थ्य आणि पूर्वसूरींचे संचित यामुळे आत्मविश्वास वाटतो, ईर्ष्याही वाटते. केवळ आपल्याच हातून नव्हे तर सर्वच सहप्रवासी लेखकांच्या हातून उत्कट, भव्य, बेदरकार निर्मिती व्हावी असे वाटते. तशी ती झाली तरच मराठीचे तेज झळाळून उठेल. लेखकांच्या कलात्मक उत्कर्षामध्येच भाषेचा उत्कर्ष दडलेला असतो आणि भाषेच्या सव्यापसव्यातूनच लेखकांना शक्ती प्राप्त होत असते. लेखकपणाचे भान हेच लेखकाचे हत्यार असते. ते ज्याच्याजवळ आहे त्याला कर्तृत्व गाजवण्यासाठी एकविसाव्या शतकासारखा दुसरा काळ नाही.

❑

मिलिंद बोकील
७, मुक्ता कॉम्प्लेक्स, अनिल पार्क, एरंडवणे, पुणे ४११००४.
फ़ोन : ५४४४२५२

# 'वेटिंग फॉर गोदो'

❑

## अतुल पेठे

❑

**मी** लेखन करणे थांबवून खरं तर खूपच वर्षं झालेली आहेत. ते सर्व विस्मृतीत जावे अशीच खरं पाहता इच्छा होती आणि आहेही. मी जे काही लेखन केले त्याला वस्तुत: फार अर्थ नव्हताच. त्यामुळे आपण लेखक वगैरे बिरुद मिरवावे असे त्या काळी जे वाटे ते आपोआप गळून पडले. ती मुद्दामून केलेली कृती नाही. मलाच अनेक प्रश्न पडू लागले. लेखन-प्रक्रिया म्हणजे काय? सर्जनशील लेखन म्हणजे काय? आधुनिकोत्तर लेखन आपण करतो का? अशा सिद्धीसाठी आपल्याला आपण जगताना कुठले आशय आणि कुठल्या शैली भावतात? लेखकाला जे भविष्य दिसायला हवे ते आपल्याला दिसते का? आपल्याला जे जे तत्कालिक काळात वाटते त्याला काही विशिष्ट राजकीय, सामाजिक संदर्भ आहेत का? आशयाच्या द्वारे नवा अर्थबोध आपण उलगडवून दाखवू शकतो का? इत्यादी अनेक प्रश्न. तेव्हा जर या साऱ्याला उत्तर नाहीच येत असेल तर थांबूच का नये ? आणि थांबलोच!!

मी लेखन का थांबवले या प्रश्नाकडे जाण्यापूर्वी मी लेखन तरी केले का, या प्रश्नाच्या उगमाकडे या निमित्ताने जातो. आता आमच्या घरात असलेला माणसांचा राबता आणि माझे आता या समाजातील विविध संघटना आणि व्यक्तींचे घनिष्ट संबंध पाहाता विश्वास वाटणार नाही की मी साधारण वयाच्या १८-१९ वर्षांपर्यंत अत्यंत एकलकोंडा आणि माणूसघाणा होतो. समूहाची भयाण भीती वाटताना एका अत्यंत असुरक्षित भावनेनं मी व्यापलेलो असायचो. मुळामुठा नदीवर जाऊन रुमालात मासे पकडत रहाणं आणि मोठ्या विस्तीर्ण झाडाच्या बुंध्यावर सावलीत झोपणं हेच आवडते उद्योग. सतत भीतीग्रस्त वाटायचं. काहीतरी वेगळंच जाणवायचं पण काय ते सांगताच येत नसायचं. भिकारी, बैरागी आणि गंजाडी लोकांबरोबर मात्र मी सुरक्षित असायचो. एक रामदासी होता. वृद्ध. त्याच्याबरोबर मात्र देवडीवर बसून वाटेल त्या



अतुल पेठे, जन्म १४ जुलै १९६४, एम्.ए.(मराठी).

आजच्या मराठी नाट्यसृष्टीतील एक उल्लेखनीय रंगकर्मी. नऊ एकांकिका, चार बालनाटके, चार प्रौढांसाठीची नाटके, दोन कादंबऱ्या असे प्रकाशित व अप्रकाशित साहित्य. अनेक नियतकालिकांतून सातत्याने रंगभूमीविषयक लक्षणीय लेखन. स्वत:ची दृक्श्राव्य आणि चित्रपट-निर्मिती संस्था.

अनुक्रमणिका

चर्चा करायचो. तसाच एक वारकरी होता. तो ओंकारेश्वरावर भेटायचा. गावागावांच्या गमतीजमती सांगायचा. मला ही माणसं फार आवडायची. घराजवळच स्मशान आणि नदीपात्राजवळील हिरवळ असल्याने संपूर्ण बालपण चित्रविचित्र गमती पाहण्यात-ऐकण्यात, अनुभवण्यात गेलं. याच्या उलट माझ्या घरचं वातावरण होतं ब्राह्मणी. मध्यमवर्गीय. त्यात आजूबाजूला पक्की खाकी चड्डी संस्कृती. मला आजही सांगता येणार नाही पण या सर्वांशी माझा संवादच नव्हता. भयानक वैताग आणि नैराश्य सतत मनात दाटलेले होते. पण हे एका विशिष्ट वयापर्यंत ठीक असते. पुढे पुढे आपलाच आपल्याला त्रास होऊ लागतो, तो सुरू झाला. माझ्या अस्तित्वाची बेदखल मलाच जाणवू लागली. अशा काळात कोणालाही भेटतेच ती कविता मला भेटली. शाळेत मागच्या बाकावर मान खाली घालून आक्रसून बसताना मी पानंच्या पानं कविता करू लागलो. मग कधीतरी हे बिंग फुटलं. मित्रांमध्ये पसरलं. थोडं कौतुक पदरात पडलं आणि वाटलं आपण कवीच! मग कवितांची वही. प्रत्येक कवितेला अनुरूप काढलेली चित्रं वगैरे. (पुढे तर या कवितांची वाचनंही मी केली!) कवितेतल्या सर्व प्रतिमा आणि प्रतिकं हीच! सरण, मरण, एकाकीपण, हिरवळ, दुपार, नदीकाठ इत्यादी. हे सर्व मी पुण्यात शनिवारपेठेत राहात असेपर्यंत चाललं. मग आम्ही घर बदललं. कोथरूडला आलो. शाळा बदलली. वर्गात मुली आल्या. विश्वच पालटलं. काहीतरी विचित्र वागून बोलून इतर जण हसतात हे सामर्थ्य जाणवलं. तेल-तिखट-मीठ-मसाला लावून माझ्या भंगड आयुष्याच्या मजा (अधिक थापा मारत!) मुलांना आणि विशेषतः मुलींना सांगू लागलो. या काळात कसे कोण जाणे, पण आरती प्रभू वगैरे सगळे पाठ झाले होते. मग सटासट कविता म्हणून दाखवायचो. अर्थातच आरती प्रभूंच्या! मला त्या म्हणताना शब्दसामर्थ्य आणि रचनांनी स्तिमित केलं होतं. कितीही नक्कल केली तरी त्यांच्या कवितांची मजा मला यायचीच नाही. मग माझी कविता सुटली. इतरांची मात्र आवडू लागली. आता या सगळ्या भाव मारण्याच्या प्रक्रियेत शालेय नाटक भेटलं. मग दहावीची परीक्षा कशीबशी उत्तीर्ण होऊन शिशुरंजन बालनाट्य संस्थेत शिबिरात दाखल झालो. वाटलं, ही असली नाटकं ढीगभर लिहू शकू. तशी मी लिहायचोही. दर आठवड्याला बसल्या बैठकीत एकांकिका नाहीतर नाटक. आता विषय बदललेले होते. वडील-मुलगा किंवा घर-मुलगा किंवा समाज आणि मुलगा अशी भांडणं, राडे! कुटुंबाविषयीचा आत्यंतिक तिरस्कार माझ्या मनात खदखदे. सीझनच्या हापूस आंब्याप्रमाणे आयुष्य म्हणजे तुच्छ तुच्छ वाटे. शक्य नव्हतं पण खून करावेत अशीच ऊर्मी मनात भरलेली असायची. मला माझं घर आणि आजूबाजूचा परिसर अत्यंत असंस्कृत वाटे. लग्न, मुंजी, डोहाळजेवणं, बारशी, केळवणं, सत्यनारायण किंवा दहावे बारावे-वर्षश्राद्ध. घटना कुठलीही असो माझं पिसाटलेपण कायम असायचं. मग यावर उतारा म्हणजे लेखन. आग ओकणारं, सभोवताल जाळून टाकणारं. यातूनच मी स्वतःला कुठल्या तरी नैतिक बेटावर उभं करायला लागलो. जाणवलेलं समजावून घेणं आणि त्याचं विश्लेषण करणं हेच गमावून बसलो. पण अर्थात हे त्यावेळेस उमजत नव्हतं. मला अभिव्यक्त व्हायला आणि आत्मसन्मान द्यायला मी जे लिहीत होतो ते पुरेसं होतं. पण यामुळे मी लेखक आहे असं लोक समजू लागले आणि

काही काळ मीही तसं समजू लागलो. मी तर हनुवटीवर बोट ठेवून फोटोही काढून घेतले होते. किंवा मग विचारमग्न मुद्रा किंवा एकांत आणि चिंतन. असले रोग लागले. पण सुदैवाने या काळात भा. रा. भागवत, लीलावती भागवत भेटले. त्यांची नात माझ्या नाटकात होती. तिच्याकडे विजय तेंडुलकर यायचे. मग मी तेंडुलकरमय झालो. कोवळी उन्हे, फुगे साबणाचे आणि त्यांची नाटके मानगुटीवर बसली. मग तसे स्फुट लिखाणही मी केले. विठ्ठलराव तिनइकरांसारखे एक व्यक्तिचित्र माझ्याही स्फुट लेखनातून डोकावू लागले. तर नाटकात क्रौर्य, हिंसा, वासना प्रकट होऊ लागल्या. याच काळात मी एकांकिकाकार बनलो. चेस, क्षितिज, अवशेष ही त्याच छायेतील नाटके होती. अर्थात तेंडुलकरांची कुठलीच झेप त्यात नव्हती. पण बिनधास्त आणि बेधडकपणा त्यात होता. यात भरीला भर म्हणून पुरुषोत्तम लेखनाचे बक्षीस वगैरे मिळालं. म्हणजे खतपाणीच झालं. पुढे मग थिएटर ॲकॅडमीच्या फोर्ड फाउंडेशन कार्यशाळेत लेखक म्हणून निवड झाली. आणि नाटक लिहिलं. त्या नाटकावर इतकी बेछूट टीका झाली की पुढे मी आत्महत्याच कशी केली नाही याचे आश्चर्य वाटते. या कार्यशाळेत मात्र लेखन म्हणजे काय आणि लेखक म्हणजे काय याची धूसर जाणीव आत खोलवर झाली. त्यानंतर मात्र लिखाण मंदावले. आपले अनुभव तीव्रतेने जाणवून कागदावर उतरवणे म्हणजे लेखन यापुरते माझे विश्व सीमित राहिले नाही. त्यापलीकडे जायला हवं ही जाणीव, हे आत्मभान आले. या सगळ्यांतून तावून सुलाखून मी नोकरीला लागलो. नाशिकला गेलो. शिक्षण अर्धवट सुटलेले होते. आत्मविश्वासाचा अभाव होता, पण अर्धमुर्ध का होईना आपल्याला काहीतरी अभिव्यक्त व्हायला येतंय ही जाणीव झाली होती. थिएटर ॲकॅडमीत असतानाच सतीश आळेकर भेटले. त्यांच्या नाटकांनी तर माझे विश्वच पालटले. हे असं येईल आपल्याला लिहिता? ते पण लिहितात की वडिलांबद्दल, कुटुंबाबद्दल. पण ते किती वेगळं असतं आपल्याहून, असं वाटू लागलं. त्यांचं लिखाण हा सार्वत्रिक अनुभव वाटायचा आणि माझा अनुभव मात्र माझ्यापुरताच आहे असं जाणवू लागलं. त्यातच घाशीराम, तमाशा, पडघम नाटकातून मी अभिनेता म्हणून भारतभर हिंडलो. इतरांची नाटके पाहिली, वाचली, अनुभवली. फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये चित्रपट पाहिले आणि आधीचे सारे गळून पडले.

नाशिकला आल्यानंतर 'वेटिंग फॉर गोदो' नाटकाने तर शेवटचा घाला घातला. नाटकाचं लेखन म्हणजे काय याचा प्रत्यय आला. त्यातून बेकेटची माहिती वाचली आणि लेखक म्हणजे काय असतो यालाच धक्का बसला. याच काळात इथे श्याम मनोहर, कमल देसाई, भालचंद्र नेमाडे, अरूण कोलटकर, नामदेव ढसाळ, दि. पु. चित्रे, मनोहर ओक, भाऊ पाध्ये, बा.सी.मर्ढेकर, मनोहर शहाणे भेटले. लेखनाविषयी स्वतंत्र आदर वाटू लागला. आता या सर्व धबडग्यात मला असंही वाटू लागलं की आपणच अभिनेते, लेखक, दिग्दर्शक, संस्थाचालक हे भयानक आहे. तेव्हा काही जबाबदाऱ्या खाली ठेवू. त्यातली पहिली ठेवली ती लेखनाची. त्यातल्या त्यात जेव्हा ऊर्मी येई तेव्हा इतरांच्या आयत्या साहित्याचे नाटकात रूपांतर करता येऊ शकते हे कळले होते. श्याम मनोहरांच्या कादंबरीवर आधारित 'शीतयुद्ध सदानंद', शंकर पिल्लाईच्या 'इन द सर्च ऑफ ब्लॅक गॉड' वर आधारित 'शोध अंधार अंधार' किंवा मर्ढेकरांच्या











कादंबऱ्यांवर नाट्यरूपांतर केले. हे सर्व एकाच वेळी घडत होते. यातच मला समकालीन लेखक भेटले. त्यातला महत्त्वाचा म्हणजे मकरंद साठे. त्याने मला आशयदृष्ट्या पुढे नेले. तेंडुलकर, आळेकरांहून अगदी वेगळी शैली असणारा हा गुंतागुंतीचा आशय व्यक्त करणारा आजचा लेखक वाटला. मकरंदबरोबरच्या चर्चांमधून तर विस्तीर्णताच आली. मला श्याम मनोहर, मकरंद साठे हे अस्सल लेखक वाटू लागले. वेगळ्या संवेदनशीलतेचे अदभुत् सत्य वास्तवातून काढून अर्थ प्रकट करणारे असे. माझा ओढा अशाच लेखकांकडे राहिला. जगण्याला व्यापून राहणारे लेखन मला हवेहवेसे वाटू लागले. त्यांच्याबरोबर मला माझेच लेखन हे एका मर्यादित फिरणारे वाटू लागले होते. आपलं आयुष्य आणि त्यातले मर्यादित अनुभव हे किती ताणायचे वाटू लागलं. त्यातून त्यांचं लिखाण इतकं पटायचं की बस्स. बरं ते लिहीत असताना चर्चा व्हायच्या. त्यात मी माझे अनुभव त्यांना सांगायचो. त्याचा (कदाचित) त्यांना फायदा व्हायचा. पुढे डॉ. सदानंद मोरेंबरोबर हा अनुभव कामी आला. मी लेखन-प्रक्रिया म्हणजे काय असते हे समजलेला लेखक असल्याने डॉ. मोरेंना नाट्यलेखन करण्यास उद्युक्त केले.

आता या टप्प्यावर मात्र दिग्दर्शक म्हणूनच माझी स्वत:ची ओळख पटलेली आहे. पण यात माझे लेखन सतत डोकावतच असते. माझ्या नाटकांवर त्याची सावली पडलेली असतेच असते. माझे कवितालेखन, नाट्यलेखन जरी थांबलेले असले तरी दूरदर्शनसाठी लिहिताना मात्र मी माझे संहितालेखन मीच करत आलेलो आहे. शैक्षणिक अभ्यासक्रमावर आधारित ध्वनिचित्रफिती बनविताना मी थोडा लेखक असल्याचे फायदे होतात. मुक्त विद्यापीठाचे जे दृकश्राव्य कार्यक्रम मी लिहिले ते त्यामुळे इतरांपेक्षा जास्त सरस ठरले. याचबरोबर सातत्याने आपल्याला काम करताना आलेले अनुभव मी वृत्तपत्र, दिवाळी अंकातून गांभीर्याने मांडत राहिलो. त्यातही फार आनंद मिळतो. योग्य शब्दांची निवड करताना लेखन प्रवाही आणि संवादी कसे करावे हे मी देविदास बागुलांकडून शिकलो. त्यामुळे तूर्तास जरी वरवर पाहता लेखन थांबलेले असले तरी अशी उसळी मारून ते वरवर येत रहातेच.

लेखन म्हणजे फक्त उचंबळून आलेल्या भावना येथपर्यंतच न राहता, लेखन म्हणजे सर्जन येथपर्यंत मला जाता येईल का या प्रश्नातच असल्याने मी लेखनाला अजूनपर्यंत तरी 'विराम' दिलाय हे मात्र खरे. जगभरच्या चांगल्या लेखकांनी तर या विरामाला आता अर्थही प्राप्त करून दिलाय. फक्त स्वत:च्याच जगण्याला कवटाळत बसण्यापेक्षा अखिल मानव जातीच्या जगण्याला साद घालणारी ही प्रक्रिया असावी असे वाटते. काहीतरी असे तत्त्व हाती गवसावे असे वाटते की ज्यामुळे ते स्थल, काल, देशाच्या सीमा ओलांडून कुणालाही जवळचे वाटेल. एकच एक अर्थ संवादित होण्यापेक्षा बहुस्तरीय, व्यापक अर्थघनता लेखनात यावी असे सतत वाटत राहते. अर्थातच या प्रतीक्षेत आनंद वाटतोय.

❑

अतुल पेठे, विनित सोसायटी, कोथरूड,
पुणे ४११ ०२९. फोन : ५४२१३५५.



अनुक्रमणिका

# अपुऱ्या इच्छांचं लिहिणं

❑

राजन खान

❑

लेखकाच्या लिहिण्याच्या प्रेरणेत एकच एक कोणता तरी विशिष्ट घटक असतो, असं मला वाटत नाही. अनेक घटकांचा, मानवी जगण्याच्या अनेक मितींचा समुच्चय होऊन तो लेखकाला लिहायला उद्युक्त करतो, लिहायची ऊर्मी, प्रेरणा देतो आणि त्याचा हात कायम लिहिता ठेवतो, असं मला वाटतं. ते अनेक घटक, त्या अनेक मिती सांगता येणं अशक्य नाही, पण अवघड आणि किचकट आहे. कोणताही लेखक मी का लिहितो किंवा का लिहायला लागलो हे नीट, स्पष्ट अणि एकाच एका ठाम उत्तरानं सांगू शकत नाही. प्रेरणेचा हा मामला साधा, सरळ, एकमार्गी आणि एकाच मुद्द्यावर केंद्रित असा नसतो, तर त्यात लेखकाच्या सगळ्या आयुष्याचे संदर्भ आणि त्याला ज्ञात असलेले जगाचे भूतकाळापासूनचे संदर्भ यांची प्रचंड गुंतागुंत असते. ती सगळी गुंतागुंत शब्दांत मांडणं ही अवाढव्य गोष्ट ठरेल. विशेषत: ज्याला आपला मेंदू चालवून कल्पनारम्य असं ललित साहित्य लिहायचंय, त्याला ही गुंतागुंत उलगडून दाखवणं हा आणखी अवघड वाटणारा प्रकार आहे. वैचारिक, संशोधनात्मक असं जे साहित्य, त्याचे हेतू आणि प्रेरणा सांगता येणं एक वेळ सोपं आहे, पण ललित, जे फक्त मेंदूच्या बळावरच अवलंबून आहे, ते साहित्य का जन्माला घातलं जातं, त्याचे हेतू काय आणि प्रेरणा काय हे सांगता येणं कठीण कर्म आहे.

आयुष्यात सर्वात पहिल्यांदा का लिहावंसं वाटलं हेही तो कालखंड नजरेसमोर आणून त्यातल्या त्यात मोघम सांगता येतं. पण त्या पहिल्या लिहितं होण्याच्या मागंही अनेक संदर्भांची रेलचेल असते आणि ती जशी आहे, तशी एकसलग मांडता येणं मुश्किल काम असतं.

एक गोची अशी होती की, वाचणाऱ्यांकडून बऱ्याचदा तुम्हांला ती अमुक कथा किंवा ती अमुक कादंबरी कशी सुचली, असा प्रश्न विचारला जातो. विशिष्ट अशा एकाच साहित्यकृतीची निर्मितिप्रक्रियाही मला कधी नीट सांगता येत नाही. कारण ती विशिष्ट



राजन खान
● मराठीतील आजच्या पिढीचे एक उल्लेखनीय कथाकार आणि कादंबरीकार.

साहित्यकृती कधीही एका सटक्यात मेंदूत जन्माला आलेली नसते. मेंदूत तिची जडणघडण सतत चालू असते आणि त्यात आयुष्याच्या सगळ्याच घडामोडींमधून निर्माण होणाऱ्या संदर्भांची सरमिसळ सतत होत असते. लेखक म्हणून जगताना मेंदू कायम लिहिण्याच्याच उलथापालथीत कार्यमग्न असतो. पण एखादी साहित्यकृती एका दमात सुचते असं होत नाही. लेखक मेंदूत येणाऱ्या प्रत्येक विचारातून, या विचारावर आपल्याला लिहिता येईल का याची शक्यता अजमावून पाहत असतो आणि जो विचार त्याला लिहिण्याचा जास्त मोह पाडील, त्यावर तो लिहिण्याचा कच्चा-पक्का प्रयत्न सुरू करतो. त्या प्रयत्नात तो डोक्यात आधीपासून पडून असलेले इतर पूरक विचारही वापरू पाहतो आणि विचारांच्या सरमिसळीच्या खेळातून साहित्यकृती आकार घेत जाते. त्याच्या मेंदूत तोवरच्या त्याच्या वयापर्यंतचं त्या साहित्यकृतीला पूरक असं आकलन तो वापरत राहतो आणि साहित्यकृती घडत जाते. पण हे आकलन जे आहे, ते काही एका रात्रीत घडत नाही. ते समज येण्याच्या त्याच्या वयापासून त्याच्यात घडत असतं. त्या घडणीत अनेकानेक संदर्भ असतात, घटक असतात. ते सगळे मिळूनच त्याच्या त्या विशिष्ट साहित्यकृतीची प्रेरणा ठरतात. त्यामुळं प्रेरणेबद्दल बोलताना तिची फक्त ढोबळ उठाठेव करता येते, पण तीच सूक्ष्मता, तिच्यातील संदर्भांचे एकमेकांत गुंतलेले धागे यांचा सगळाच्या सगळा उलगडा शक्य होत नाही. प्रत्येक लेखकाची हीच अडचण होते. माझीही होते. त्यामुळं मी आजवर एका कृतीमागची किंवा एकूण लेखकी जगण्यामागची प्रेरणा कधीही नीट सांगू शकलेलो नाही. ढोबळ प्रयत्न मात्र अनेक झालेत.

मला पुसट असा कलेचा वारसा आहे. तो फारसा ठळक नाही आणि माझ्यावर प्रभाव पडण्याइतका मला परिचितही नाही. माझे आजोबा एका खेड्यात गावच्या जत्रेत, अडाणी लोकांना एकत्र करून नाट्यप्रयोग बसवायचे. त्या नाट्यप्रयोगांच्या कधी मी लोकांच्या तोंडून मोघम ऐकल्यात, प्रत्यक्षात ते प्रयोग पाहायची संधी मला कधीच मिळाली नाही. गाव वायफट लोकांचं होतं. पण आजोबांनी त्या गावात देवळात भजनं सुरू केली. त्यांचं हस्ताक्षर सुंदर होतं. तिरकं आणि दमदार. (ते मात्र मी पाहिलंय) त्यांना चार भाषा यायच्या. अस्खलित. ते कवनं करायचे. त्यांना बडबडायची आणि किस्से सांगायची सवय होती. ते माणूस म्हणून स्वाभिमानी पण साधे होते. थेट बोलायचे. मी लहान असताना वडील गोष्टी लिहायचे. क्वचित कविताही. त्या सहसा भुताखेतांच्या किंवा रहस्याच्या असायच्या. कुठकुठं छापूनही आल्या होत्या. पुढं त्यांनी लिहिलं नाही. कदाचित वेळ नसल्यानं किंवा लिहिण्याचं महत्त्व वाटत नसल्यानं. ते छान किस्सागो आहेत. माझी आई पण गोष्टी रंगवून सांगायची आणि आम्ही कसं वागावं ते सांगत राहायची. मी लेखक आहे, असं मानलं तर माझ्या लहानपणात या तिघांचे संस्कार जे कळत नकळत माझ्यावर झाले, त्याचा वाटा मानावाच लागेल. त्यांचं जगणं, त्यांची वर्तणूक यांचा माझ्या लिहिण्याच्या प्रेरणेतला हिस्सा अबाधित.

आयुष्यात सुरुवातीला जेव्हा लिहिलं, तेव्हा आपण का लिहायचं हे मला कळत नव्हतं. पण आपण लिहायचं असतं हे मात्र कळलं होतं आणि कोणताही आवताव न आणता, येता लिहायला सुरुवात झाली होती. लिहावं वाटणं ही सहज गोष्ट होती. जेवावंसं वाटतं, झोपावंसं

वाटतं, अगदी तशीच. एकदा कधी तरी लिहिण्याचा पहिला क्षण आयुष्यात आला आणि नंतर लिहिणं निरंतर सुरू झालं. तो पहिला क्षण नेमक्या कुठल्या एका प्रेरणेतून किंवा ऊर्मीतून आला असावा, असं मला वाटत नाही. अकरा-बाराच्या वयाचा होतो मी तेव्हा. मानसिक पातळीवर एकटा पडल्यासारखंही काहीतरी झालं असावं. त्या आधीची दोन-तीन वर्षं मला आठवतात. शाळा, अभ्यास यांचा कंटाळा मनात भरला होता. घरातल्या परिस्थितीबद्दल, वातावरणाबद्दल काहीसा उद्वेग मनाशी होता, भोवती हवे तसे सवंगडी नव्हते. घरात, बाहेर एकटं पडल्यागत वाटत होतं. त्या वयाची इतर पोरं जे काही करतात, तसं काही माझं चाललं नव्हतं. खेळणं होत नव्हतं. शाळेपासून भरकटलो होतो. आजोबांपासून थोडा दुरावलो होतो. आई-वडिलांमधल्या तणावाचं दडपणही मनावर होतं. इतर नातेवाईक ढिगानं, पण मानसिक गुंतवणूक करावी असं कुणी नव्हतं. ते आपल्याला हीन लेखतात, असं वाटायचं. मन इतरांशी स्पर्धा करावी अशी इच्छा धरायचं, पण तशी आपली परिस्थिती नाही, असं जाणवायचं. वयात येण्याच्या आधीचा तो पहिला टप्पा होता आणि मानसिक जाणीवजागृतीचाही. त्या काळात आधार होता तो वाचनाचा आणि चित्रं काढण्याचा. हाती पडेल तो छापील कागद वाचायचा आणि हाती पडेल त्या कागदावर चित्रं काढायचा नाद लागला होता. त्यातून मनाचं एकटेपण थोडं भरलं जात असावं. त्या काळात रहस्यकथा वाचायला मिळाल्या. त्या रोमांचक होत्या आणि त्याही आधी रोमांचक स्वप्नरंजनं करायचीही सवय लागली होती. एकोणीसशे एक्काहत्तरचं भारत-पाक युद्ध आणि त्याच वर्षीचा दुष्काळ यांचा माझ्या बालमनावर रोमांचक (गुलछबू अर्थानं नव्हेत) परिणाम झाले होते. त्यांची रोमांचक उत्तरं माझ्याकडं होती. खेड्याचं जगलो होतो, तालक्याचं जगलो होतो, जिल्ह्याचं जगलो होतो, महानगरीचं जगलो होतो, त्यांच्यातलंही रोमांचकपण अंगात भिनलं असावं. आसपास अनेक लोक होते. त्यांच्या चर्चा होत्या. त्यांच्यातून पैसा, धर्म, नरनारी, जाती, इतिहास, प्रचलित काळ यांच्यातल्या भेदाभेदांच्या प्राथमिक जाणिवा होत होत्या. माणसांचे नमुने आणि स्वभाव मनावर ठसत होते आणि या सगळ्यांत असून मी कशातच नव्हतो. मला आठवतं, स्वप्नरंजनातलं रोमांचकपण अंमलात आणता येत नाही, याची एक उदासी मनात तरळत असायची. माणसांच्या बोलण्यांमध्ये दु:ख, वेदनांचं गागणं, विव्हळणं असायचं, एकमेकांशी झगड्यांचे विषय असायचे आणि त्यांनी तसं असू नये म्हणून काहीतरी जादू करावीशी वाटायची. पण ते शक्य नाही, हे लक्षात यायचं अन् दु:ख व्हायचं. खूप खुजं, हतबल वाटायचं. त्यातून येणारा एकटेपणा. मला आठवतं, मी नऊ वर्षांचा असताना एका मनोऱ्याचं आणि वर आभाळात उडणाऱ्या एका पक्ष्याचं चित्र काढलं होतं. नाव दिलं होतं — एकटा. एकदा पाण्यात तरंगणाऱ्या एकट्या होडीचं चित्र काढलं होतं. (हा चित्रं काढायचा नाद कुठनं लागला होता, कळत नाही. एकदा निवांतपणी त्याचा धांडोळा घ्यायला हवा. पण हा नाद बराच काळ टिकला. पुढं त्यात काही छुटमुट बक्षिसंही मिळाली. पण पुढं चित्रं काढण्यास काही अपुरेपण, काही तांत्रिक बांधिवपण जाणवलं असावं आणि त्यातून मोकळीक हवी वाटली असावी. पण चित्रांमुळं कागदांशी खेळण्याची सवय जडली असावी आणि मन

मांडायला कागदावर लिहिणं जास्त योग्य वाटलं असावं. लिहायला सुरुवात झाल्यावर चित्रं मागं पडली.) हे एकटेपण, चित्रं, वाचन आणि भोवतालची माणसं, स्वप्नरंजन यांच्या समुच्चयातून कधीतरी मग लिहावसं वाटलं असणार आणि मी लिहू लागलो असणार. त्यातच कुठंतरी तो प्रेरणेचा क्षण दडलेला आहे, पण तो काटेकोर चिमटीत पकडून दाखवणं अशक्य आहे. कारण तोवरच्या माझ्या आयुष्याचा प्रत्येक घटक मला त्या लिहितं होण्याच्या क्षणाकडं ढकलत होता (हे आज कळतं). त्यामुळं लिहितं होणं हे एका दमात घडतं आणि त्याला एकच एक प्रेरणा घडली, संस्कार घडला असं म्हणता येत नाही. प्रेरणांची अनेक सूत्रं त्या लिहित्या होण्याच्या क्षणाशी निगडित आहेत.

लिहिण्याचा नाद लागला आणि आयुष्य जरा दिलासलं. स्वत:त मग्न राहायला तो आधार बरा ठरला. तेव्हा विषयांना बंधनं नव्हती आणि काही एका विशिष्ट पठडीतलंच लिहिलं पाहिजे, असा खास संस्कारही नव्हता. साहित्यातल्या मांडणीचे भेद तर तेव्हा ज्ञातही नव्हते. हे सामाजिक, हे धार्मिक, हे वैचारिक, हे ललित असं काही कळत नव्हतं. बास, लिहायचं, एवढेच. पुढं संपादन, लेखन असा व्यवसाय करताना एक निरीक्षण असं घडलं की, बहुतेक लिहित्या लोकांच्या लेखनाची सुरुवात सहसा काव्यलेखनापासून होते. माझं तसं झालं नाही. मी पहिलं गद्य लिहिलं. त्याचं कारण कवितेशी तेवढा आत्मीय संबंध नव्हता आणि वाचनात गद्य पुस्तकं होती, हे असेल. कविता आयुष्यात आली ते सोळाव्या-सतराव्या वर्षी. (एक निरीक्षण असं की बहुतेक जण त्या वयात कवीच असतात. त्यातल्या बऱ्याच जणांचा पुढच्या तीन-चार वर्षांतच कवितेचा नाद सुटतो, पण ज्यांचा टिकतो, ते पुढं कवी होतात.) अगदी पहिलं जे लिहिलं ते पुन्हा दीर्घ गद्य होतं. फार पुढं कळलं की, तसल्या लिखाणाला कादंबरी म्हणतात. ते फार दमदार असेल असं आता वाटत नाही. पण त्या वयाच्या आकलनाच्या मानानं ते दमदारच असणार. पण गंमत म्हणजे माझं छापून आलेलं साहित्य, एक कविता होती. वय सोळाचं होतं तेव्हा जीवन, मरण, आयुष्याची अनिश्चितता असा कवितेचा विषय होता. अठराचा असताना पहिली कथा छापून आली, तिचाही विषय एका म्हाताऱ्याच्या आयुष्याचा शेवटचा दिवस असाच होता.

आता विचार करतो तेव्हा लक्षात येतं की, लिहिणं हा श्वासाइतकाच महत्त्वाचा भाग आहे. मनात सतत भोवतालाबद्दल अनिश्चितता असणं हाही माझ्या जगण्याचा अविभाज्य भाग आहे. तशात माझं जगणं लिहिण्यानं तोलून धरलं, ते मला जगण्याचीच प्रेरणा देत राहिलं. लिहिणं नसतं तर आयुष्यात मी काय केलं असतं, मला नाही सांगता येणार. त्याची कल्पनाही मला करता येत नाही. पोट पाळण्याचे उद्योग मीही इतरांप्रमाणे विपुल केले, पण मनाचं जगणं, माणूस म्हणून खरं जगणं हे लिहिण्यातच राहिलं. लिहिण्याचा नाद जडल्यावर जे कळलंय-आकळलंय ते कागदावर ओतत राहणं हेच जगणं झालं आणि आज अशी भावना आहे की, आपण आपलं जगणं कागदावर उतरवत राहतो. आपल्याच मनाच्या, मेंदूच्या, शरीराच्या जगण्याचा प्रत्येक कंगोरा शब्दांकित करण्याची कोशीत करत राहतो. याशिवाय लिहिण्याचा दुसरा उद्देश मला कळत नाही.

आज कळतं, जगणं आडवंतिडवं असल्याशिवाय चांगलं आणि मोकळं लिहिता येत नाही. त्या आडव्यातिडव्या जगण्याचे उभे-आडवे धागे सततच्या लिहिण्याची प्रेरणा होत राहतात. नेहमी नवनवं वाचणं, नव्यानव्या ठिकाणी जाणं, नव्यानव्या क्षेत्रांमध्ये घुसून पाहणं, नवनवी माणसं भेटत राहणं, आतल्या आत मतंमतांतरांचा झगडा असणं, सतत बडबडत राहणं, नवनवी स्वप्न पाहणं या गोष्टी आपलं लिहिणं चालतं-बोलतं ठेवतात. व्यवहारी जगण्याच्या जेवढ्या म्हणून पातळ्या आहेत, त्यातल्या जास्तीत जास्त पातळ्यांचा अनुभव घेत राहणं तर लिहिण्याला आणखी भक्कम आणि नि:संकोच करत जातं. आडवंतिडवं जगणं म्हणजे दिशाहीन भरकट असू शकते, पण जगण्याला लिहिण्याची मिती असेल तर ती दिशाहीन भरकटही लिहिण्याशी सुसूत्र होत राहते. भरकटीनं आयुष्याची वाताहात होऊ शकते, पण लेखकी जगण्याचा पाया असेल तर ती वाताहात टळते किंवा वरवरची ठरते आणि उलट पाया मजबूत करायला पूरक ठरते. लेखक जगण्याच्या इतर व्यवहारांमध्ये हरला काय किंवा जिंकला काय, त्या दोन्ही गोष्टी त्याला लिहिण्यात उपयोगी आणि समृद्ध करणाऱ्याच ठरतात. या नजरेनं मला माझ्या आयुष्याचा प्रत्येक दिवस हा समृद्धीनं ओतप्रोत असाच वाटत आलाय. त्या अर्थानं माझ्या आयुष्याचा कोणताही दिवस वाया जात नाही. तो प्रत्येक दिवस सवय झाल्याप्रमाणे किंवा विकार जडल्याप्रमाणे लिहिण्याच्या प्रेरणेचाच असतो.

आज साहित्यसृष्टीत वावरताना असंही लक्षात येतं की, प्रत्येक लेखकाचं लिहिणं कुठल्या तरी एका झापडबंद कप्प्यात कोंबून मगच त्याकडं पाहण्याची त्या स्वत: लेखकाची आणि त्याच्या वाचनाशी संबंधित असणाऱ्या सर्वांचीच वृत्ती असते. त्यात म्हणे त्या लेखकाची आणि त्याच्या लिखाणाची अस्मिता असते. लेखकाला किंवा लिखाणाला अस्मिता असावी हे मला पटत नाही. तो प्रकार एकांगी, एकारलेला आणि प्रचारकी ठरतो. लेखक हा फक्त लेखक असावा, तो कुणाचाच नसावा. लेखन हे फक्त लेखन असावं आणि ते सर्वांचंच असावं. लेखन हे नेहमी निर्विकार, निर्विष आणि तटस्थ असावं. कुणा एका बाजूचं किंवा कुणा एका कप्प्यातलं नसावं. कोणत्याही भेदाची दावणी लेखक आणि त्याच्या लेखनाच्या गळ्यात नसावी. मला स्वत:ला आपण आणि आपलं लेखन तसं असावं, असं वाटतं. तसे काही संस्कार माझ्या मनावर आणि मेंदूवर आहेत, असं मला वाटतं. ते संस्कारही माझ्या लेखनाची प्रेरणा आहेत. मी लेखक म्हणून शहरी नाही न् ग्रामीण नाही. गरीब नाही न् श्रीमंत नाही. मी जगातल्या भेद करणाऱ्या कोणत्याही विचाराचा, वादाचा नाही. कोणत्याही जातीचा नाही न् धर्माचा नाही. जगाचा मागचा सगळाच्या सगळा इतिहास मला माझा इतिहास वाटतो. त्यामुळं इतिहासातलं हे अमुक माझं नाही न् ते तमुक माझं नाही, असं मी म्हणत नाही. कोणत्या तरी एकाच मुद्द्याचा अभिमान बाळगून त्याचाच फक्त ढिंढोरा पिटावा, असं मला वाटत नाही. मला कशाचाच अभिमान वाटत नाही. हे सगळं जग, त्याच्या सर्व काळांसह मला माझं वाटतं, पण त्यातले कृत्रिम भेद मला माझे वाटत नाहीत. मी फक्त माणूस आहे. लिहिणारा माणूस. माणसाचे मूलभूत क्रियाकलाप करणारा आणि श्वास घेणारा. लिहिता येतं म्हणून लिहिणारा. काय लिहायचं हे माझं ठरलेलं नाही. आपल्याला जमेल ते काहीही

लिहायचं एवढा नाद मी बाळगलाय. त्यात कुठलंही मुद्दामपण बाळगावं, असं मला वाटत नाही. लिहिणं म्हणजे कागद, लेखणी आणि मी एवढ्यांचाच व्यवहार आहे. तो व्यवहार कशासाठी ? तर तो माझ्या आतल्या जगण्याचा भाग आहे. (आणि आपण सगळेच जण खरं तर आपलं आतलंच जगणं जगत असतो. आतलं जगणं हेच खरं जगणं असतं.) मेंदूत काही तरी चालू असतं, पूर्वजांनी भाषा, कागद, शाई अशा गोष्टींचा शोध लावून त्या मला बहाल केल्यात, तर त्यांच्या आधाराने मी माझा मेंदू मूर्त रूपात मांडायचा प्रयत्न करतो. ते केल्यानं मला मी जगणं जगत असल्यागत वाटतं. लिहिणं म्हणजे कागदावर आपला मेंदू मांडणं, एवढंच आहे. पण माझा मेंदू कुणा एकाच बाजूनं, कुणा एका भेदाचा आधार घेऊन मांडला जाऊ नये, असं मला वाटतं. ते वाटणं, मला वाटतं, माझ्या संस्कारांतून आलंय. आणि ते संस्कार व्हायला माझं आडवं-तिडवं जगणं, माझे आई-वडील, त्यांचेही आई-वडील आणि पूर्वज असलेला मागचा सगळाच्या सगळा काळ कारणीभूत आहे, असं मला वाटतं.

हे सगळं जग मला आपलं वाटतं आणि त्याच वेळी ते मला आपलं वाटतही नाही. सगळ्याच जगाबद्दल एक ओलावा असतो आतल्या आत आणि त्याच वेळी एक कोरडेपणासुद्धा. तशाच पद्धतीचा काही एक स्वभाव तयार झाल्याचं स्वत:लाही जाणवतं. धड इकडं नाही न् धड तिकडं नाही. एकांगी नाही. मधूनच जाणारा. समन्वयी किंवा तटस्थ. तोच स्वभाव लिहिण्यात उतरत असणार. उतरतोच. आणि स्वभाव जन्मजात असतो. सगळ्यांना कवेत घेण्याचा जर स्वभाव असेल, तर मला वाटतं, तो माझ्या कर्तृत्वाचा भाग नाही, तर माझ्यावर संस्कारांच्या सर्व माध्यमांतून झालेल्या संस्कारांचा भाग आहे. आणि मी असंच का लिहितो किंवा तसंच का लिहितो, काय लिहितो अणि कशाला लिहितो, या प्रकारच्या सर्वच प्रश्नांची उत्तरं माझ्यावरच्या संस्कारांमध्येच आहेत. त्या संस्कारांमध्ये मी जन्मल्यापासून माझ्या आयुष्यात आलेली, येणारी सर्व माणसं, सर्व प्रदेश, माझ्या पंचेंद्रियांवर परिणाम करणारे सर्व घटक आणि होणाऱ्या प्रत्येक जाणिवेचं स्वत:च्या पद्धतीनं विश्लेषण करणारं मन यांचा समावेश आहे. त्यामुळं प्रेरणा म्हणजे, बोटांच्या चिमटीत पकडून दाखवता येणारा एकच एक मुद्दा असतो, असं मला नाही वाटत. लोकांना सांगता येत नाही की, बघा, बघा, ही दिसतेय ना हीच माझी प्रेरणा ! प्रेरणा ही न दिसणारीच गोष्ट आहे. तिला शब्दरूप देणंही महान अवघड गोष्ट आहे. एखादा लेखक नुसता स्वत:च्या प्रेरणेबद्दल लिहीत राहिला तर आयुष्यभर त्याला दुसरं काही लिहायलाच नको, एवढं ते सविस्तर आणि कधीच न संपणारं काम आहे.

त्यापेक्षा लेखकानं त्याला वाटतं, जाणवतं, सांगावंसं वाटतं, त्या विषयांवर लिहीत राहावं. त्याच्या सततच्या लिहिण्यातून त्याच्या प्रेरणा अध्याहतपणे व्यक्त होत राहतात. त्याच्या हातून उमटणाऱ्या प्रत्येक शब्दामधून, तो रंगवत असलेल्या प्रत्येक कागदामधून त्याच्या प्रेरणा पाझरत असतात. (त्याशिवाय तो लिहूच शकत नाही.) ज्या कुणाला एखाद्या अमुक लेखकाच्या लिहिण्याच्या प्रेरणा शोधायच्यात, त्यानं, लेखक आयुष्यभर जेवढे कागद रंगवतो,

तेवढे सगळे वाचले पाहिजेत. त्याचं सगळं वाचत राहिलं पाहिजे. त्यातून त्या लेखकाच्या सगळ्या प्रेरणांचा साक्षात्कार त्या वाचणाराला होऊ शकतो. लेखकाचा स्वभाव, लेखनाचा उद्देश यांची जाणीव होऊ शकते. लेखकाला इत्यंभूत ओळखायला ही एवढीच एक पद्धत फार सोयीस्कर आहे.

आणि एवढं असूनही मला, लेखक म्हणून, आज आपण लेखक असल्याची जाणीव झाल्यानं, स्वत:च्या लेखनाचा उद्देश शोधायचा मोह होतोच. म्हणजे याच्यामागं मी, मनातली एकटेपणाची विवरं बुजवण्यासाठी लिहिलं असं मी म्हणतो, पण आता जाणिवा विस्तृत होण्याच्या वर्तमानात, मी पुढच्या काळासाठी काय उद्देशानं लिहिणार आहे, याचा स्वत:शी पडताळा घ्यायची इच्छा होते. आपल्या लेखनाची उपयोगिता, निरुपयोगिता शोधाविशी वाटते.

लिहिण्याशिवाय मी जगू शकत नाही, हे खरं आहे. पण आजवर बरंच भलंबुरं लिहून झाल्यावर, मी आपण काय लिहिलंय, हे तपासतो तेव्हा लक्षात येतं की, आपण आपल्या त्या त्या काळातल्या आपल्या मनाच्या इच्छा लिहिलेल्या आहेत आणि त्या इच्छा त्या त्या काळात अपुऱ्याच राहिलेल्या आहेत किंवा अपुऱ्या राहणार असं वाटलेलं आहे. थोडक्यात, लिहिणं म्हणजे अपुऱ्या इच्छांचा गजबजाट आहे. अपुऱ्या इच्छांवर चढवलेला शब्दसाज म्हणजे लिहिणं. आपण वयानं वाढत जातो, तशा आपल्या जाणिवा विस्तृत होत जातात, या जाणिवांमधून नवनव्या इच्छा मनाशी बाळगल्या जातात. आयुष्यात येणारा रोजचा दिवस नवा असतो. तो चांगलं-वाईट काही शिकवतोच. कुठलंही शिक्षण हे त्या शिक्षणाच्या पुढंही काही तरी आहे, याची आस लावतो. ते पुढं काय आहे, हे शोधायची उत्सुकताही असतेच. त्या उत्सुकतेतून पुढं असं असावं, व्हावं, तसं असावं, व्हावं, असं वाटत राहतं. तसं वाटणं म्हणजेच इच्छा. एक प्रकारे प्रचलित आणि पुढच्या काळाबद्दलचं स्वप्नरंजनच. ते स्वप्नरंजन शब्दांत मांडणं म्हणजे लिहिणं.

मी जेव्हाही कधी लिहायला सुरुवात केली, तेव्हापासून जे लिहीत आलोय, ते माझ्या त्या त्या काळातल्या, त्या त्या दिवसांच्या अपुऱ्या इच्छांचंच लिहीत आलोय. दरम्यानचा एवढा काळ गेल्यावर मी आज, वर्तमानात कोणत्या अपुऱ्या इच्छांचं लिहू पाहतोय, हे शोधता येऊ शकेल. आजच्या अपुऱ्या इच्छा मी सांगू शकतो.

या एवढ्या काळाच्या वाचनातनं, अनुभवातनं, जगण्यातनं आज मानवी समूहजीवन, त्याचा आजवरचा प्रवास, त्याचं वर्तमान आणि त्याचा संभाव्य काळ यात मी गुरफटून गेल्यागत वाटतं. माणसातले आपापसातले संबंध या विषयानं माझी पकड घेतल्याचं मला जाणवतं. माणसं एकटी म्हणजे काय, दुकटी म्हणजे काय, समूहातली म्हणजे काय, हे स्वत:चं स्वत: शोधून, ते शब्दांत मांडावं असं मला वाटतं. माझं आजचं लिखाण तसं आहे, असं मला वाटतं.

एवढं जगून झाल्यावर माझ्या लक्षात आलंय की, प्रत्येक माणसाला आपल्या संपूर्ण आयुष्यासाठी, आयुष्यभर सुख, शांती आणि आनंद याचा शोध यायची सवय असते. आणि

तो शोध लागतच नाही म्हणून स्वत:च स्वत:ला दु:खी करायची आणि दु:खाच्या वचप्यासाठी भोवतीच्या इतरांनाही दु:खी करायची, पीडा द्यायची सवय असते. तोच वर्तमान माणसाचा स्वभाव आहे. माणूस एक वेळ स्वत:चा आनंद स्वत:पुरताच ठेवील, पण स्वत:चं दु:ख स्वत:पुरतं ठेवावं, असं त्याला वाटत नाही. तो ते कोणत्या न् कोणत्या रूपात इतरांना वाटायला निघतो आणि त्याचे त्याच्यावर आणि इतरांवर चांगले-वाईट, अल्प किंवा दीर्घ परिणाम होत राहतात.

माझ्या लक्षात आलंय की, मानवी समूहजीवनाच्या सुरुवातीचा उद्देशच मुळात सुख, शांती आणि आनंद हाच होता. आजही आहे. आपण एकत्र राहू आणि सुखी, शांत, आनंदी होऊ असंच माणसांनी ठरवलंय आणि त्यासाठीच माणूस आयुष्यभर धडपडतही असतो. पण तरीही तो आपल्या मूळ उद्देशापर्यंत अजूनही पोहोचलेला नाही, हे भोवतालचं जग आणि त्याच्या प्रत्येक घडामोडी पाहताना स्पष्ट जाणवतं. अस्वस्थता, भेद आणि भांडण हा आजच्या प्रत्येक माणसाचा आणि एकूणच जगाचा स्थायीभाव झालाय. भेद आणि भांडण कशासाठी, तर तीही म्हणे शांती आणि सुखासाठी, एवढ्या अजब तत्त्वज्ञानापर्यंत आजचा माणूस येऊन ठेपलाय. माणूस स्वत:शीही भांडत असतो, माणूस दुसऱ्या माणसाशीही भांडत असतो, अनेक माणसं मिळून इतर अनेक माणसांशी भांडत असतात. हे आजच्या जगाचं रोजचंच जगणं आहे. मला वाटतं, कुणीही कुणाशीही भांडू नये, प्रत्येकानं दुसऱ्याला समजून घ्यावं, प्रत्येक माणसाच्या मनात सुख, शांती आणि आनंद असावा. ही माझी मला कळू लागल्यापासूनची अपुरी इच्छा आहे, आणि मी अपुऱ्या इच्छांचं लिहितो म्हणतो, तर माझं वर्तमान लिहिणं हे याच अपुऱ्या इच्छेचं आहे. ही अपुरी इच्छा हीच माझ्या वर्तमान लिहिण्याची प्रेरणा आहे, असं म्हणायलाही हरकत नाही. जोवर मी माझी इच्छा पूर्ण होत नाही, तोवर मी लिहीत राहणार.

❑

राजन खान
इंद्रप्रस्थ, सुखसागरनगर, पुणे ४११ ०४६.

---

**कमला नेहरू उद्यानातील केतकर समाधीचे जीर्णोद्धारासाठी देणगी**

| | |
|---|---|
| डॉ. वि. द. पटवर्धन | २५१/- |
| डॉ. दिनकर महादेव पटवर्धन | २५१/- |
| श्री. वा. म. गोगटे | २,०००/- |

तसेच ख्यातनाम मराठी लेखक कै. वि. वि. बोकील यांच्या स्मरणार्थ त्यांची कन्या (कुलकर्णी ग्रंथागार या प्रकाशन संस्थेचे निर्माते कै. पंडित अनंत कुलकर्णी यांच्या पत्नी) सुमतीबाई कुलकर्णी यांनी कार्यालयातील कार्याध्यक्षांच्या कक्षात लोखंडी कपाट घेण्यासाठी रु. ३,५००/- ची देणगी दिली. या सर्वांचे मन:पूर्वक आभार!











# सभोवतीचं जीवनच मला लिहायला लावते

❑

**डॉ. मंगला आठलेकर**

❑

'मी का लिहितो/लिहिते' किंवा 'लेखनामागच्या प्रेरणा' या फक्त कथा, कादंबरी, नाटक, कविता यांसारखे साहित्यप्रकार हाताळणाऱ्या लेखकांनीच व्यक्त करायच्या असतात, असा माझा आजपर्यंतचा समज होता. माझाच कशाला? साहित्यजगाशी संबंधित असलेल्या प्रत्येकाचा हा समज बनावा, अशा पद्धतीनं ललित-लेखकांनाच त्यांच्या लेखनामागच्या प्रेरणा विचारल्या जातात. 'निर्मितीशीलता' ही फक्त याच तऱ्हेचं लेखन करण्याकडे असते असं सर्वमान्य गृहीत यामागे असल्यामुळे या चार-पाच साहित्य प्रकारांपलीकडे लिहिणाऱ्याकडे निर्मितीच्या काही प्रेरणा असतील, हा विचार आपल्या मनातही येत नाही. साहजिकच सृजनशील लेखन म्हणजे कथा, कादंबरी, नाटक, कविता हा समज थोडा सैल करून अन्य स्वरूपाचं लेखन करणाऱ्या एखाद्या लेखकाला 'लिहावंसं का वाटतं?' हा शोध महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला घ्यावासा वाटणं, हे मला सुखद धक्का देणारं वाटलं.

आतापर्यंत आपल्या निर्मितीप्रेरणाविषयी बऱ्याच लेखकांनी सांगितलेलं वाचताना किंवा ऐकताना मला वाटून गेलं आहे की, 'प्रेरणा'सारखा मोठा शब्द आपण उगाचच वाया घालवतो. ज्ञानेश्वर-तुकारामांसारख्या संत लेखकांच्या लेखनामागे होती ती प्रेरणा! सामाजिक उद्धाराची आणि मानवी कल्याणाची! आज प्रेरणा सांगताना एखादा लेखक/कवी स्वत:तल्या 'अपार करुणे'तून किंवा भोवतालची विषमता, दु:ख, दैन्य पाहून दाटून आलेल्या 'प्रचंड अस्वस्थते'तून आपण लिहितो असं म्हणतो, तेव्हा गंमत वाटते. कारण 'अपार करुणा' आणि 'प्रचंड अस्वस्थता' यातून निर्माण झालेल्या आपल्या पुस्तकाला पुरस्कार मिळला नाही की नाराज होणारे, पुरस्कार मिळवण्यासाठी नाना लटपटी करणारे आणि


- डॉ. मंगला आठलेकर, एम्. ए. पीएच्. डी.
- मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात मराठीची प्राध्यापिका.
- आजच्या एक आघाडीच्या समीक्षिका. 'महर्षी ते गौरी' या पुस्तकामुळे विशेष प्रसिद्धी.
- पाच पुस्तके प्रसिद्ध झालेली असून 'महर्षी ते गौरी' आणि 'पु. भा. भावे/साहित्यविचार' या पुस्तकांना अनेक पुरस्कार लाभलेले आहेत.

'अस्वस्थ करणाऱ्या भोवताला' विषयी प्रत्यक्षात काही देणं नसलेले लेखक आपण पाहतो, तेव्हा वाटतं की हे 'प्रेरणा' वगैरे काही तितकंसं खरं नाही. खरं इतकंच की, आपल्याला समजलेलं अधिक काहीतरी लोकांना सांगण्याची, स्वत:ला सिद्ध करण्याची खुमखुमी आणि त्यातून मिळणारी प्रसिद्धी... लौकिक... थोडासा पैसा... वगैरे.

अर्थात चांगल्या लेखनामागे संवेदनक्षमता, शब्दांवरची हुकूमत, काही सांगावंसं वाटणं, आपलं वैचारिक वेगळेपण सिद्ध करणं वगैरे सगळं एकत्रितपणे काम करीत असतं. भोवतालासंबंधात आपल्याला काहीतरी सांगावसं वाटणं आणि ते मांडण्याची संधी मिळणं, यातून लेखक घडत असतो. अशी संधी प्राप्त करून देणारी व्यक्ती आपलं प्रेरणास्थान असल्याचं लेखकमंडळी बोलून दाखवतात ते म्हणूनच ! मग ते प्रेरणास्थान आई, वडील, गुरू, मित्र, प्रकाशक कुणीही असू शकतं आणि व्यक्तीप्रमाणेच 'भोवताल' ही प्रेरणास्थान असू शकतो. भोवतालाविषयीच्या प्रतिक्रिया म्हणूनही एखादा लेखक स्वत:ला लेखनातून व्यक्त करतो.

पण तरीही स्वत:च्या लेखनप्रक्रियेविषयी बोलणं थोडं कठीणच आहे. कारण 'मी' आला की लगेच त्याला आत्मस्तुतीचा वास यायला लागतो आणि स्वत:च्या जाणिवा, निरीक्षणं, समज यांविषयी बोलताना नम्रपणाची भूमिका घेतली तरीही ते ढोंग ठरू शकतं. असो.

साधारणपणे १९८० पासून मी पुस्तक परीक्षणानं माझ्या लेखनाला सुरुवात केली. सात-आठशे शब्दातलं ते पुस्तक परीक्षण करताना त्यातल्या गोष्टीपेक्षा 'माणसं' अशी का वागतात' आणि 'लेखकानं त्याची केलेली मीमांसा' याचा शोध मला महत्त्वाचा वाटायचा. प्रत्येक वेळी माझी भूमिका त्या साहित्यकृतीचं लेखननिरपेक्ष विश्लेषण करणं ही असायची. साहित्यकृतींबद्दल लिहित असताना त्यामुळेच मी अनेक लेखकांचा रोष ओढवून घेतला. लेखक किती दुखावतात, हे मी पाहिलं, मैत्रीचे शेवट अनुभवले आणि मग वाटायला लागलं की इतर लेखकांनी काय म्हटलंय आणि त्यांनी काय म्हणायला हवं होतं, यात वेळ घालवण्याऐवजी आपण आपल्याला काही म्हणता येतंय का ते बघू या.

लिहित असताना आणखी एक गोष्ट लक्षात आली की, आपण कुठल्याही साहित्यिक ग्रुपशी संबंधित नाही. आपल्याला 'चांगलं' म्हणून प्रोत्साहन देणारा, पाठीवर शाबासकीची थाप देणारा किंवा जाहीररीत्या आपल्या लेखनक्षमतेविषयी काही बोलणारा एकही 'गॉडफादर' आपल्या पाठीशी नाही. १९८० ते १९९५ पर्यंतचा पंधरा वर्षांचा काळ प्रचंड धडपड करण्यात गेला. नैराश्य तर यायचंय. अशावेळी वाटायचं की, कसल्या प्रेरणा अन् काय ! नुसत्या प्रेरणा असून काही उपयोग नाही. आपल्याला आयुष्यात व्यक्त व्हायला सुद्धा संधी मिळावी लागते आणि १९९५ मध्ये 'राजहंस'च्या श्री. दिलीप माजगावकरांशी भेट झाली. १९९५ नंतर 'राजहंस'नं माझी 'जयवंत दळवीं'विषयी, 'तिची कथा', 'महर्षी ते गौरी' आणि 'गार्गी अजून जिवंत आहे' अशी एकूण चार पुस्तकं प्रकाशित केली.

श्री. दिलीप माजगावकरांसारख्या प्रकाशनक्षेत्रात काही नवे आणि वेगळे प्रयोग करणाऱ्या सुज्ञ समीक्षक-प्रकाशकानं आपल्याला 'लिही' म्हणावं, 'नवी क्षितीजे'कार श्री. विश्वास

पाटील यांनी त्यांचा कितीही वेळ आपल्याला द्यावा आणि नुसता वेळ देणंच नव्हे तर नव्या विचारांच्या दिशा दाखवण्यात आणि यातून आपल्याला लिहावंसं वाटावं, हाच जर 'प्रेरणे'चा अर्थ असेल तर ही दोन माणसं माझ्या लेखनाची प्रेरणास्थानं आहेत.

वर उल्लेख केलेली माझी पुस्तकं किंवा आता अगदी जे काही प्रकल्प हातात आहेत, त्या साऱ्यात एक समान सूत्र आहे व ते म्हणजे स्त्रीच्या जगण्याचा विचार. पण हे काही ठरवून वगैरे नव्हे. मी स्वत: कोणत्याही स्त्री-मुक्ती संघटनेसाठी काम करीत नाही. 'पुरुष आणि पुरुष' हाच स्त्रीचा एकमेव शत्रू आहे, असं मी मानत नाही. आणि लेखनातून स्त्रीच्या जगण्याचा विचार करताना आपल्याला काही सामाजिक कार्य करायचंय अशी भूमिका घेऊन मी लिहीत नाही. खरं तर हे सारं लिहीत असताना आपण आपल्याला प्रश्न करणं, स्वत:लाच तपासणं मला महत्त्वाचं वाटतं. कित्येकदा स्वत:ला असे प्रश्न करताना स्त्रीच्या अगतिकतेची कारणं आपल्याच जगण्यात सापडतात, हे माझ्या लक्षात आलेलं आहे. 'व्यक्ती म्हणून आपण स्वत:चं केवढं तरी उन्नयन करू शकतो, फक्त तशी जिद्द, आंतरिक इच्छा हवी.' असा उपदेश स्त्रियांना करणं सोपं आहे. पण प्रत्यक्षात सगळ्या तऱ्हेचं स्वातंत्र्य असूनही कितीही तरी कोंडी करणारे प्रसंग कसे येतात, हे अनुभवताना संसारी स्त्रियांची अगतिकता मला समजून घेता आली आहे. त्याविषयी मला लिहावंसं वाटलं आहे.

दहिसर ते ग्रँटरोड असा रोज लोकलचा प्रवास करताना (गिरगावात माझं कॉलेज आहे) मी अनेक बायकांना पाहते, त्यांचं वागणं, त्यांचा संताप पाहते. समोर बसलेली बाई इतर स्त्रियांच्या नजरा चुकवून आपले डोळे पुसतेय, अनावरपणे येणारं रडू ओढणी किंवा रूमाल चेहऱ्यावर ओढून त्यात दडवण्याचा प्रयत्न करतेय, असं दृष्यही मी कित्येकदा पाहिलंय. आणि मग मनात अनेक प्रश्न... काय झालं असेल... कुठे जीव तर देणार नाही ? आणि रडण्याइतका... तेही चारचौघींत... त्रास होतोय तरीही ती काही निर्णय का घेत नाही ?... ही निमित्तं की प्रेरणा ?

'गार्गी अजून जिवंत आहे' हे पुस्तक लिहिताना 'लाजरी' दिवाळी अंकात वाचलेला लेख हे एक असंच निमित्त होतं. निमित्तं बाहेरून मिळतात. 'प्रेरणा' ही तुम्हाला आतूनच एखादं काम करायला उद्युक्त करते. माणसांच्या जगण्याच्या संदर्भात आपण काही मूलभूत प्रश्नांपर्यंत पोहोचावं.... सोल्युशन सामुदायिक नाही, ते व्यक्ती/परिस्थितीनुरूप बदलणारं आहे, म्हणून सोल्युशन देणं हा हेतूही नाही... फक्त त्या प्रश्नाचा उहापोह करून ज्याला त्याला आपल्या प्रश्नांच्या बाबतीत विचार करावासा वाटायला लावणं... हेही पूर्णपणे खरं नाही... खरं इतकंच की आपल्याला काय वाटतं ते सांगणं !

'लिहिणं' ही बरेचदा भोवताली जे काही घडतं, त्याविषयीची प्रतिक्रिया असते. अनुभवांकडे 'बघणं' असतं. पुरुषप्रधान समाजव्यवस्थेनं हे केलं आणि ते केलं, अशा तक्रारी आपण अजून किती दिवस करीत बसणार आहोत ? त्यापेक्षा जी अनेक क्षेत्रं खुली झाली, त्याचा आपण काही लाभ करून घेतो का, हा प्रश्न माझ्या मनाला पडतो. अत्यंत मागासलेल्या उत्तर प्रदेशातल्या एक दुर्गम खेड्यात एक बाई स्मशानपौरोहित्य करते, हे जेव्हा

एका लेखात मी वाचलं, तेव्हा ते काम मला म्हणूनच करावंसं वाटलं. स्त्री-मुक्तीची चळवळ चालवणाऱ्यांना गुलाबबाई माहितही नसते. 'व्यक्ती' म्हणून जगण्यासाठी, आवडणारं काम करण्यासाठी समाजाच्या, पुरुषाच्या परवानगीची वाट पाहण्याची गरज नसते, हे स्वतःच्या उदाहरणानं सिद्ध करून देणारी गुलाबबाई आपल्याला माहीत झाली. तिच्याविषयी साऱ्यांना कळावं म्हणून 'गार्गी अजून जिवंत आहे ?' हे पुस्तक मी लिहिलं. इतिहास रोमांचक असतो, तसाच तो प्रेरणादायीही असतो. थोर पुरुषांची चरित्रं तशा तऱ्हेच्या गुणांच्या शक्यता घेऊन येणाऱ्यांना प्रोत्साहक वाटतात. गुलाबबाई वर्तमानातच असं प्रोत्साहन देत आपल्यासमोर उभी आहे, हे मला सांगावंसं वाटतं.

प्रत्येक बाईची परिस्थिती वेगळी असते. एकीच्या प्रश्नाचं उत्तर किंवा समस्येवरचा उपाय दुसऱ्याला उपयोगी नसतो. 'पुढच्याला ठेच मागचा शहाणा' ही आपली 'म्हण' म्हणून ठीक आहे. प्रत्यक्षात एखाद्याला लागलेली ठेच आणि त्यातून त्याला आलेलं शहाणपण खुद्द त्यालाच दुसऱ्या वेळी उपयोगी पडत नाही, ते इतरांना काय उपयोगी पडणार? प्रत्येकाच्या जखमेची तीव्रता वेगळी... तरीही आजूबाजूला नीट बघता आलं की निदान नैराश्यावर मात करून जगण्याकडे सकारात्मक दृष्टीनं बघायला निश्चितच मदत होते.

समाजात सर्वत्र कुरघोडी करण्याचे प्रकार चाललेले असतात. ते काही केवळ 'बाई' असण्याशी संबंधित नाहीत. 'माणूस' म्हणून जगताना बाईला आणि पुरुषालाही हे नित्य प्रत्ययाला येत असतं. कारण बदलत्या जीवनाच्या गतीबरोबर सामाजिक चौकटी व्हायला हव्या तशा सैल होत नाहीत. समाजव्यवस्था, लग्नसंस्था, कुटुंबसंस्था... हे सगळं नव्यानं उभारायला हवं असं मला वाटतं. शेकडो वर्षापूर्वीची स्थिती आज नाही. मग संस्थेचे कायदेकानू तेच राहून कसे चालतील? जितकी अधिक लोकांना या संदर्भात जाग येईल, तितकं ते बदलाला पोषक होईल. ही जाग लेखनानं येऊ शकते.

बदलावर माझा विश्वास आहे. जे काही त्रासदायक असं अस्तित्वात आहे, ते बदलणारच नाही, असं मी मानत नाही. ज्या समाजात पिता, पती आणि पुत्र यांच्या आधाराशिवाय स्त्री जगू शकत नाही, ही ठाम धारणा होती, त्याच समाजात आज कितीतरी स्त्रिया एकट्या राहतात. समर्थपणे एकट्या राहतात. निराश मनानं न जगता आयुष्य अर्थपूर्ण करतात. हा बदल नाही? ... अशा स्त्रियांच्या जगण्याचा परिचय जितका अधिक होईल, तितका तो इतर स्त्रियांना आयुष्याची अर्थपूर्णता समजून घेण्यात मदत करणारा ठरेल. 'एकटं राहणाऱ्या स्त्रिया' हा माझ्या पुढच्या लेखनाचा विषय आहे.

खूप हिंडावं, समाजाच्या अंतरंगात शिरावं, दुर्गम भागात माणसं कशी जगतात ते पाहावं आणि माणसांचा पूर आलेल्या शहरात माणसं कशी मिळेल त्या जागेत किड्यासारखं वळवळत जगतात, ते पाहावं. असं वाटतं, जितकं अधिक हिंडावं, वाचावं, लिहावं तेवढं समोरच्याला अधिक समजून घेता येतं. पूर्वापार चालत आलेल्या सामाजिक नीतिमत्तेच्या निकषावर त्याहून वेगळं जीवन जगणाऱ्याला ठोकरण्याचा, नाकारण्याचा अधिकार माणसं कशी काय घेतात, हा प्रश्न मला अनेकदा पडतो.

अविवाहिता, विधवा, घटस्फोटिता म्हणून स्त्रियांनी एकटं राहणं हे आज समाजाला सवयीचं झालं आहे. त्यात विशेष काही नाही असं आपण म्हणतो. पण प्रत्यक्षात एकटं जीवन जगणाऱ्या स्त्रीसाठी आजही हे धाडसच आहे. एकटं राहणाऱ्या स्त्रीविषयी समाजाला प्रचंड कुतूहल आहे. दैनंदिन जीवनातले अनेक प्रश्न ती कसे सोडवते, नोकरीवरून घरी आल्यावर बंद दाराआड आपलं एकटेपण कसं पेलते, याची फिकीर समाजाला नाही. पण तिच्या लैंगिक गरजांचं ती काय करते, याविषयी मात्र त्याला केवढं तरी कुतूहल आहे. त्याच्या त्या संशयित नजरेला तोंड देत जगणं सोपं नाही. अशा स्त्रीविषयी मला लिहावंसं वाटलेलं आहे.

एकटं राहणाऱ्या दोन मैत्रिणीत सुद्धा समलिंगी संबंधांचा वास समाजाला यायला लागतो. अनेक आरोपांचं ओझं घेऊन ही 'स्वतंत्र' स्त्री जगत असते. समाजाच्या मनात असणाऱ्या अशा तऱ्हेच्या शंकांनी मला 'लेस्बियन्स'बद्दलही जाणून घ्यावसं वाटलं आहे. मुंबईत असे क्लब आहेत की, जिथं असे समलिंगी संबंध ठेवणाऱ्या स्त्रिया एकत्र येतात. मी त्यातल्या काहींशी बोलले आहे. त्यांच्या वाट्याला आलेल्या सामाजिक धिक्काराचा पुनर्विचार करणं आवश्यक आहे, असं त्यांच्याशी बोलल्यावर मला वाटलं आहे. ''जन्मताना आपल्या वाट्याला शरीर बाईचं आलं पण मन, इच्छा, नजर पुरुषी आली. आपण हे काही मागून घेतलं नाही. पण हा झगडा तर आपला आपल्यालाच सोडवावा लागणार आहे. आमच्या शरीर मनाच्या विशिष्ट घडणीमुळे आमच्या मनाला स्त्रीचं शरीर हवंसं वाटणं हे आमच्यासाठी नैसर्गिक आहे. समाज आमच्या वर्तनाला abnormal कसं मानतो? आमच्या घडणीनुसार स्त्री-पुरुष संबंध आम्हाला अनैसर्गिक वाटतो. तुम्ही आमचं ऐकून तरी घेणार की नाही? की धिक्कार करणार?' असा प्रश्न विचारणाऱ्या 'लेस्बियन्स'चं म्हणणं ऐकून घेतलं पाहिजे, असं मला वाटतं. ह्या विषयावरही माझं काम सुरू आहे.

अर्थात मनापासून आपल्याला ज्या विषयांचा अभ्यास करावासा वाटतो, तो करीत असतानाही आलटून पालटून उत्साह आणि नैराश्याचे झटके अनुभवाला येत राहतात. या सगळ्या लेखनाचा काय उपयोग? असा प्रश्न पडतो, तर कधीकधी अगदी नसते उद्योग आपण चालवलेत असं वाटून जाण्याइतकंही लेखनाच्या बाबतीत वैफल्य येतं.

तरीही मी लिहिते. लिहिण्याच्या निमित्तानं स्वत:ला पडणारे प्रश्न मांडण्याची संधी मिळते. आपल्या स्वत:च्या विचारात, जगण्याकडे पाहण्याच्या दृष्टिकोनात काही फरक पडलाय ते पाहता येतं आणि मुख्य म्हणजे माणसाच्या जगण्यातल्या अशा काही मूलभूत प्रश्नांचा विचार व्हायला हवा असं वाटतं, म्हणून मी लेखन करते..

❑

डॉ. मंगला आठलेकर
बी-५०२, प्लेझंट पार्क, कांदरपाडा, दहिसर (प.), मुंबई ४०० ०६८.
दूरध्वनी : ८९५६७८७.



अनुक्रमणिका







# माझ्या लेखनाचे निराळेपण

❑

**मोतीराम कटारे**

❑

लेखक-साहित्यिक-कलावंताने स्वत:च्या कलाकृतीच्या वेगळेपणाविषयी वा त्या कलाकृतीत केलेल्या प्रयोगाविषयी बोलावे काय ? या प्रश्नाचे होकारात्मक उत्तर दिले तर ते स्वत:च स्वत:ची आरती ओवाळल्यासारखे होईल व कलावंताच्या या कृतीकडे रसिक वाचकही याच भावनेतून पाहतील. रसिक-वाचक या प्रश्नाला दुसरीही बाजू असू शकते, हे समजून घेणार नाहीत. प्रत्येक विधानाला जशा दोन बाजू असतात, तशा त्या कोणत्याही कृतीमागेही आहेत, हे लक्षात घेतले की वर विचारात घेतलेली एक बाजू निष्प्रभ होते व त्याची विधायक बाजू लक्षात यायला वेळ लागत नाही. कलाकृतीचा आशय, त्यामागे दडलेला सुप्त विचार प्रत्येक समीक्षकाला कळतोच असे नाही. जर तो कळला नाही तर कलाकृतीचे विश्लेषण आणि मूल्यमापन नीटपणे होत नाही. ह्या अनर्थकारी बाबींतून कलाकृतीच्या वेगळेपणाचे मर्म समीक्षकाला उलगडून दाखवता येत नाही, हे दलित साहित्याच्या निमित्ताने सिद्ध झालेले आहे. दलित समीक्षक या प्रवृत्तीमधूनच जन्माला आलेले आहेत. या लेखनामागेही हीच प्रेरणा अंतर्भूत आहे.

प्रस्तुत लेखकाची पहिली कविता १९७३-७४ साली 'ठिणगी' या नियतकालिकात प्रसिद्ध झाली. दलित पँथरचे एक नेते सुरेश सावंत 'ठिणगी'चे संपादक होते. दलित साहित्य आणि दलित पँथरचा हा सुवर्णकाळ होता. चळवळीतून साहित्य आणि साहित्यातून चळवळी असे या कालखंडाचे वर्णन करता येईल. या काळात सातत्याने कविसंमेलने भरत असत. मोठ्या प्रमाणावर नियतकालिके प्रसिद्ध होत असत. वृत्तपत्रेही दलित साहित्य आणि चळवळीच्या चर्चेला अग्रक्रम देत असत. या साऱ्या चर्चा साहित्य-निर्मितीला चालना देणाऱ्या होत्या. वेदना, विद्रोह आणि नकार या मूल्यांना अतिरेकी महत्त्व आले होते. आशयातले नावीन्य संपुष्टात येऊ लागले होते. कवितेत नामदेव ढसाळ यांचं अनुकरण मोठ्या प्रमाणावर सुरू आहे, हे अभ्यासांती लक्षात येऊ लागलं होतं. कवितेत आधुनिकता असली तरी नवीनता नव्हती. माझी कविताही




मोतीराम कटारे, बी. कॉम्.

- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयात वरिष्ठ लिपीक म्हणून नोकरी.
- दलित लेखकांतील स्वतंत्र बाण्याचा समीक्षक अशी प्रतिमा.
- सहा समीक्षाग्रंथ प्रसिद्ध. दोन पुरस्कार मिळालेले.

त्याला अपवाद नसल्याने कथा-लेखनाकडे वळलो. 'अस्मितादर्श'ने कथा साभार परत पाठवली आणि कथा-कविता लेखन थांबवून वाचनाकडे वळलो. वाचनात वैचारिक वाङ्मय आणि समीक्षेला अधिक प्राधान्य होतं. ज्याचा वैचारिक पाया पक्का असेल, त्याचे लेखन कसदार होईल, असा विश्वास मनाशी होता.

विचारवंत हे आंबेडकरी विचारांचा अन्वयार्थ लावण्यात अधिक मग्न आहेत. मात्र स्वत:ला आंबेडकरवादी मानणारा समाज हा ज्या कृती करतो, त्यात आंबेडकरवाद आहे की नाही, याचा शोध ते घेत नाहीत, असे वैचारिक वाङ्मयाच्या अभ्यासातून जाणवले. हा शोध मी सुरू केला आणि त्यातूनच 'व्यक्ती आणि विचार प्रबोध' हा लेखसंग्रह आकाराला आला. 'प्रचार प्रकाशन', कोल्हापूर यांनी हा लेखसंग्रह प्रकाशनासाठी स्वीकारला आणि प्रकाशित होताच ज्या 'अस्मितादर्श'ने कथा साभार परत केली होती, त्याच 'अस्मितादर्श'ने वैचारिक लेखनाचा पुरस्कार देऊन केलेला गौरव अविस्मरणीय होता. माझ्यातला विचारवंत आणि समीक्षक घडवायला 'अस्मितादर्श'ने अशी अप्रत्यक्ष मदत केली.

दलित साहित्य हे मराठी साहित्याहून वेगळे आहे, असे दलित समीक्षक आणि त्याचे समर्थक वारंवार सांगत होते. मात्र आशयाचा नवेपणा वगळता त्यात नवे काहीच नव्हते. डॉ. गंगाधर पानतावणे हे डॉ. यशवंत मनोहरांना झोडपण्यासाठी त्यांच्या कवितेतील हिंदुत्वाचा आधार घेत होते. डॉ. यशवंत मनोहरांच्या कवितेतील हिंदुत्वाचा शोध घेताना ते आपपरभाव करीत. आपल्या गटाच्या कवींना त्यातून ते वगळीत असत. जे हिंदू म्हणवतात, त्यांच्या कवितेतून भाषिक हिंदुत्व येणे ही काही नवलाची गोष्ट नाही. जे स्वत:ला बौद्ध आणि कट्टर आंबेडकरवादी म्हणवतात, अशा पहिल्या पिढीच्या कवींच्या कवितासंग्रहांची आधार म्हणून निवड करून त्यांच्या कवितेत भाषिक हिंदुत्व कसे येते, हे 'दलित कवितेतील हिंदुत्व' या ग्रंथातून सिद्ध केले. भाषिक हिंदुत्वाच्या बाबतीत सर्व प्रस्थापित समीक्षकांची भूमिका कशी दुटप्पी आहे, हे या ग्रंथातून दाखवण्यात आले. जेव्हा एखादी कलाकृती वा ग्रंथ प्रस्थापितांच्या अस्तित्वाला धोका निर्माण करतो, तेव्हा ते त्याला अनुल्लेखाने मारण्याचा मार्ग अवलंबतात. 'दलित कवितेतील हिंदुत्व'च्या वाट्याला हे दु:ख आले असले तरी नव्या पिढीने या ग्रंथाचे उत्स्फूर्त स्वागत केले. समग्र मराठी भाषा ही हिंदुत्ववादी भाषा आहे. ही भाषा आपण नाकारली पाहिजे, असे विधान बाबूराव बागूल यांनी 'दलित साहित्याचे क्रांतिविज्ञान' या ग्रंथातून केले होते. या विधानातूनच हा ग्रंथ आकाराला आला. या ग्रंथाने नाव मिळवून दिले. मूर्तिजापूरच्या 'अस्मितादर्श' साहित्य मेळाव्यात प्रल्हाद बोरकर या कवीने रात्री दोन वाजता कवितासंग्रह लिहिण्यासाठी भेट दिला. ''माझ्या कवितेत हिंदुत्व असूनही तुम्ही लिहावे. आम्हाला मार्गदर्शक मिळाला नाही म्हणून हे घडलं. भविष्यात असं घडणार नाही. नवी भाषा घडवण्याचा आम्ही प्रयत्न करू.'' असं आश्वासन देत त्यानं निरोप घेतला. एखाद्या सभा-समारंभात मी समोर असेल तर बोलतानाही लोक दक्ष असतात. नव्या पिढीने नवी भाषा घडवण्यासाठी केलेला तो एक प्रयोग होता. त्याला चांगले यश प्राप्त झाले.

'मूल्यशोध' हा समीक्षेचा नवा ग्रंथ 'स्वरूप प्रकाशन' औरंगाबाद, यांच्या वतीने २००१



अनुक्रमणिका

साली प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ एका अर्थाने समीक्षेची समीक्षा आहे. आजवरच्या समीक्षेची चिकित्सा करून नवा समीक्षाविचार मांडण्याचा त्यात प्रयत्न आहे. बौद्ध तत्त्वज्ञानाच्या आधारे दलित साहित्याची समीक्षा आणि सौंदर्यशास्त्र उभे राहील, असा विश्वास प्रा. रा. ग. जाधव यांनी वेळोवेळी व्यक्त केला आहे. ह्या विश्वासाला सार्थ ठरवण्याचे काम या ग्रंथाने केले आहे. संस्कृतिनिष्ठ समीक्षा अद्याप मराठीत रुळली नसली तरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिलेली धम्म संस्कृती आणि या संस्कृतीच्या आधारे नव्या संस्कृतिनिष्ठ समीक्षेची पायवाट रुजवण्याचे काम या ग्रंथाने केले आहे. दलित स्त्रियांच्या स्वकथनांनी पुरुषी स्वकथनांची वाट कशी चोखाळली, हेही या ग्रंथाने दाखवले आहे. डॉ. भालचंद्र नेमाडे या 'थोर' समीक्षकाने दलित साहित्यविषयक घेतलेल्या भूमिकेला कसा जातीय रंग आहे, याचबरोबर त्यांच्या देशीवादाला जातीयवादाची कशी झालर आहे, यावर मराठी समीक्षकांबरोबरच दलित समीक्षकही मूग गिळून गप्प होते. ह्यावर लिहिण्याचे धाडस फक्त मी केले. नेमाड्यांची दहशत एवढी मोठी की एकही नियतकालिक हा लेख छापायला पुढे आलं नाही.

कलावंताने जो विचार स्वीकारलेला असतो, त्या विचारांशी सुसंगत आपले लेखन आहे की नाही, हे पडताळण्याची पहिली जबाबदारी ही कलावंताचीच असते. जोतीराव फुल्यांना सर्रास 'महात्मा' ही उपाधी लावली जाते. ज्या फुल्यांनी आत्मा नाकारला, त्यांना महात्मा संबोधणे अन्यायकारक ठरते. यातूनच जोतिरावांना 'क्रांतिबा' ही नवी उपाधी जन्माला आली व ग्रंथाचे नावही 'क्रांतिबा फुले : चळवळ आणि तत्त्वज्ञान'. फुल्यांच्या चरित्रकारांनी फुल्यांच्या विचारांचा त्या त्या काळाच्या संदर्भात अन्वयार्थ लावला, मात्र नव्या शतकाशी सुसंगत, विज्ञाननिष्ठ असा अर्थ लावण्याचे काम या ग्रंथाने केले. सयाजीराव गायकवाड यांच्यासारख्या पुरोगामी राज्यातली प्रशासनव्यवस्था ब्राह्मणशाहीने कशी गिळंकृत केली होती व क्रांतिबांच्या अखेरच्या आजारपणात तिचा त्यांना कसा फटका बसला, हे सप्रमाण दाखवून दिले आहे. अनुयायीच नेत्याचा पराभव करतात, हे इतिहासकारांचे लाडके विधान आहे. प्रतिनिधिक स्वरूपात हरी नरके यांनी तो कसा केला आहे, हेही या ग्रंथातच वाचायला मिळेल.

मी मूळचा कवी असल्याने माझ्या कवितेविषयीही लिहिणे गरजेचे आहे. दलित कविता आजही नामदेव ढसाळांच्या अनुकरणातून बाहेर पडत नाही. वेदना, विद्रोह आणि नकार या मूल्यांवरच आजही अनेक कवी आणि समीक्षक ठाम आहेत. वेदना, विद्रोह आणि नकारातून दलित-कवितेला सोडवून तिला वैश्विक करण्याचे काम बळवंत कांबळे, भुजंग मेश्राम, अरुण काळे, अविनाश गायकवाड इ. नव्या पिढीच्या कवींनी केले. या कवींची कविता माणसावर प्रेम करणारी असली तरी तिला प्रेमकविता संबोधले जात नाही. रूढ अर्थाने जी काही प्रेम कविता आली, ती जातीच्या बंधनात अडकलेली होती. विशेषत: ही कविता आंतरजातीय प्रेमावर अधिक भारभूत होती. जात, धर्म, वंश आणि प्रांताच्या बंधनांना झुगारून 'तो' आणि 'ती' समरसून प्रेम करतात, असे कवितेत होत नव्हते. ज्यांचे आंतरजातीय विवाह यशस्वी झाले अशा कवींनाही ते शक्य झाले नव्हते. यातूनच दलित कवी प्रेमकविता लिहू शकत नाही, हा आक्षेप पुढे आला होता. या आक्षेपाला चोख उत्तर 'दिशांताची पाखरं' या कवितासंग्रहाने दिले. कवितेची

वैचारिक पातळी सांभाळत आणि मराठी कवींसारखी ती शारीरिक प्रेमात अडकू न देता अत्यंत संयत अभिव्यक्ती या कवितासंग्रहात अनुभवायला मिळेल. ही कविता 'तो' आणि 'ती'चा मुक्त संवाद आहे. मानवी जीवन आणि संस्कृतीवर ती बोलतेच, पण सांस्कृतिक नैतिकतेवरही भाष्य करते. ही सांस्कृतिक नैतिकता धम्मसंस्कृतीमधून आली आहे. उदाहरणार्थ :

*नाचणारे पाय आवडतात म्हणून घेऊन गेलीस*
*ते परत कधी करणाराहेस ?*
*माझ्या घराचे खांब हल्ली कलू लागलेत*
*त्याला आधार देण्यासाठी मला माझे पाय हवे आहेत*

(पाय हरवलेला मोर : दिशांताची पाखरं : पृ. २०)

'दिशांताची पाखरं' फुले-आंबेडकरी साहित्य विश्वाला असा नवा अनुभव देणारी कविता होती. जातीची बंधनं झुगारली तरी नैतिक बंधने झुगारून ती अनैतिकतेकडे वळत नाही. विदेशातून आयात करण्यात आलेला स्त्री-वाद आणि फुले-आंबेडकरी स्त्रीवाद यात नेमका हाच फरक आहे. पाश्चात्य स्त्रीवाद हा स्त्री-स्वातंत्र्याच्या अतिरेकातून बाईच्या व्यभिचाराचेही स्वातंत्र्य मान्य करतो. 'शतकान्ताच्या क्षितिजापार'मधून फुले-आंबेडकरी स्त्रीवादाचा सशक्त काव्यात्म आविष्कार पहायला मिळतो. या कवितासंग्रहातील 'महायुद्ध' ही दीर्घ कविता त्याचे उत्तम उदाहरण आहे. आई आणि मुलगी यांच्यातला हा संवाद म्हणजे आधुनिक स्त्रीचं समस्त व्यवस्थेविरुद्धचं बंडच आहे. जिला आपण संस्कृती म्हणतो, ती संस्कृती आज अत्यंत विकृत स्वरूपात समाजमान्य होत आहे. या समाजमान्य विकृतीवर 'शतकान्ताच्या क्षितिजापार'मधून आसूड ओढले जातात. जिथे स्त्रियाच पुरुषी मानसिकतेविरुद्ध अभावाने बंड करायला उभ्या राहतात, तिथे एका पुरुषाने पुरुषी संस्कृतीविरुद्ध बंड उभारून पुरुषी मानसिकतेविरुद्ध उभे राहण्याचे धाडस हा कवितासंग्रह करतो. दलित स्त्री कवयित्रींच्या कवितेतूनही हा अनुभव येत नाही. प्रज्ञा लोखंडे आणि प्रतिभा राजानंद या कवयित्री फक्त त्याला अपवाद ठरू शकतात. उर्वरित दलित कवयित्रींची कविता पुरुषी कवितेच्या अनुकरणातच अडकलेली आहे. 'शतकान्ताच्या क्षितिजापार'मधली ही कविता फुले-आंबेडकरी कवितेलाच नव्हे तर समस्त मराठी कवितेला नवे वळण देणारी आहे.

जगात कुठलाच माणूस परिपूर्ण नसतो. मी ही त्याला अपवाद नाही. प्रस्थापितांच्या विरोधी भूमिका घेतल्याने माझे सर्वच लेखन अनुल्लेखाने मारले आहे. वैचारिक लेखन वा समीक्षेतील टीका ही कधीच व्यक्तिगत नसते. ती असलीच तर समाज आणि साहित्याच्या विकासार्थ केलेली असते, हे दलित समीक्षकांनी समजून घेतले नाही. प्रचारी टीकाकार आणि भलावणीकार समीक्षक यांनी हिणकस साहित्याचीही तरफदारी केल्याने टीका कुणी समजून घेत नाही व त्यामुळे कुणाचे काय चुकले, हे समजून येत नाही. माझ्या लेखनासंदर्भात मी समीक्षकांना विधायक टीकेचे आवाहन केले असले तरी त्यासाठी एकही समीक्षक अद्याप पुढे आलेला नाही. ❑

मोतीराम कटारे
१०, बौद्ध विकास, प्लॉट नं. ३२, शिवसृष्टी, कुर्ला (पू.), मुंबई ४०० ०२४.











# विज्ञानाला मानवी चेहरा द्यायचा प्रयत्न

❑

**सुबोध जावडेकर**

❑

**मा**झ्या लेखनाचं वेगळेपण त्याच्या विषयात आहे, असं प्रथमदर्शनी कुणालाही वाटेल.

आतापर्यंत माझ्या शंभरएक कथा, एक लघुकादंबरी आणि पन्नास-साठ लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यातल्या दहा-बारा कथा सोडल्या तर बाकीच्या सर्व विज्ञानकथा आहेत. 'आकांत' ही विज्ञानकादंबरी नसली तरी ती भोपाळ-दुर्घटनेच्या पार्श्वभूमीवर आहे आणि लेख तर जवळजवळ सर्वच विज्ञानावर आहेत. असं असल्यामुळे मला विज्ञानलेखक मानलं जातं.

पण विज्ञानविषयक लिखाण हे माझ्या लेखनाचं वैशिष्ट्य आहे, हे अर्धसत्य आहे. ते पुरेसं योग्य मूल्यमापन नाही, असं मला वाटतं.

माझं लेखन जरी विज्ञानाच्या संबंधात असलं तरी ते विज्ञानकेंद्री नाही. विज्ञानसाहित्याच्या केंद्रस्थानी विज्ञान असून चालणार नाही, तर माणूस असला पाहिजे अशी माझी सुरुवातीपासूनची धारणा आहे. माझ्या बहुतेक सर्व लिखाणाचा उगम जरी विज्ञानातून झाला असला, तरी ते लिहिण्यामागची प्रेरणा विज्ञानाचा प्रसार ही नाही. जेव्हा मी ललित लिहितो, तेव्हा आपल्याला जे उत्कटपणे जाणवलं आहे ते दुसऱ्याला सांगावं ह्याच भूमिकेतून मी लिहीत असतो. विज्ञानकथा ह्या विज्ञानाबद्दल नसून विज्ञानयुगातल्या माणसांबद्दल, त्यांच्यातल्या परस्पर संबंधाविषयी असतात, असं मी मानतो. 'आकांत'चा विषय वायुगळती हा असला तरी त्या दुर्दैवी घटनेची पाळंमुळं माणसांच्या वृत्तीत शोधायचा प्रयत्न मी केला आहे. विज्ञानलेख लिहितानासुद्धा त्यामध्ये विज्ञानाबद्दलच्या माहितीबरोबरच त्याचा परिणाम तुम्हा आम्हांवर कसा होणार आहे, ते सांगण्यावर माझा कटाक्ष असतो.

थोडक्यात, माझं लेखन जरी प्रामुख्यानं विज्ञानविषयक असलं तरी ते रूढ विज्ञानविषयक लिखाणापेक्षा वेगळं आहे, असं मला वाटतं. त्याचा फोकस विज्ञानावर नसतो. तो माणसावर



सुबोध जावडेकर, बी. टेक्. (केमिकल इंजिनिअरिंग)
व्यवसाय : जेकब्स एच् अँड जी ह्या कन्सल्टिंग कंपनीत नोकरी

- विज्ञानकथा लेखक — दहा पुस्तके प्रसिद्ध — १९८७ साली पहिले 'चिंतामणी हा नव्या युगाचा' पुस्तक प्रसिद्ध झाले.
- लेखनास चार पुरस्कार लाभलेले — परभाषांत विज्ञानकथांचे अनुवाद प्रसिद्ध झालेले.

असतो. मला वाटतं, हेच माझं वेगळेपण आहे.

मी गेली पंधरा-वीस वर्षं विज्ञानकथा लिहितोय. विज्ञानकथांबद्दल खूप गैरसमज आहेत. त्या मुलांसाठी लिहिलेल्या असतात आणि त्यांचा समावेश बालवाङ्मयात करावा, असं काही जणांना वाटतं. तर याउलट त्या वैज्ञानिकांनी विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना विज्ञान शिकवण्यासाठी लिहिलेल्या असतात, असा काहीजणांचा समज असतो. त्या पलायनवादी कथा असतात असा आरोपही केला जातो.

विज्ञानकथा विज्ञान समजावून सांगण्यासाठी लिहिल्या जातात हा सर्वात मोठा गैरसमज आहे. विज्ञानाचा प्रसार करणं हा त्यांचा हेतू आहे, विज्ञानकथा हे प्रचारकी वाङ्मय आहे, तो साहित्याचा प्रकारच नाही, असं अनेकांना प्रामाणिकपणे वाटतं.

मला तसं वाटत नाही. विज्ञानकथा हा साहित्याचाच एक भाग आहे, असं मी मानतो. चांगल्या साहित्याचे जे जे निकष आहेत, त्या प्रत्येक निकषावर विज्ञानकथेनं स्वत:ला कसाला लावून पाहिलं पाहिजे. चांगलं साहित्य हे माणसांबद्दल त्यांच्यातल्या नातेसंबंधाबद्दल काहीतरी सांगू पहात असतं. हीच गोष्ट विज्ञानकथेबद्दलही खरी आहे. विज्ञानाबद्दल काही सांगणं हा तिचा उद्देश नसतो. तीही माणसांबद्दलच बोलत असते. फक्त त्या माणसांपुढचे प्रश्न विज्ञानामुळं उभे राहिलेले असतात, म्हणून तिला विज्ञानकथा म्हणायचं इतकंच. त्या त्या प्रश्नांना ती माणसं कशी सामोरी जातात, हे ती कथा सांगते. म्हणजे शेवटी तीही माणसाचीच कथा असते. विज्ञानाची नाही. ती जर तशी नसेल तर ती विज्ञानकथा नसून विज्ञानकथेच्या बुरख्याआड दडलेला तो एक विज्ञानविषयक निबंध आहे, अशी पक्की खूणगाठ मनाशी बांधायला हरकत नाही.

विज्ञानकथा म्हटलं की अंतराळयानं, यंत्रमानव, संगणक, कालप्रवास, क्लोनिंग अशा गोष्टी आपल्या डोळ्यांपुढं उभ्या राहतात. ते साहजिकच आहे. कारण विज्ञानकथांचे विषय बहुतांशी हेच असतात. केवळ मराठीतच नव्हे तर इंग्रजीतसुद्धा नव्वद टक्के कथा याच विषयांभोवती घोटाळणाऱ्या असतात. माझ्याही कित्येक कथा या नेहमीच्या विषयांवर आहेत. पण ही रुळलेले वाट सोडून नव्या वाटेने चालायचा प्रयोग मी बरेचदा करून पाहिलेला आहे.

'आतला आवाज' ही माझी एक विज्ञानकथा. 'संगणकाची सावली' ह्या संग्रहातली. नुकतंच ई-टीव्हीवर मकरंद टिळक यांनी या कथेवर कथाकथन केलं. एका जगद्विख्यात मराठी गायिकेची ही कथा आहे. वयपरत्वे तिचा आवाज खराब होतो. तिच्या आवाजावर निस्सिम प्रेम करणारा एक तरुण तिच्या खराब झालेल्या आवाजातल्या टेपवरून तिच्या जुन्या तेजस्वी आवाजात ते गाणं टेप करण्याची पद्धत शोधून काढतो. एका प्रकारे तिचा जुना आवाजच तिला परत देतो. त्यातल्या त्या स्वर्गीय गांधारासकट. त्या श्रेष्ठ कलावतीला विज्ञानानं केलेला हा मानाचा मुजरा असतो. तिला अर्थातच अतिशय आनंद होतो. पण तरीही ह्या देणगीचा स्वीकार करायला ती नकार देते. अशी ही कथा.

ती असं का करते हे इथं सांगून टाकण्यात अर्थ नाही. या कथेचं उदाहरण मी एवढ्यासाठी दिलं की, प्रयत्न केला तर रूढ चौकट मोडून अगदी अनोख्या विषयावर विज्ञानकथा लिहिता येते. असाच प्रयोग मी ओलिस, माणसांची भाषा, झीरो कॅलरी डाएट, दुभंग, शाप, सायनाईडची










चव, सपनोंमे सजनसे, संशयात्मा, फुलपाखरू, ललाटरेखा इत्यादी कथांतून केला आहे. त्या कथांचे विषयही डॉल्फिन्सची भाषा, आठवणी पुन्हा जाग्या करणं, म्हातारपण टाळणारं औषध, प्लॅस्टिकचा दहशतवादी कारणासाठी उपयोग अशासारखे नेहमीपेक्षा वेगळे आहेत.

भोपाळ दुर्घटनेच्या पार्श्वभूमीवरची 'आकांत' ही कादंबरी मी १९८७ साली लिहिली. 'ही कादंबरी लिहिण्यापूर्वी मी भोपाळला भेट दिली होती का ?'असा प्रश्न मला बऱ्याच जणांनी विचारला आहे. ती कादंबरी लिहिण्यापूर्वी तर सोडाच त्यानंतरसुद्धा मी कधी भोपाळला गेलेलो नाही, हे ऐकून पुष्कळांना धक्का बसतो. पण ते अगदी खरं आहे. भोपाळला भेट द्यायची जरूर मला कधी वाटली नाही, याचं साधं कारण असं की, भोपाळ दुर्घटना हा माझ्या कादंबरीचा विषय नव्हताच. ह्या घटनेच्या पार्श्वभूमीवर मला माणसांची कथा लिहायची होती. भोपाळला नक्की काय काय झालं, ह्याच्या तपशीलात मला फार खोल शिरायचं नव्हतं. मला रस होता तो तिथं जे घडलं, ते का घडलं, त्याचा शोध घेण्यात. त्याच्या मागची कारणपरंपरा समजून घेण्यात.

अशा प्रकारच्या एखाद्या घटनेवर आधारलेल्या कादंबऱ्या ह्यापूर्वी लिहिल्या गेल्या नव्हत्या असं नाही. भरपूर वाचन करून, कागदपत्रं धुंडाळून, घटनास्थळाला भेट देऊन, संबंधितांच्या मुलाखती घेऊन अनेकांनी कादंबऱ्या लिहिल्या आहेत. इंग्रजीत तर आहेतच, पण मराठीतसुद्धा पुष्कळ आहेत. 'आकांत' लिहिण्यामागचा माझा उद्देश वेगळा होता. माझी कादंबरी मला वायुगळतीच्या संबंधातला संदर्भग्रंथ बनवायचा नव्हता. भोपाळला घडलेल्या घटनांची संगती मला लावायची होती हे खरं, पण ती मानवी पातळीवर ! तांत्रिक पातळीवर नाही. या शोकांतिकेची पाळमुळं शोधताना केवळ तांत्रिक बाबीपर्यंत जाऊन मला थांबायचं नव्हतं. त्यापेक्षा जास्त खोल जाऊन मानवी व्यवहार तपासायची माझी इच्छा होती.

म्हणूनच तिथं काय झालं ते समजून घ्यायला वर्तमानपत्रांत आणि मासिकांत आलेली माहिती माझ्यासाठी पुरेशी होती. आयुष्याची पंधरा-वीस वर्षं रसायन-उद्योगात काढल्यावर अशा दुर्घटना का आणि कशा घडतात ते मी जवळून पाहिलं होतं. भोपाळमध्ये ज्या चुका घडल्या, जो गलथानपणा दाखवला गेला, सुरक्षाव्यवस्थेला ज्या प्रकारे गुंडाळून ठेवण्यात आलं, त्याबद्दल मला लिहायचं होतं. तांत्रिक चुकांमागची मानवी स्खलनशीलता मला महत्त्वाची वाटत होती. बेदरकार प्रवृत्तीमागच्या मानवी मनाचा शोध मला घ्यायचा होता. त्या शोधासाठी भोपाळला जायची जरूर नव्हती.

दुसऱ्या शब्दांत सांगायचं, तर भोपाळला काय झालं याचा भरपूर तपशील लोकांपुढं आला होता. तिथं काय घडलं याचं नेमकं चित्र लोकांच्या नजरेसमोर वार्तापत्रांनी उभं केलं होतं. ते पुरेसं तपशीलवार होतं. पण तरीही वरवरचं होतं. अमुक एका टाकीत पाणी गेलं. तमुक यंत्र चाललं नाही वगैरे सगळं वार्तापत्रांत दिलं होतं. पण कुणाच्या निष्काळजीपणामुळे टाकीत पाणी गेलं, कुठली काळजी घ्यायची राहिली म्हणून यंत्र बिघडलं, हे त्यात नव्हतं आणि सर्वांत महत्त्वाचं म्हणजे, त्यात माणसांच्या चुकांचा उल्लेख नव्हता !

यंत्राच्या चुका ह्या बहुधा मुळात माणसाच्या चुका असतात, या सिद्धांतावर माझी ठाम श्रद्धा आहे. यंत्र बिघडतं कारण एकतर ते चुकीच्या पद्धतीनं वापरण्यात आलेलं असतं, चुकीच्या

कामासाठी वापरलं जात असतं किंवा त्याची नीट देखभाल केली गेलेली नसते, म्हणून. ते हाताळणारी, त्याची देखभाल करणारी (किंवा न करणारी !) माणसंच असतात. म्हणून तांत्रिक चुका ह्या खरं तर मानवी चुकाच असतात, ह्यावर माझा विश्वास आहे. ही माणसं अशी का वागत होती, कुठल्या तणावाखाली वावरत होती, त्यांच्या हातून ह्या चुका का घडल्या ह्याचा शोध मी या कादंबरीत घ्यायचा प्रयत्न केला आहे.

हा माझा शोध बऱ्यापैकी यशस्वी झाला असावा, असं वाटतं. कारण 'आकांत' ही केवळ भोपाळ दुर्घटनेची कादंबरी झालेली नाही. ती एका मानवी प्रवृत्तीची कादंबरी झाली आहे. ती एका विशिष्ट जागी घडलेली घटना न राहता, मला हवं होतं त्याप्रमाणे तिला एक वैश्विक स्वरूप आलं आहे. 'तुम्हाला आमच्या कंपनीची इतकी आतली माहिती कुणी सांगितली ?' असा प्रश्न मला एका-दोघांनी नव्हे तर वेगवेगळ्या कारखान्यांत काम करणाऱ्या दहा-बाराजणांनी पत्र लिहून विचारला, हे पुरेसं बोलकं आहे !

विज्ञानकथा नसलेल्या माझ्या दहा-बारा कथा मासिकांतून, दिवाळी अंकांतून प्रकाशित झाल्या आहेत. माझे तिन्ही कथासंग्रह विज्ञानकथांचे असल्यामुळे त्यात त्या घेतलेल्या नाहीत. या कथांपैकी बहुतेक औद्योगिक पार्श्वभूमीवर आहेत. मध्ये माटुंग्याला नवरे अपार्टमेंट नावाची एक चार मजली इमारत कोसळून अनेकजण मृत्युमुखी पडले. यावरही एक कथा आहे. या सर्व कथांमधून मी अशा दुर्घटनांचे धागेदोरे शोधायचा प्रयत्न केला आहे. प्रत्येक वेळी, वेगाने होणाऱ्या औद्योगिकरणामुळे जे मानसिक ताणतणाव निर्माण होतात, त्यामध्ये त्यांचं मूळ मला सापडलेलं आहे.

विज्ञान रुक्ष असतं, अशी पुष्कळ जणांची समजूत आहे. अगम्य आकृत्या आणि किचकट सूत्रे म्हणजे विज्ञान असं, त्यांच्या डोक्यात पक्कं बसलेलं असतं. त्यांचं असं मत झालेलं आहे, याबद्दल त्यांना दोष देता येणार नाही. आतापर्यंत विज्ञानावर मराठीत शेकडो पुस्तकं लिहिली गेली आहेत. पण काही मोजके अपवाद वगळता बहुतेक सर्व गंभीर स्वरूपाची आहेत. काही काही तर इतक्या क्लिष्ट भाषेत लिहिलेली आहेत की, सर्वसामान्य वाचकानं त्यातलं एखादं कधी हातात घेतलं तर तो ते पटकन खालीच ठेवून देईल !

'हसरं विज्ञान' हे पुस्तक लिहिताना, एका खेळकर दृष्टीनं विज्ञानाकडे पहावं आणि वाचकालाही तसं पाहायला प्रवृत्त करावं, असा माझा उद्देश होता. ज्याला इंग्रजीत लायटर-साइड-ऑफ-सायन्स म्हणतात, त्या विज्ञानाच्या हसऱ्या, मजेशीर भागावर प्रकाश टाकायचा प्रयत्न मी ह्या पुस्तकात केला आहे. त्यामागं वाचकाचं मनोरंजन करावं, एवढाच केवळ हेतू नाही, तर विज्ञानाबद्दल लोकांच्या मनात जी भीती असते ती होता होईल तो कमी करावी, हा उद्देश आहे. विज्ञानातही असंख्य गमतीजमती आहेत, हे सहसा कोणी त्यांच्या नजरेस आणून देत नाही. ह्या गमती म्हणजे केवळ शास्त्रज्ञांच्या विनोदी कथा, चुटके, किस्से असा पानपूरकासाठी वापरायचा मजकूर नाही. तर विज्ञानाचाच हा एक अविभाज्य भाग आहे, हे मला या पुस्तकात मांडायचं आहे.

वैज्ञानिकही अंधश्रद्धा बाळगतात. तद्दन मूर्खपणाचं संशोधन करतात. इतकंच काय पण कधीकधी चक्क बनवेगिरीसुद्धा करतात, हे पाहून वाचकांना गंमत वाटेल, त्यांचं विज्ञानाला



अनुक्रमणिका






बिचकून दूर पळणं थोडं कमी होईल, असं या अपप्रवृत्तींबद्दल लिहिताना माझ्या मनात होतं. अर्थातच सर्व वैज्ञानिक असं करतात, असं मला मुळीच म्हणायचं नाही. एकूण वैज्ञानिकांच्या तुलनेत अंधश्रद्ध, भंपक आणि बनवाबनवी करणाऱ्या वैज्ञानिकांचं प्रमाण नगण्य आहे, हे निर्विवाद.

उत्कृष्ट संशोधनासाठी जशी नोबेल पारितोषिकं दिली जातात, त्याच धर्तीवर आचरट संशोधन करणाऱ्या संशोधकांना इग्नोबल पारितोषिकेही देण्याची पद्धत अमेरिकेत आहे. इग्नोबल म्हणजे नोबल नाही असं. भंपक ! ही इग्नोबल पारितोषिकं मिळवलेल्या काही संशोधकांचे किस्से तर केवळ अविश्वसनीय आहेत. उदाहरणार्थ एका महाभागानं चहात बिस्किट बुडवायची सर्वोत्कृष्ट पद्धत शोधून काढली आहे. तर दुसरे एक महाभाग चहाच्या किटलीच्या तोटीचा आकार कसा असावा, यावर तब्बल सतरा वर्षं संशोधन करत आहेत ! लघवी तपासणीसाठी आणताना ती ज्या बाटलीमधून आणतात, त्याचं रोगाच्या मनोवृत्तीशी काय संबंध असतो, यावर एकाने सखोल संशोधन केलं आहे, तर आपल्याला न दिसणाऱ्या चंद्राच्या दुसऱ्या बाजूला दहा मैल उंचीची (लक्षात घ्या, दहा मजली नाही, दहा मैल उंचीची !) एक इमारत आहे, असा जावईशोध दुसऱ्या एकानं लावला आहे. किती सांगावं ? या असल्या 'दिव्य' संशोधनाबद्दल मी या पुस्तकात लिहिलं आहे. त्या निमित्तानं शास्त्रज्ञ हेही माणसंच असतात, माणसातले सगळे गुणावगुण त्यांच्या ठायीही वसत असतात, हे लोकांना जाणवून द्यावं असं मला वाटत होतं.

आणखी एका बाबतीत माझं हे पुस्तक थोडं वेगळं आहे. कलेचं आणि विज्ञानाचं जन्मजात हाडवैर असतं, अशी एक गैरसमजूत आहे. हे तर अगदीच चुकीचं आहे. ह्या दोन्ही क्षेत्रांत विशेष कर्तबगारी दाखवण्यासाठी उत्तुंग प्रतिभेची गरज असते. विज्ञानक्षेत्रात नाव मिळवलेल्या कित्येकांच्या अंगात उच्च दर्जाचे कलागुण होते, याचे अनेक दाखले देता येतील. याउलट कलावंत म्हणून जगाला माहीत असलेल्या काही व्यक्ती श्रेष्ठ वैज्ञानिक होत्या, हे काही थोड्या जणांना माहीत असतं.

म्हणूनच कधीकधी असा प्रश्न पडतो की, कलावंताची प्रतिभा आणि वैज्ञानिक प्रतिभा ह्या खरोखरच दोन वेगळ्या जातीच्या गोष्टी आहेत का त्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत ? सर्जनशीलतेचं तंत्रशुद्धतेशी काहीच नातं नाही का ? विज्ञानक्षेत्रात काम करण्यास जी एक विशिष्ट मानसिक घडण लागते, असं समजलं जातं, ती कलावंताच्या मानसिकतेहून पूर्णपणे भिन्न असते का ? ह्यासारख्याच प्रश्नांचा विचार मी माझ्या पुस्तकात केला आहे. तो करताना मर्ढेकरांच्या, कुसुमाग्रजांच्या आणि विंदा करंदीकरांच्या कवितांमधल्या विज्ञानप्रतिमांचा उल्लेख मी या संदर्भात केला आहे.

कॉम्प्युटरबद्दल सर्वसामान्य माणसाच्या मनात भीतीयुक्त आदर असतो. तो काही म्हणजे काहीही करू शकतो, असं बऱ्याच जणांना वाटतं. दूरदर्शनवरच्या काही मालिकांनी ह्या गैरसमजुतीत भर घालण्याचं काम इमानेइतबारे केलं आहे. खरं तर कॉम्प्युटर हे एक यंत्र आहे. तो देवही नाही आणि राक्षसही नाही. माणसाचा इमानी पण निर्बुद्ध सेवक आहे. हे वाचकाच्या मनावर ठसवण्यासाठी कॉम्प्युटरच्या मठ्ठपणाची टर उडवणारे काही अफलातून किस्से मी



अनुक्रमणिका

कॉम्प्यु'टर' ह्या प्रकरणात मुद्दाम दिले आहेत. पण त्याचबरोबर ह्या क्षेत्रातली प्रगती माणसाला कुठं घेऊन जाईल, त्याबद्दलही चर्चा केली आहे.

सध्याच्या काळात वेगवेगळ्या जाहिरातींचा मारा वर्तमानपत्रांतून आणि दूरदर्शनवरून आपल्यावर सतत होत असतो. हे जाहिरातदार खूप चतुर असतात. आपली जाहिरात आकर्षक कशी होईल, हे तर ते पाहतातच, पण त्या शास्त्रशुद्ध वाटाव्यात असाही त्यांचा प्रयत्न असतो. त्यासाठी 'शास्त्रीय परीक्षणातून असं सिद्ध झालंय' वगैरे शब्द ते जाहिरातीत हटकून वापरतात. हे शास्त्रीय संशोधन बहुधा त्यांनी त्यांच्याच प्रयोगशाळेत केलेलं असतं.; आणखी वर पुन्हा 'आमच्या औषधात सर्दीनिवारक तत्त्व आहे' असली बकवासही असते! (सर्दीवरच्या औषधात सर्दीनिवारक तत्त्व असणार नाही तर गजकर्णनिवारक तत्त्व असेल?) जाहिरातदारांच्या असल्या कृतक शास्त्रीय परिभाषेची टिंगल मी माझ्या या पुस्तकात केली आहे.

'इंटरनेट' हा आजच्या जगाचा परवलीचा शब्द. विज्ञानाबद्दल लिहिताना त्याला विसरून चालणारच नाही. ह्या जगाच्या नवीन माध्यमावर लिहिताना मला जाणवलेलं या माध्यमाचं सामर्थ्य आणि त्याच्या मर्यादा यावर मी प्रकाश टाकलेला आहे. इंटरनेटवरच्या चॅटरूममध्ये दयामरण यासारख्या विषयावर होणाऱ्या चर्चा, इंटरनेटवर उपलब्ध असलेले विज्ञानातल्या अनेक विषयांवरचे चुटके, विनोद, एप्रिलफूलचे प्रकार हे सगळं मी माझ्या पुस्तकात आणायचा प्रयत्न केला आहे.

'हसरं विज्ञान' हे पुस्तक लिहिण्याआधीपासून मी विज्ञानावर लिहितो आहे. 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये प्रकाशित झालेल्या तीस-पस्तीस लेखांचे दोन संग्रह 'विज्ञानाच्या नव्या वाटा' आणि 'विज्ञानाची नवी क्षितिजे' या नावाने प्रसिद्ध झाले आहेत. ह्या लेखांमध्ये नवीन शोध, विज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांमध्ये चाललेलं संशोधन ह्याबद्दल मी माहिती दिली आहे. पण त्यातही या संशोधनाचा परिणाम माणसावर कसा होणार आहे, हे सांगण्यावर भर आहे.

विज्ञानामध्ये लोकांना रस वाटावा, याबद्दल इतका आग्रह का, असं कुणाला वाटू शकेल. 'ज्याला वाटतो रस त्यानं वाचावी विज्ञानाची पुस्तकं, आम्हाला का कटकट? शाळेत आमच्या बोकांडी बसलं ते पुरं झालं नाही का?' असा प्रश्नही कुणाला पडू शकेल. अडचण अशी आहे की, आजच्या जगात विज्ञान ऑप्शनला टाकायची सोय उरलेली नाही. तुम्हाला आवडो न आवडो विज्ञान तुमचं जीवन आरपार बदलून टाकणार आहे. बायोमेडिसीन, जेनॅटिक इंजिनिअरिंग, जीन्स थेरपी, इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी या सगळ्यानं तुमच्या आयुष्याचा ताबा घ्यायला केव्हाच सुरुवात केली आहे. नॅनोटेक्नॉलॉजी, रोबॉटिक्स, क्लोनिंग हेही दूर नाही.

अशा वेळी ह्या बदलांना तुम्हाला तयार करायचं काम विज्ञानसाहित्य कळत नकळत करत असतं. ह्या बदलत्या परिस्थितीत माणसाचं स्थान काय आहे, ते विज्ञानसाहित्य शोधतं.

यालाच मी विज्ञानाला मानवी चेहरा द्यायचा प्रयत्न म्हणेन. तेच माझ्या लिखाणाचं वेगळेपण आहे, असं मला वाटतं. ❑

सुबोध जावडेकर
५, भागिरथी प्रसाद, ९९, शिवाजी पार्क, दादर, मुंबई २८.



अनुक्रमणिका








# विज्ञानाशी संबंधित लेखन करायचे आहे

❑

**प्रा. माधुरी शानभाग**

❑

वयाची तिशी ओलांडेपर्यंत मला लिहिता येते हे मला ठाऊक नव्हते. तसा प्रयत्न करावा असेही कधी वाटले नाही. मुले, नवरा, नोकरी, संसार या क्रमाने प्राथमिकता होत्या आणि त्या दिवसाचे ३०-३२ तास मागणाऱ्या होत्या. वाचनाची आवड शालेय दिवसापासून होती. त्याचे तोवर वेडही पायरी ओलांडून व्यसन झाले होते. डोळे किंवा डोके यांपैकी कुणीतरी एक साथ सोडेपर्यंत हे सुंदर व्यसन सिंदबादचा म्हातारा होऊन मानगुटीवर बसणार आहे. वयानुसार कविता, कथा, कादंबऱ्या, चरित्रे, प्रत्यक्ष अनुभवावर आधारित अशा क्रमाने वाचनाच्या आवडीचे विषय बदलत गेले. मध्ये मध्ये रहस्यकथा, गूढकथा वाचायलां अजूनही आवडतात. विशेषत: रेल्वेप्रवासात पहिल्या स्टेशनवर स्टॉलवर एखादे पुस्तक विकत घ्यायचे आणि कशासाठी पोटासाठीच्या तालावर अक्षरांच्या ओळीवरून डोळ्यांची गाडी दौडत न्यायची. उतरायचे स्टेशन येईपर्यंत सिडने होल्डन, जेम्स हॅडले वा अगाथा खिस्तीचे पुस्तक शेवटच्या स्टेशनवर आलेले असते. कितीही दमणूक असली तरी चार अक्षरे वाचल्याशिवाय रात्रभर डोळ्यावर झोप उतरत नाही. वाचलेल्या अक्षरांतील कल्पना, विचार रात्रभर सोबत करत राहतात हा दुहेरी फायदा. आजही लेखिकेच्या आधी मला माझी वाचकाची भूमिका जास्त प्रिय आहे.

लिहायला सुरुवात अपघाताने झाली. एक प्रसंगाने भरून येऊन मी कागदावर पेन टेकवले अन् तावामागून ताव लिहीत सुटले. त्यातील काही भाग वाचून दाखवला तो, एक-दोघी जाणकार मैत्रिणींना इतका आवडला की, 'तरुण भारत', बेळगावमध्ये छापून आला. मला जे सांगायचे आहे, ते शब्दामध्ये पकडणे मला सोपे जाते आणि परिणामकारकरित्या पोचते हे स्वत:लाच उमजले आणि डोक्यामध्ये इतके काही भरले आहे की ते लिहूनच मला स्वस्थता मिळेल, असेही वाटले. पहिला ललितलेख 'महाराष्ट्र टाइम्स मैफल' मध्ये छापून आला. कथा



प्रा. माधुरी शानभाग, एम्. एस्सी.

- बेळगावच्या गोविंदराम सक्सेरिया सायन्स कॉलेजात पदार्थविज्ञानाच्या प्राध्यापिका
- विज्ञानकथांचे लेखन, तीन संग्रह प्रसिद्ध झालेले, शिवाय असंग्रहित असे बरेच लेखन.
- लेखनासाठी अनेक पुरस्कार लाभलेले.

लिहिली ती 'माहेर'मध्ये आली. लिहिणे नुसते जमतेच नव्हे तर अनेकांना आवडू शकते, हे कळले आणि आत्मविश्वास वाढला. वॉशिंग्टनच्या कुऱ्हाडीच्या पात्याला चिकटलेले चार मातीचे कण जणू शाई होऊन माझ्या बॉलपेनमध्ये संचारले. आपल्याला इतके काही लोकांना सांगायचे आहे, याचा माझा मलाच साक्षात्कार झाला. गंमत म्हणजे त्यातले जवळजवळ ९० टक्क्याच्यावर स्वीकृत होऊ लागले. कधी साभार परत आले तर नकार घेतलेली मुलगी दुसऱ्या जागी खपावी, तसे होऊन अक्षरांना प्रकाश दिसू लागले. या काळात २०-२२ कथा, ललितलेख कुठेकुठे छापून आले.

मला कॉलेजात दोन वर्षे मराठी शिकवणारे प्रा. अनंत मनोहर कधी भेटले की, काय लिहिताय? म्हणून आवर्जून चौकशी करायचे. त्यांनी तेव्हा केलेल्या दोन सूचना माझ्या चांगल्याच उपयोगी पडल्या. कल्पना सुचली की चार ओळीत लिहून ठेवायची. नाहीतर विस्मरण होते. प्राध्यापकीच्या पेशात चेहरे, नावे विसरणे शिकवलेल्या वर्षांच्या वर्गप्रमाणात वाढत जाते हे अनुभवाला येते आहे. मग लिहून ठेवलेली कल्पना आवडली अन् मनाशी आठ दिवस घोळवत ठेवली की, काहीतरी आकृतिबंध तयार होतो. साचून साचून अस्वस्थता वाढली, कागदावर पेन टेकवले की ती सरासरा शब्दांतून वाहत जाते. सुचते तेव्हा प्रत्येक कल्पना चमकदार वाटते. चार दिवसांनी तिचे रूप बदललेले कळते. खोडून टाकायला पेनचा फटकारा पुरतो, पण विस्मरण झाले तर फारच ताप होतो. तसेच लिहिलेले पूर्ण केल्या केल्या छापायला देऊ नये. आठवडाभर तरी तसेच ठेवावे. मग वाचताना त्यातल्या चुका आपल्याला कळतात. सुधारणा सुचतात किंवा अगदी फालतू आहे हे स्वत:लाच कळते. प्रसंगोपात लेखन सोडले तर लेखन आठ दिवस तसेच ठेवायची सवय मला लागलीय.

मग मी सातत्याने लिहू लागले. एक ललितलेखाचे सदर चालवले. दरवर्षी दहा-बारा दिवाळी अंकात कथांची वर्णी लागू लागली. आसपास घडणाऱ्या घटना, मैत्रिणींनी, कुणीकुणी सांगितलेल्या हकीकती, ओळखीच्या व्यक्तींच्या आयुष्यातल्या गुंतागुंती अनुभव, अस्वस्थ करायला लागले. त्यातील पात्राच्या भूमिकेत स्वत:ला कल्पून पाहिले तर साध्या साध्या घटनेतील ताणेबाणे दिसायला लागले आणि कथाबीजे आपोआप मिळत गेली. प्रत्यक्ष अनुभव न घेता मनाने त्या अनुभवांच्या जंगलातून फिरून येणे जमायला लागले. किंबहुना आपोआप तसे होऊ लागले. अस्वस्थ करणारी गुंजभर कल्पना मनामध्ये भिनत गेली की, त्यातून वावभर वस्त्र विणावे अशी कथा सुचत जाई. कच्चा लिखाणातून पक्के करताना आणखी काही सुचावे, करावे, बदल करावे आणि जमले आहे की नाही याचा स्वत:शीच शोध घ्यावा, असे होत गेले.

मग इतरांच्या तुलनेने आपण कुठे आहोत याचा धांडोळा घ्यावासा वाटला. एक-दोन कथास्पर्धेत, लेखस्पर्धेत भाग घेतला आणि पहिली दुसरी उत्तेजनार्थ अशी बक्षिसेही मिळाली. एक पाऊल पुढे पडल्यासारखे वाटले.

गर्भजलचिकित्सा करून स्त्रीगर्भ नष्ट करायच्या संदर्भात एक पहाणी आकडेवारीसह बातमीच्या स्वरूपात प्रकाशित झालेली वाचली. एका जवळच्या ओळखीच्या बाईने आपला स्त्रीगर्भ पाडल्याचे खात्रीपूर्वक कळले. मी माझ्या आईची ओळीने सातवी मुलगी आहे. आपल्या

जन्माच्या वेळी असले काही नव्हते म्हणून बरं या सुटकेच्या भावनेबरोबर अस्वस्थही व्हायला झाले. सुशिक्षित, सुसंस्कृत म्हणवल्या जाणाऱ्या घरातही पहिल्याच अपत्याच्या वेळी मुलगा व्हावा म्हणून विज्ञानाचा हा फायदा घ्यायला मागेपुढे पहात नाहीत, असे कळले अन् एक गर्भ आईशी बोलतोय अशी कथा 'कैफियत' स्त्री मासिकात छापून आली. विज्ञानावर आधारित ही कथा आवडल्याचे अनेकांनी सांगितले. भरपूर पत्रे आली. विज्ञान आणि साहित्य या दोघांची सांगड घालणे मला येते आहे, असे लक्षात आले. तोपर्यंत डॉ. जयंत नारळीकर, सुबोध जावडेकर, लक्ष्मण लोंढे, बाळ फडके यांच्या कथा-कादंबऱ्या-ललितलेख आवडीने वाचले होते. झपाट्याने पुढे जाणाऱ्या विज्ञानाने माणसाच्या फक्त बाह्य सोयीसुविधातच बदल घडवला असे नाही, पण माणसामाणसांतील नाती, अनुबंध, भावबंध यावरही विज्ञानाचा परिणाम झाला. वैज्ञानिक कल्पनांवर कथा लिहिणे थोडे जिकिरीचे होते, पण मी एक कटाक्ष सातत्याने ठेवला. आधी ती चांगली कथा हवी आणि अनुषंगाने त्यात विज्ञान यावे. कथेमधील नाट्य म्हणा, तिथे कथाबीज म्हणा, विज्ञानावर आधारित असले तरी ती माणसाच्या मनातील व्यापारावर, नातेसंबंधावर प्रकाश टाकणारी असावी. हे व्यवधान पाळत कथा सुचत गेल्या. तसे लिहीत गेले. चांगल्या नियतकालिकातून त्या स्वीकृत केल्या गेल्या. विज्ञानाची भाषा नेमकी, कमीतकमी शब्दाचा वापर करणारी असते, तर साहित्याला शब्दाचा फुलोरा आणखी मोहक बनवतो. वरवर पाहिले तर हा विरोधाभास आहे, पण प्रत्यक्षात विज्ञानामध्ये बांधीवपणा असतो, अंतिम सत्याकडे जायची तळमळ असते. पारखून घेत, प्रयोगातून सिद्ध करत पुढे जायची आच असते. मागे वळून तपासून घेत पुढचे पाऊल टाकायला विज्ञान शिकवते. मनात उफाळून आलेल्या कल्पनांना एखाद्या कृतीचे बांधीव स्वरूप देताना योग्य ते संदर्भ आठवणे, शब्दाचा नेमका वापर करून आपल्या मनातले वाचकापर्यंत पोचवणे अशा अनेक 'साहित्यिक' गोष्टींना विज्ञानाच्या अभ्यासाचा उपयोग होतो, असे मला वाटते.

संगणक क्रांती झाली आणि तिने सर्व जग जवळ आणले. माऊसच्या क्लिकवर कुठेही जाता येऊ लागले आणि परिणाम म्हणून माणूस आणखी एकटा, बंदिस्त झाला. चारी बाजूला माहितीचा समुद्र घेऊन राहिलाय आणि दुसऱ्याशी हृदयाने बांधले जाण्याची तहान भागवायला घोटभर पाणी नाही असा विरोधाभास मला जाणवला आणि मुले मनाने, शरीराने दूर गेल्यावर संगणकावर मृत पतीशी गप्पा मारणारी स्त्री माझ्या कथेत आली. संगणकाचे वेड लागलेला, व्यसन लागलेला तरुण 'भुईचाफा' या कथेत आला. संगणकावर आपली ओळख न देता बोलता येते, यावर पांगळ्या मुलीचे भावविश्व भरून टाकणारी कथा आली. संगणक वापरून जात्या जीवाला तृप्त करणारी 'शेवटचा दीस' आली. 'क्लोनिंग' हा विषय तर स्वतःची अस्सल प्रतिकृती बनवायच्या जवळ नेणारा. फक्त शरीर म्हणजे माणूस नव्हे. त्याचे हृदय, त्याच्या भावना, त्याची संस्कृती, त्याचे अनुभव म्हणजे खराखुरा माणूस आहे, हे सुचवणाऱ्या एक-दोन कथा मी लिहिल्या. एक कल्पना सुचली आणि त्यावर कथा लिहिली. त्यावर कादंबरी होऊ शकेल असे वाटले आणि चार-पाच महिने लागून कादंबरी पूर्ण झाली: ही विज्ञानावर आधारित कादंबरी 'ब्रेनवेव्हज्' राजहंस प्रकाशनाने स्वीकारली आहे. या वर्षअखेरपर्यंत येईल.

दरम्यान डॉ. ए. पी. जे. कलाम यांच्या आत्मचरित्राबद्दल वाचनात आले. राजहंस प्रकाशनाने बाकी सर्व सोपस्कार झटपट पूर्ण केले अन् या चरित्राचा अनुवाद विंग्ज ऑफ फायरचे 'अग्निपंख' होऊन प्रकाशित झाले. यामध्ये त्याचे वैयक्तिक आयुष्य आणि विज्ञानक्षेत्रात भारताने घेतलेल्या भरारीचा वेध परिणामकारक उतरलाय असे त्यावर प्रकाशित झालेल्या सहा-सात परीक्षणलेखात आवर्जून सांगितले गेले. विज्ञानविषय ललित अंगाने लिहायचे प्रयत्न सातत्याने व्हायला हवे आहेत. माझा खारीचा वाटा यापुढे उचलायचा असा निग्रह मनाशी मी केला आहे. मला ते जमते आहे, असे प्रथम स्वत:ला आणि मग वाचकांनाही वाटले. 'अग्निपंख'ची चौथी आवृत्ती येते आहे. या वर्षातील उत्तम पुस्तकांत ते गणले गेले. ललित मासिकाने घेतलेल्या वाचकांच्या पहाणीत 'शतकातील परिणामकारक' पुस्तकात त्याची नोंद झाली.

७३ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन बेळगावला झाले. त्यामध्ये 'विज्ञान साहित्य : एक काळाजी गरज' असा विषय निबंध स्पर्धेसाठी ठेवायचा आग्रह धरून त्यावर डॉ. बाळ फोंडके यांच्या अध्यक्षतेखाली सत्रही पार पडले. दीडशे स्पर्धकांनी भाग घेऊन स्पर्धेला भरघोस प्रतिसाद दिला. या सत्राची पूर्ण जबाबदारी घेऊन पार पाडण्यात मी माझा वाटा उचलला.

काही काळ आपल्याला नवे काही सुचत नाही आहे, अशा अस्वस्थेत जातो. त्यावेळी भरपूर वाचन होते. लिहावेसे वाटले म्हणून पेन कागदावर टेकले की, जे लिहिले जाते, ते आठवडाभराने फाडायच्या लायकीचे आहे, असे स्वत:लाच कळून येते. हेही मला स्वत:ला अस्वस्थ करून गेले. त्यावेळी 'तरुण भारत अक्षरयात्रे'च्या श्री. नाना कुंभोजकरांनी वाचलेल्या पुस्तकावर परीक्षणे लिहायची सूचना केली आणि मी ती मनावर घेतली. नव्या पुस्तकांतले काय आवडले, काय आवडले नाही, त्या विषयावर इतर वाचलेले तुलनेसाठी घेत मी ५०-६० पुस्तकांवर परिचय-लेख लिहिले. एकदा 'समग्र दिवाकर'वरचा तयारीने लिहिलेला लेख वाचून उत्तम झालाय, असे एका प्रसिद्ध समीक्षकाचे पत्र आले आणि हेही काम जमल्याचे जणू सर्टिफिकेटच मिळाले. अक्षरवेध सदरासाठी परीक्षणे लिहिताना पुस्तके जास्त सखोल वाचली गेली. बरे-वाईट पारखत वाचन झाले. हा वैयक्तिक फायदा झाला तो वेगळाच.

'मेनका' प्रकाशनाचे कै. पु. वि. बेहेरे यांनी माझा विज्ञानकथा संग्रह काढला होता. त्यांनी इंग्रजी पुस्तकाचे परिचयलेख 'मेनका'साठी पाठवाल का? असे विचारले. दोन वर्षे मी 'मेनका'मध्ये विदेशी ग्रंथपरिचय हे सदर लिहिले. हे लिहिताना फक्त लिहावे इतकीच ऊर्मी माझ्या मनात होती का ? या प्रश्नाचे उत्तर अर्थात 'नाही' आहे. मला जो वाचताना आनंद मिळतो, तो दुसऱ्यापर्यंत पोचवण्यातही आनंद मिळतो. स्वतंत्र सुचलेले कागदावर उतरवून वाचकांपर्यंत पोचवण्यात जसा आनंद आहे, तसा यातही थोडा कमी असेल, पण आहे. चविष्ट जेवण बनवून दुसऱ्यांना वाढण्यात स्त्रीला आनंद होतो,त्याच जातकुळीचा आनंद मला पुस्तकांची ओळख करून देताना मिळतो.

चार-पाच वर्षांपूर्वी युरोप, अमेरिका भेट दिली. इजिप्त पाहिला. ते प्रवासवर्णन 'पंख लावलेले दिवस' या नावाने रोहिणी-मासिकातून क्रमश: प्रकाशित झाले. त्यावेळी मी वेळात वेळ काढून न्यूयॉर्क स्टेटमधील एडीसन सेंटर, ओरलँडोचे एपकॉट सेंटर, वॉशिंग्टनचे नॅचरल, हिस्ट्री











म्युझियम, लंडनचे सायन्स म्युझियम, ब्रुसेल्सचे सायन्स पार्क आवर्जून पाहिले. विज्ञान ठाऊक नसणाऱ्यांना या ठिकाणी विज्ञानाची अनेक अंगे, प्रात्याक्षिके, मॉडेल्स, तक्ते, संगणक, खेळ, छोट्या छोट्या सफरी अशा अनेक सुविधा वापरून मनोरंजनाबरोबर ज्ञान मिळेल अशा पद्धतीने सांगितलेली पाहिले. त्याबद्दल अनेक लेख वर्तमानपत्राच्या पुरवणींमधून, दिवाळी अंकांतून लिहिले, त्यावर व्याख्याने दिली. त्यावेळी प्रवासात वाचण्यासाठी बहिणीने 'चिकनसूप फॉर सोल' हे पुस्तक भेट दिले. कोणतेही पान उघडा अन् वाचायला सुरुवात करा... एक-दीड पानी घडलेल्या घटना सांगणारे हे पुस्तक मला आवडले. मानवी मनाची चांगली बाजू टिपणाऱ्या या घटना माणसे, परिसर, पटका, दुसरा असला तरी एका परीने मन, हृदय, भावना या सर्व एकच असतात, असे सुचवणाऱ्या होत्या आणि हे खरेच आहे. यातील घटनांना बीज धरून भारतीय पत्रे, कॅनव्हास, संदर्भ वापरून मी हजार शब्दांच्या कथा लिहिल्या. 'तरुण भारत'ने त्या अक्षरयात्रेसाठी स्वीकारल्या आणि वर्षभर मी 'दवबिंदू' हे सदर चालवले. दर आठवड्याला एक अशा बावन्न कथा लिहिल्या. अर्थात या कथा संकलनातून घेऊन रूपांतर केले आहे, याची तळटीप जोडलेली होती. वाचकांनी या सदराचे भरघोस स्वागत केले. तोचतोपणा येण्यापूर्वी मी हे सदर बंद केले. यामध्ये काही स्वतंत्र कथाही लिहिल्या. पुढे दोन-तीन आठवडे सदर बंद का केले, अशी वाचकांची पत्रे आली आणि माझ्या धडपडीचे सार्थक झाले, असे वाटले.

दिवाळी अंकांतून सातत्याने, स्वतंत्र कथा लिहित होते. त्यातील तीन-चार विनोदी कथा असायच्या. मोहिनी, विनोदी एक्सप्रेस, जत्रा इ. अंकातून त्या प्रकाशित झाल्या. लहानपण कोकणी एकत्र कुटुंबात गेले. तेव्हा तिरके, भोचक, खवचट, खोचक, 'लेकी बोले सुने लागे'सारखे बोलणे कानावर बराच काळ पडले होते. एखादी घटना विनोदी पद्धतीने लिहायला सुचू लागले. अशा २०-२२ कथा लिहिल्या. त्याचा संग्रह एका प्रकाशकाने स्वीकारला आहे. तो येईल तेव्हा येवो, पण या कथांचे कथन करून मी श्रोत्यांना अनेकदा रिझवले आहे.

माझ्या लिखाणामागील प्रेरणा या अशा रोजच्या आयुष्यातल्या आहेत. अनुभवविश्व सतत विस्तारत जायला हवे. मग लेखनात अस्सलपणा येतो, हे मला मान्य आहे; पण प्रत्येकाला ते शक्य होतेच असे नाही. एक संवेदनशील मन असले, कल्पनेने तो अनुभव स्वत:वर कोसळू देण्याची कुवत असली, त्याला उत्कटतेने भिडायची तयारी असली तर मनामध्ये तो उसळत, उकळत राहतो आणि त्यातून धुमारा फुटावा तसे लेखन होते, हा माझा वैयक्तिक अनुभव आहे. एका ओळखीच्या कुटुंबातील कर्त्या पस्तिशीच्या स्त्रीला एड्सची लागण झाली आणि त्यात तिचा मृत्यू झाला. ही घटना मला फारच अस्वस्थ करून गेली. कारण सर्वस्व देऊनही शेवटी भयानक एकाकीपण वाट्याला आलेली ती स्त्री ज्या वाटेवरून गेली, ती कल्पनेतही अस्वस्थ करणारी होती. त्यातून 'सुगंध' २००१ मधली 'एका स्पर्शाचे अंतर'सारखी कथा आली. माहेर २००१ मधली 'चकवा' ही कथाही अशीच मैत्रिणीचा अस्वस्थ करणारा अनुभव मनाने भोगल्यावर त्यातून उतरलेली कथा आहे. वाचकांना या आणि अशा अनेक कथांमधून स्वत:ला त्यातील पात्रे, घटना यांच्याशी जोडता येते ही जमेची बाजू आहे, असे मला वाटते. फक्त वाचून त्या विसरून जाव्या इतक्या सवंग, उथळ न होता अनुभवाचे अस्सलपण प्रतीत होऊन काही काळ

त्यांनी वाचकांना अस्वस्थ करावे, ही माझी अपेक्षा वाचक, विशेषत: स्त्रीवाचक पुरी करतात. भेटल्यावर वा पत्रांतून मला कळवतात, आणखी लिहायला मला उद्युक्त करतात.

लेखणी चालवता येते हे उमजल्यावर बदलत्या भोवतालाचे, त्यातून निर्माण होणाऱ्या संघर्षाचे आणि त्यांच्या परिणामाचे चित्रण माझ्या लेखनातून यावे, असे प्रामाणिपणे वाटते. विशेषत: विज्ञानामुळे चंगळवाद आला, आत्मकेंद्रीपणा आला, माणसे बोथट, संवेदनाहीन झाली हे आरोप मला मान्य नाहीत. विज्ञान तुम्हाला सत्याच्या वाटेवर नेते, त्याचा उपयोग कसा करायचा हे मानवी मन ठरवते, हे सातत्याने समाजमनावर बिंबवले गेले पाहिजे. पण त्याबद्दल तितक्या प्रमाणात लिहिले जात नाही. विज्ञानविषयक सुविधा झटकन स्वीकारणारे लेखन व्यवहारविश्व विज्ञानविषयक लिखाणाबद्दल तितकेसे उत्सुक नाही, ही खंत आहे. त्याचे परीक्षण, समीक्षा सोडाच दखलही फारशी घेतली जात नाही.

पुढील योजना ललित विज्ञानविषयक लेखनावर भर देणाऱ्या आहेत. एक शालेय विद्यार्थ्यासाठी 'प्रयोगातून विज्ञान' सोपे करून विज्ञानदृष्टी निर्माण करणारे पुस्तक-प्रकाशनाच्या वाटेवर आहे. आत्महत्या हा विषय. त्यामागचे शरीरविज्ञान, मानसविज्ञान आणि समाजशास्त्र या तिन्ही अंगांसह कादंबरीच्या रूपाने लिहायचा आहे. एक-दोन भारतीय वैज्ञानिकांच्या जीवनाचा आणि समाजासाठी त्यांनी केलेल्या कार्याचा आढावा घेणारी पुस्तके लिहायची आहेत. प्रत्यक्षात त्यातील कितपत येते, वाचक त्याचे कसे स्वागत करतात, ते येणारा काळच सांगेल.

मी लिहायला हौस म्हणून सुरुवात केली, त्याचा मग छंद झाला. आसपास घडलेले लिहिण्याशिवाय रहावत नाही, असे त्याचे व्यसन झाले. आता तर लेखन हा दुसरा सिंदबादचा म्हातारा मानगुटीवर बसला आहे. सुचेल तेव्हा नवे लिहायचे, विज्ञानविषयक लिखाण आवर्जून करायचे, नवे काही सुचत नसेल तर उत्तम वाचलेले माझ्या शब्दांतून वाचकांना सांगायचे, अनुवाद किंवा एखाद्या मनात रुतलेल्या बीजाभोवती भारतीय लेणे चढवून (त्याखाली मूळ कृतीचा उल्लेख न विसरता करून वाचकासमोर न्यायचे), खोटं, कृत्रिम कातून लिहिण्यापेक्षा हे निश्चितच उजवे ठरते, असे मला प्रामाणिकपणे वाटते. असा पुढचा प्रवास मला दिसतो आहे.

कागदावर पेन टेकवले की, बोटाच्या दिशेने अर्थासह धावणारी अक्षरे उमटताना होणारा शब्दांत पकडता न येणारा आनंद, मग वाटणारी रिते, मोकळे, ताणरहीत, निचरा झाल्याच्या सुटकेची भावना या पूर्णपणे वैयक्तिक आनंदाच्या अनुभवातून पुन्हा पुन्हा जाणे आता टळेल असे वाटत नाही. 'दिसामाजी काहीतरी ते लिहावे, प्रसंगी अखंडीत वाचीत जावे' असे म्हणणारे समर्थ आणि 'जो जे वांछिल तो ते लिहो' म्हणणारे आपले पुलं यांच्या उक्तींचा आधार वाटतो. मेंदू अन् बोटे थकेपर्यंत सुचणे, मनामध्ये घोळवत अस्वस्थ होत अन् शब्दांतून व्यक्त करणे या प्रवासाच्या आनंदोर्मी पुन:पुन्हा अनुभवायला मिळाव्यात 'इतुकेची मागणे आता।'

❑

प्रा. माधुरी शानभाग
७९४, खानापूर रोड, टिळकवाडी, बेळगाव ५९० ००६.



अनुक्रमणिका







# माझ्या अनुवाद-लेखनांमागील प्रेरणा

❑

मृणालिनी गडकरी

❑

खरे तर मी अनुवादक आहे. पण वैचारिक आणि ललित लेखं लिहिण्याचाही मी प्रयत्न करते. मी कां लिहिते ? मी अनुवाद का करते ? ह्या लेखाच्या निमित्ताने, हे प्रश्न, पुन्हा एकदा मी मलाच विचारले. पूर्वी ह्या प्रश्नांचे उत्तर 'स्वान्त:सुखाय' असे देऊन मी कदाचित् मोकळी झाले असते. पण आता ह्या उत्तरातील अपुरेपण मला जाणवले आहे. ह्या उत्तरातून व्यक्त होणारी अलिप्तता, इतरांपासून अलग राहण्याची वृत्ती माझ्यात आहे, असे मला वाटत नाही. माझे लेखन, मी केलेले अनुवाद फक्त माझ्यासाठीच असतात का ?

पूर्वी साहित्यक्षेत्रात 'अनुवाद' हा प्रकार गौण मानला जात होता. आता परिस्थितीत खूपच फरक पडला आहे. तरीसुद्धा अनुवादाकडे तुच्छतेने पाहिले जाते. 'काही लिहिता येत नाही म्हणून अनुवाद करते,' असे शेरे अजूनही मधूनमधून ऐकायला मिळतात. तरीही मी स्वत:ला अनुवादकच म्हणवून घेते. त्याची मला खंत वाटत नाही. मानसन्मान, मानधन ह्या कशाचाही विचार न करता मी आनंदाने अनुवाद करत असते. त्याबद्दल माझी कोणतीही तक्रार नसते. तसे पाहिले तर अनुवादाचे काम फार कष्टाचे, जिकिरीचे असते. ज्या साहित्यकृतीचा अनुवाद करायचा आहे, त्या साहित्यकृतीच्या लेखकाला म्हणजेच मूळ लेखकाला काय सांगायचे आहे, हे त्या मूळ लेखकाच्या मनात साहित्यकृतीद्वारा शिरून जाणून घेणे अतिशय महत्त्वाचे असते. त्यानंतर मूळ साहित्यकृतीतील आशय त्याच्या सर्व बारकाव्यांसकट अनुवादाच्या भाषेत आणावयाचा असतो आणि हे करत असताना मूळ लेखकाची शैली, त्याच्या भाषेचा बाज, मूळ साहित्यकृतीतील विशिष्ट वातावरण ह्यांना शक्यतो धक्का लावायचा नाही व अनुवादित



डॉ. सौ. मृणालिनी प्र. गडकरी, एम्. ए., पीएच्. डी.

- तसलिमा नसरीन या सुप्रसिद्ध बंगाली लेखिकेच्या पाच पुस्तकांचा मराठी अनुवाद
- ओशो रजनीश यांच्या हिंदी पुस्तकाचा अनुवाद.
- अनेक मराठी नियतकालिकांतून अनुवादित कथा व वैचारिक लेखन प्रसिद्ध.
- 'निर्वाचित कलाम' आणि 'आमार मेयेबेला' या अनुवादांना पुरस्कार मिळालेले.

भाषेचीही वैशिष्ट्ये जपायची अशी ही तारेवरची कसरत असते. तोल गेला की तोंडघशी पडावे लागलेच म्हणून समजा ! कधी कधी एकेका शब्दासाठी, एखाद्या लहानशा संदर्भासाठी बरीच धावपळ करावी लागते. वेळ व पैसा खर्च करावा लागतो. शब्द नू शब्द पडताळून पहावा लागतो. आपण चुकीच्या मार्गाने जात तर नाही ना, हे जागरूक राहून तपासावे लागते. अशी बिकट वाट मी आनंदाने स्वीकारते त्या अर्थी त्या मागच्या माझ्या प्रेरणा अतिशय बळकट असणार, हे उघडच आहे.

माझी पहिली प्रेरणा आहे आनंद. अनुवाद करताना मला दोन प्रकारचा आनंद मिळतो. एक आस्वादाचा व दुसरा निर्मितीचा. ज्या साहित्यकृतीचा अनुवाद करायचा असतो, ती तीन-एक वेळा वाचून, समजावून घ्यावी लागते. ह्या वाचनातून मी आस्वादाचा आनंद मनसोक्त लुटते. वाचता-वाचता मी त्या साहित्यकृतीशी पूर्णपणे समरस होते. त्यातील वातावरण, व्यक्तिचित्रे, त्यांच्या भावभावना ह्यांत पूर्णपणे बुडल्याशिवाय अनुवाद चांगला होणार नाही, असे मला वाटते. त्यानंतर अनुवाद करताना साहित्यांतर्गत अनेक आव्हानांना तोंड द्यावे लागते. त्यांतून योग्य तो मार्ग काढावा लागतो. अशा वेळी अनेक अडचणी समोर उभ्या राहतात, मला पेचात पकडतात. पण तरीही अशी आव्हाने स्वीकारणे मला आवडते. अडचणींवर मात केल्यावर मला खूप समाधान मिळते. अनुवादाची पक्की प्रत बनवताना मला खूप आनंद होतो. हा निर्मितीचा आनंद असतो. अनुवादासाठी निवडलेली प्रत्येक साहित्यकृती — मग ती कोणत्याही प्रकारची असो — मला इतर अनेक गोष्टी देते, शिकवते. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे भरभरून आनंद देते.

माझी दुसरी प्रेरणा म्हणजे माझे सहित्यप्रेम. माझ्या मते उत्तम साहित्य हे उच्च कोटीचे मनोरंजनाचे साधन आहे, तसेच ज्ञानरंजनाचेही आहे. पुस्तक हा माणसाचा सर्वांत जवळचा आणि भरवशाचा सोबती आहे. चांगले साहित्य वाचकाला सुसंस्कृत करते, विचाराने समृद्ध करते. वाचनाच्या वेडामुळे मी लहानपणापासून जमेल तेवढे चांगले साहित्य वाचत गेले. त्यातूनच साहित्याविषयी प्रेम निर्माण झाले. हल्ली वाचनाबरोबर मी ऐकतेही. लिखित साहित्याइतकेच मौखिक साहित्यही मला लाभदायक वाटते. उदाहरणानेच सांगायचे झाले तर डॉ. व. दि. कुलकर्णी ह्यांनी रवींद्रनाथ ठाकूरांवर दिलेल्या व्याख्यानाने मी भारावून गेले होते. तसेच पंतप्रधान वाजपेयींनी सार्क परिषदेत केलेल्या भाषणाने किंवा अमेरिकेचे माजी राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन ह्यांनी पाकिस्तान दूरदर्शनवर केलेल्या भाषणाने मला आकर्षित केले होते. एखाद्या उत्तम खेळाडूने दिलेली मुलाखत किंवा नामांकित पत्रकाराने एखाद्या महत्त्वाच्या घटनेचा दिलेला वृत्तांत माझे लक्ष नेहमीच वेधून घेतो. ह्या गोष्टींतून मला खूप शिकायला मिळत असते. नेमक्या शब्दांत भावना व्यक्त कशी करावी, महत्त्वाचा मुद्दा मांडताना शब्दांची निवड कशी करावी, कोठला मुद्दा विस्ताराने मांडावा व कोठला वाचक किंवा श्रोता ह्यांच्या कल्पनाशक्तीवर सोडून द्यावा, अशा गोष्टी कळतात. लेख लिहिताना ह्या गोष्टींचा फायदा मला विशेष होतो.

भाषांबद्दल मला आत्मीयता आहे. 'भाषा' हा माझ्या जिव्हाळ्याचा विषय आहे. मला



अनुक्रमणिका







भाषांबद्दल नेहमीच कुतूहल वाटत असते. माझ्या दृष्टीने भाषेची उत्क्रांती ही कोणत्याही भौतिक विज्ञानाच्या उत्क्रांती इतकीच महत्त्वाची आहे. मराठी माझी मातृभाषा आहे. त्यामुळे तिच्याबद्दल मला रास्त अभिमान आहेच. पण इंग्रजी, हिंदी, बंगाली वगैरे भाषांतील उत्तम गोष्टी आपण शिकाव्यात, जाणून घ्याव्यात, ह्या भाषांच्या गाभ्यापर्यंत जाण्याचा प्रयत्न करावा असे मला मनापासून वाटते. त्यासाठी माझ्या कुवतीप्रमाणे मी धडपड करते. एखाद्या उत्कृष्ट इंग्रजी खेळाडूची मुलाखत ऐकली की, इंग्रजी भाषेची लवचिकता, प्रत्येक सूक्ष्म भावना व्यक्त करण्यासाठी तीत असलेले शब्द, प्रचंड शब्दसंग्रह ह्यांची जाणीव होते. मला शब्दांशी खेळायला आवडते. नवा शब्द सापडला की, मला लहान मुलाला नवे खेळणे मिळाले की, जसा आनंद होतो, तसा आनंद होतो. 'Nostalgia' (नॉस्टॅल्जिया) ह्या शब्दाला मला 'स्मृतिरंजन' आणि 'गतकातरता' असे दोन शब्द मिळाले आणि मग त्यांच्या छटेत फरक असल्याचेही जाणवले. अनुवाद करताना 'नवजलधरपटल' ह्या बंगाली शब्दाला 'Cumulus' (क्यूम्युलस्) हा इंग्रजी नवा शब्द मिळाला, तेव्हा मला खूप आनंद झाला. त्या शब्दाचा अर्थ 'सपाट तळ असलेला ढग' असा आहे. Torso (तोर्‌सो) हा असाच आणखी एक शब्द. त्याचा अर्थ 'डोकं व हात नसलेले धड.' असे शब्द पाहिले की भाषा किती तरल, सूक्ष्म होऊ शकते, ते कळते. भाषेची उत्क्रांती होत गेली. तिच्या कक्षा रुंदावल्या तशी खोलीही वाढली. माणसाने तिला अलंकृत केली, आधुनिक केली, समृद्ध केली आणि करतोही आहे. भाषा म्हणजे आवाक्याबाहेरचे रत्नभांडार आहे. एकेक शब्द रत्नासारखा पारखून घ्यायला लागतो. त्यांची उधळपट्टी फायद्याची ठरत नाही.

'ऊर्मी' हीही माझ्या लेखनामागची प्रेरणा आहे. मी खूप बडबडी आहे. लहान लहान गोष्टींतून आनंद वेचायला मला आवडतो. सर्वच भावनांचा अनुभव मी कसोशीने घेते आणि मनमोकळेपणाने तो व्यक्तही करते. त्यामुळे नवीन काहीही वाचले, पाहिले किंवा ऐकले आणि ते ज़र मला भावले असेल तर मला दुसऱ्यांना सांगितल्याशिवाय राहवतच नाही. मला मिळालेला आनंद इतरांना वाटायची ऊर्मी मला दाबून टाकता येतच नाही. ह्यामुळेच मी लिहिते, अनुवाद करते. म्हणूनच माझे लेखन हे 'स्वान्तःसुखाय' असूच शकत नाही. शरदबाबूंचे 'देवदास' अनुवादित करताना मला हाच अनुभव आहे. शरदबाबूंना दोन ओळींच्या मधूनसुद्धा वाचावे लागते. 'देवदास' असे वाचताना त्या कथेची मनोज्ञता मला जाणवत होती. म्हणून 'देवदास'चा अनुवाद झाला असूनसुद्धा तो मला पुन्हा करावासा वाटला. बंगालमधील सध्याचे प्रथितयश लेखक सुनील गंगोपाध्याय ह्यांची 'सेइ समय' ही एक फार मोठी कादंबरी. ह्या कादंबरीत खऱ्या व्यक्तिरेखा आणि काल्पनिक व्यक्तिरेखा, वास्तव व कल्पकता ह्यांचे बेमालूम मिश्रण साधले आहे. मला ही कादंबरी अतिशय आवडली. म्हणून तीही मराठीत आणण्याचा मी प्रयत्न करत आहे.

साहित्याचा प्रवाह हा सतत वाहत असतो. ह्या प्रवाहात आपणही सामील व्हावे, मिसळावे असे मला वाटते. ह्या प्रचंड प्रवाहात आपणही काही देऊन साहित्याची सेवा करावी, हीही एक प्रेरणाच. अनुवाद व लेख ह्यांतून ती करण्याचा मी प्रयत्न करते. अर्थात माझा वाटा

खारीचा असणार, ह्याची मला पूर्ण जाणीव आहे. पण तेवढेही मला पुरेसे आहे. मला जे वेगळे पण चांगले वाचायला मिळाले, ते आपल्या मराठी वाचकांनाही कळावे, ह्या धडपडीतूनच मी स्तंभलेख, ललितलेख, कादंबरी, कथा, कविता, वैचारिक लेखन अशा वेगवेगळ्या साहित्यप्रकारांचा अनुवाद करण्याचा प्रयत्न करते.

मी अनुवादाकडे वळायला माझा एम्. फील. व पीएच्. डी.चा अभ्यासही बऱ्याच अंशी कारणीभूत आहे. एम्. फील. व पीएच्. डी.साठी मी तौलानिक साहित्याभ्यासाची निवड केली होती. 'कविवर्य बा. भ. बोरकर व रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या कवितांमधील 'निसर्ग : एक तौलानिक अभ्यास' हा माझ्या एम्. फील.च्या शोधप्रबंधिकेचा विषय होता तर 'रवींद्रनाथ टागोरांची कविता आणि समकालीन मराठी कविता' हा माझ्या पीएच्. डी.च्या प्रबंधाचा विषय होता. तौलानिक साहित्याभ्यासात 'अनुवाद' हा फार महत्त्वाचा भाग असतो. कारण दोन किंवा दोनांपेक्षा अधिक भाषांतील साहित्यकृतींची तुलना ह्या अभ्यासात अपेक्षित असते व सर्वांनाच त्या भाषा येत असतीलच असे नसल्यामुळे अनुवाद महत्त्वाचा ठरतो. माझ्या अभ्यासात मला बंगाली कवितांचे अनुवाद करावे लागले. अनुवाद करताना त्याला अभ्यासाची बैठक असावी लागते, काही आडाखेही बांधावे लागतात. असे असले तरी त्यात व्यक्तिनिष्ठता, भावनांची उत्स्फूर्तता असल्यामुळे ती एका प्रकारे कलाच ठरते. एकविसाव्या शतकात जग खूपच जवळ आले आहे. अनेक भाषांतून साहित्यनिर्मिती होत असलेल्या जगात विनिमय आवश्यक आहे. मग तो साहित्याचा असेल, विचारांचा असेल किंवा कलेचा असेल आणि ह्यासाठी अनुवादाला पर्याय नाही. अनुवादाचे हे महत्त्व मला अभ्यास करताना जाणवले.. म्हणूनच ह्या क्षेत्रात काहीतरी करायचे हे मी निश्चितपणे ठरवले. एम. फील. व पीएच्. डी. ह्या पदव्यांचा अभ्यास करताना मला रवींद्रनाथांच्या कवितांचे अनुवाद करावे लागले. त्यांतील बहुतेक गद्यात व क्वचित काही पद्यात केले. त्याचे मार्गदर्शक, परीक्षक व निकटवर्ती ह्यांनी कौतुक केल्यामुळे अनुवाद करण्याचा माझा उत्साह वाढला.

माझ्या आयुष्यात चांगले योगही सहजासहजी जुळून आले. मी पीएच्. डी.चा अभ्यास करत असतानाच माझ्या मार्गदर्शकांच्या प्रोत्साहनामुळे इंग्रजी बायबलच्या जुन्या करारातील काही भाग आधुनिक मराठीत अनुवादित करण्याची संधी मला मिळाली. ह्यामुळे अनुवाद करताना कोणकोणत्या गोष्टींचे भान ठेवावे लागते, बारकावे अनुवादित करताना कशी काळजी घ्यावी लागते, आव्हाने कशी पेलावी लागतात, ह्यांचे आपोआप शिक्षण मिळाले. पुढे अनुवाद करताना ह्या गोष्टींचा खूप उपयोग झाला.

मी अनुवाद करते, तेव्हा अनेक फायदे माझ्या पदरात पडतात. अनुवादाद्वारे मी दुसऱ्या एका भाषेतील साहित्यकृती मराठीत आणत असते. दुसऱ्या भाषेतील साहित्यकृतीची अनुवादासाठी निवड करताना किंवा निवड केलेली साहित्यकृती समजावून घेण्यासाठी मला त्याच भाषेतील आणखीही काही साहित्य वाचावे लागते, काही संदर्भांचा शोध घ्यावा लागतो, काही वाक्यांचे वा ओळींचे स्पष्टीकरण आवश्यक असते. ह्यामुळे दुसऱ्या भाषेतील साहित्य, साहित्यातील प्रवाह, चळवळी, वाद, त्या भाषेची वैशिष्ट्ये, लकबी ह्यांची ओळख होते. ती












भाषा बोलणाऱ्या भाषकांची संस्कृती, त्यांच्या परंपरा, चालीरीती ह्यांचीही माहिती मिळते. साहित्यकृतीतून विशिष्ट काळातील समाज, त्या काळातील जीवनसरणी लक्षात येते. वैचारिक मंथन तर होतेच. ह्या सर्वांमुळे माझी भाषा, संस्कृती, परंपरा, समाज ह्यांची अधिक जाण येते. थोडक्यात, दुसऱ्या भाषेतील साहित्याच्या प्रकाशात मला माझ्या मातृभाषेतील साहित्य, माझा समाज, संस्कृती, विचार ह्यांचे अधिक स्पष्ट दर्शन घडते. रवींद्रनाथांचे साहित्य अभ्यासल्यावरच स्त्रीसुधारणेच्या बाबतीत महाराष्ट्र बंगालपेक्षा पुढे होता, हे कळून आले. सौंदर्यपूजक रवींद्रनाथांनी महाराष्ट्रातील लोकांची जीवनपद्धत, आचार-विचार, वेषभूषा ह्यांचे कौतुक केल्याचे वाचून माझे मन अभिमानाने भरून आले. महात्मा ज्योतिबा फुले ह्यांचे काही वैचारिक साहित्य बंगाली, हिंदी, इंग्रजी, गुजराथी अशा विविध भाषांतून अनुवादित झाले आहे वा होते आहे, हे कळल्यावर माझी मान ताठ झाली. बायबलचा मराठीत अनुवाद करताना 'देवराई', 'वाटसरूंसाठी झाडांवर फळे किंवा शेतात थोडे धान्य ठेवणे' ह्यांसारख्या त्या काळातील चालीरीती आपल्या जुन्या काळातील रीतींशी जुळणाऱ्या आहेत, असे आढळून आले आणि माणूस म्हणून असलेले माणसाचे समानत्व जाणवले. येथे मला गोल्डस्मिथच्या Citizen of the world ह्या संकल्पनेचा अर्थ अधिक स्पष्ट झाला. म्हणूनच अनुवादाला संस्कृतीचे संक्रमण म्हणत असावेत का ?

अनुवाद करताना मी काही गोष्टी कटाक्षाने पाळते. अनुवादासाठी निवडलेली साहित्यकृती ही माझ्या मराठी वाचकांना काहीतरी देणारी असावी, असे मला वाटते. बरे पैसे मिळतील, नाव होईल म्हणून लोकप्रिय पण निकृष्ट दर्जाचे पुस्तक निवडण्याचे मी टाळते. पैसा वा सवंग लोकप्रियता ह्यांचा मोह धरत नाही. अनुवादित साहित्यकृतीने वाचकांत विचारजागृती केली पाहिजे किंवा त्यांना नवीन माहिती दिली पाहिजे आणि निखळ आनंद दिला पाहिजे. मनोरंजनाबरोबरच त्यांना नवीन ज्ञान दिले पाहिजे, असे मला वाटते.

एकदा एखादी साहित्यकृती अनुवादासाठी निवडली की, ती पूर्णपणे समजावून घेतल्याशिवाय मी अनुवादाला सुरुवात करत नाही. ती मूळ साहित्यकृती पुन:पुन्हा वाचणे, न समजलेला भाग समजावून घेणे, त्या साहित्यकृतींतून लेखकाच्या मनापर्यंत पोहोचणे माझ्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. नाहीतर अनुवाद नीरस, सपाट होण्याची शक्यता असते. त्यात सखोलता येण्याचा संभव कमीच. शरदबाबूंच्या कथा व कादंबऱ्या ह्या वरवर वाचल्या तर समाज ज्यांना पतित समजतो, अशा स्त्रियांच्या प्रेमकथा किंवा शोकांतिका वाटतात. पण प्रत्यक्षात त्या समाजातील विविध स्तरांतील माणसांच्या मनाचा वेध घेत असतात. त्या माणसांचा अहं, त्याग, समजुतदारपणा, प्रेम, वात्सल्य, रागलोभ, हेवेदावे अशा निरनिराळ्या भावभावनांचा विस्तृत पट सामाजिक पार्श्वभूमीवर ते रंगवतात आणि तो उलगडत जातो संवादकौशल्यातून. रवींद्रनाथांच्या अनेक कविता ह्या प्रेमकविता वाटतात, पण त्यांची 'जीवनदेवा'ची वैशिष्ट्यपूर्ण कल्पना जाणून घेताच त्या फार उच्च आध्यात्मिक पातळीवर जाऊन पोहोचतात.

अनुवादाचे अनेक प्रकार आहेत, हे आपल्याला माहीत आहेच. शब्दश: भाषांतर, यथामूल अनुवाद, स्वैर अनुवाद, रूपांतर वगैरे. मी यथामूल अनुवाद करण्याचा प्रयत्न करते. मात्र असा

अनुवाद करताना मूळ कलाकृतीतील वातावरणाला धक्का न लावता मराठीपणही टिकेल, असे मी पाहते. तसलिमा नासरिनच्या पुस्तकांचे अनुवाद करताना 'अकीका' (मुसलमान मुलांचा मुंडन, नामकरण संस्कार), 'हाइट्टारा' (सुवेर फिटणे, आपल्या पद्धतीप्रमाणे मुलाच्या जन्माच्या अकराव्या दिवशी करतात तसा विधी), आयान देणे (बांग देणें), अयू करणे (नमाज पढण्याआधी हातपाय धुणे) असे शब्द अनुवादात जसेच्या तसे वापरून मी खाली टीपा देते. ह्यामुळे वातावरणाला बाधा पोहोचत नाही आणि तेथेच अर्थ दिल्यास होणारा रसभंगही टळतो. शिवाय जिज्ञासू वाचकांना हवी असलेली माहिती मिळते. 'सकाळचा नमाज', 'दुपारचा नमाज', 'संध्याकाळचा नमाज', 'रात्रीचा नमाज' असे शब्द वापरून मला अनुवाद करणे शक्य असतानाही मी त्याऐवजी फज्र, जोहर (जुंहर), मागरेब (मागरिब), एशा (इशा) असे मूळ उर्दू शब्दच वापरले. त्यामुळे अनुवाद अधिक परिणामकारक होतो, असे वाटते. खाद्यपदार्थ, वनस्पती, फुले ह्यांच्याबाबतही मी हेच धोरण ठेवते. 'कृष्णचुड्यासारखा लाल' असे वर्णन आल्यावर कोठल्याही लाल रंगाच्या फुलांच्या झाडाचे नाव न घालता 'कृष्णचुडा' म्हणजे गुलमोहर हे मी शोधून काढले. ह्यामुळे अनुवादात विसंगती येत नाही. 'शापला' म्हणजे कमळाच्या देठांची भाजी, 'कटकटी' हा शंकरपाळ्यांसारखा बंगाली खाद्यपदार्थ असून अजूनही बंगालमध्ये तो जुन्या बूट, चपलांच्या बदल्यात मिळतो, हे कळल्यावर गंमत तर वाटलीच; पण माझ्या माहितीत भरही पडली. वाक्प्रचार, म्हणी ह्यांना योग्य पर्यायी वाक्प्रचार किंवा म्हणी शोधून काढण्याचा मी प्रयत्न करते. पुष्कळ वेळा अशा प्रयत्नांना यशही येते. उदाहरणार्थ, 'हाते नेइ कानाकडि, दरजा खोलो विद्येधरी' ह्या बंगाली म्हणीला योग्य अशी मराठी म्हण शोध घेतल्यावर मला सापडली. ती म्हणजे 'हातात नाही अडका आणि बाजारात जाऊन धडका' मात्र असा योग्य पर्याय सापडला नाही तर ओढून ताणून काहीतरी न जुळवता अर्थ स्पष्ट होईल, असा शब्द मी योजते. ह्यासाठी त्या त्या भाषकांशी चर्चा करणे, सतत निरनिराळ्या विषयांवरची पुस्तके व कोश शोधणे, विकत घेऊन संग्रह करणे हे पर्याय मी योजते. एखादा शब्द, परिच्छेद किंवा मुद्दा समजला नाही तर तो अनुवादातून गाळून सारांशाने काहीतरी लिहून मी वेळ मारून नेत नाही. अर्थ समजावून घेण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करते. एखादी शंका राहिल्यास संदर्भटीपेत तसा उल्लेख करते.

शब्द योजताना मी सावध असते. कारण शब्द हा संवेदनेचा संकेत असतो. शब्दाद्वारेच आपण मूळ भावना वाचकांपर्यंत पोहोचवत असतो. एखाद्या शब्दाला अनेक पर्यायी शब्द असतात. त्यापैकी कोणता वापरायचा हे मी संदर्भावरून ठरवते. बंगालीत 'गोऽऽ' हा शब्द पुरुषही सर्रास वापरतात. मराठीत असे करता येणार नाही. ते हास्यास्पद ठरेल. फक्त शब्दकोशातील शब्दांवरही अवलंबून राहता येत नाही. त्या पलीकडे जाऊनही एखादा शब्द वापरावा लागतो. रागाने तो 'दशरवाना' झाला. 'दशरवाना' ह्या बंगाली शब्दाचा कोशात अर्थ 'दहापट' असा होऊ शकतो. पण तो शब्द वरील वाक्यात वापरता येत नाही. त्याऐवजी तो रागाने लालबुंद झाला, असे म्हणता येईल.

अनुवाद करताना मूळ लेखकाच्या विशिष्ट शैलीचाही विचार करावा लागतो. ओशोंच्या

व्याख्यानांचे अनुवाद करताना मला हे विशेष जाणवले. ते अनेकदा वाक्य अर्धवट सोडतात किंवा कधी कधी व्याकरणाच्या नियमांचे उल्लंघन करतात. पण तीच त्यांची खासियत आहे, वैशिष्ट्य आहे, हे लक्षात ठेवावे लागते.

लेख लिहिताना विषय नक्की झाल्यावर मी मला जमेल तेवढे त्या विषयावर वाचन करते, त्या विषयाची माहिती मिळवते आणि मगच लेखाच्या मांडणीकडे वळते.

अशा रीतीने केलेल्या अनुवादाचे अथवा लेखाचे रसिकांनी कौतुक केले, दाद दिली की, सगळ्या कष्टांचे चीज झाल्यासारखे वाटते. समाधान वाटते. आनंदही होतो. शेवटी मी आनंदासाठीच तर लिहिते ना !

❑

डॉ. सौ. मृणालिनी प्र. गडकरी
८ अ, कांचनबन, सेनापती बापट रोड, पुणे ४११ ०१६.

**ओक स्मृती निबंध स्पर्धा**

महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषदेतर्फे दरवर्षी 'संतांचे तत्त्वज्ञान व सामाजिक कार्य' या संदर्भात वर उल्लेखिलेली निबंध स्पर्धा आयोजित करण्यात येते. या वर्षी 'स्त्री-संतांचे विचारधन' या विषयावर स्पर्धा होणार आहे. निबंधस्पर्धा खुली असून निबंधाच्या शब्दसंख्येची मर्यादा चार ते पाच हजार शब्द इतकी आहे. विषयाची व्याप्ती महाराष्ट्रामधील स्त्री संतांपुरती मर्यादित आहे. लेख मराठीतून लिहिलेला, संशोधनात्मक व चिकित्सक असावा. इच्छुकांनी आपला निबंध ३१ जुलै २००२ पूर्वी पोहोचेल, या बेताने प्रा. गौरी भागवत (कार्याध्यक्ष, महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषद) ३६।६८०।२ श्री संत एकनाथनगर, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ यांच्याकडे पाठवावा. (दूरध्वनी क्र. ४२१४९७०)

— गौरी भागवत

# माझ्या लिखाणामागील प्रेरणा



**ऊर्मिला पवार**



**आ**ज छापले, उद्या रद्दीत गेले अशा दिवाळी अंकांतून माझ्या लेखनाला सुरुवात झाली. त्या लिहिण्यामागे प्रेरणा होती की नाही या प्रश्नाला आज आता मी ठामपणानं 'नाही' असं उत्तर देईन. कारण 'प्रेरणा' शब्दाचा नेमका अर्थ मला गवसला नव्हता. तसा 'प्रेरणा' शब्द मी लहानपणापासून ऐकत आले. आंबेडकर जयंती, निर्वाण दिन, बुद्ध जयंती, धम्मचक्र प्रवर्तन दिन वगैरेंच्या निमित्ताने होणाऱ्या कार्यक्रमातून वक्त्यांच्या, पुढाऱ्यांच्या, कार्यकर्त्यांच्या तोंडून फवारा मारल्यासारखा हा शब्द सतत उडत असायचा. काहींना 'प्रेरणा' असं शुद्ध म्हणताही येत नसे, ते 'पेरना' म्हणत. माझी अशिक्षित आईसुद्धा 'पेरना' म्हणायची. पेरलं की उगवतं हे तिला माहित होतं त्यामुळे त्या संदर्भातच तो शब्द असावा असं तिला वाटायचं. पेरना केल्याशिवाय उगवंल, असं ती विचारायची आणि आम्ही त्या 'पेरना' शब्दाला हसायचो.

मी कोकणातल्या एका खेड्यात जन्मले होते. कोकणातल्या साहित्यिकांची साहित्यक्षेत्रात मोठी संख्या असली तरी मी ज्या दलित समाजात जन्मले तो समाज काही हाताच्या बोटावरचे अपवाद वगळता 'काला अक्षर भैंस बराबर' होता असं म्हटलं तरी हरकत नाही. वडील शिक्षक होते पण ते मी लहान असतानाच वारले. आणि आई अक्षरशत्रू, त्यामुळे लेखनाचा वारसा किंवा वसा वगैरेंचा काही प्रश्नच नव्हता. त्यातून कोकणातील दलित समाजात लिहिणारी (साहित्यिक) स्त्री कुणीच नव्हती. मी लिहीन तोच प्रारंभ आणि म्हणूनच इतिहास वगैरे होण्याची शक्यता. माझ्याच आगेमागे माझ्याच वयाचे काही दलित साहित्यिक लिहीत होते. दलित साहित्यक्षेत्रात त्यांचं नावही झळकत होतं. त्यात काही अकोकणी स्त्रियाही होत्या. त्या सर्वजण लिहितात मग मी का नाही? माझ्या मनातही माझ्या व आजूबाजूच्या व्यक्तींच्या जीवनातील बऱ्यावाईट घटनांचा सल होताच. तो घेऊन प्रसिद्धीच्या बऱ्याचशा आकर्षणातून



ऊर्मिला पवार, एम्.ए., जन्म ७ मे १९४५.

एक वैशिष्ट्यपूर्ण दलित लेखिका असा लौकिक. कथा, प्रवासवर्णन, अनुवाद, एकांकिका, संपादन आणि वैचारिक असे बहुविध प्रकारचे लेखन. सहा पुस्तके प्रकाशित झालेली असून दोन पुस्तके संकल्पित आहेत. लेखनाला अनेक पुरस्कार लाभलेले आहेत.

मी कथेकडे वळले.

संस्कृत साहित्य मीमांसक मम्मटानं साहित्य निर्मितीमागे धर्म, अर्थ, कीर्ती, काम, परदेश-गमन, व्यवहार-आकलन वगैरे प्रयोजनं सांगितली होती. ही प्रयोजनं म्हणजेच साहित्य निर्मिती मागची 'प्रेरणा' असं मला वाटत होतं. त्यातील 'कीर्ती'या प्रयोजनानं मी लिहू लागले. ''वा, वा...तुम्ही लिहिता का, छान छान, लिहा लिहा, लिहीत रहा...' असं लोकांकडून प्रोत्साहन मिळालं. 'आपल्याला चार वाक्यही सलग लिहिता येत नाहीत आणि ही बाई पानंच्या पानं लिहिते आणि वर हिचं प्रसिद्धही होतं' हे कौतुक मैत्रिणींच्या चेहेऱ्यावरही दिसायचं आणि त्या कौतुकासाठी, प्रसिद्धीसाठी मी हपापल्यासारखी लिंहायची.

माझी पहिली कथा स्त्रीप्रधान स्वरूपाची होती. पुरुषानं कसंही वागलं तरी चालेल पण स्त्रीनं चारित्र्यसंपन्न, पतिपरायण वगैरे असलंच पाहिजे असा गडकऱ्यांच्या एकच प्याला, पुण्यप्रभावछाप विचारांचा पगडा तीमध्ये होता. माणूस हा देव, दैवाच्या हातचं खेळणं असतो अशा पुराणमतवादी विचारांची खमंग फोडणीही त्या कथेला होती. कथेचं नावही 'देवाचं देणं' असंच होतं. हाच मसाला वापरून मी आणखीही काही कथा लिहिल्या. ज्या आता माझ्याही स्मरणात राहिल्या नाहीत.

पुढे माझ्या असं लक्षात आलं की प्रसिद्धीसाठी म्हणून मी पेन उचललं खरं पण मग आपल्याला कथेसाठी अमुकच विषय का सुचतोय, म्हणजे कुठेतरी तो मनात डुचमळत आहे आणि आपल्याला तो अस्वस्थ करतोय. मग मनात जे जे डुचमळत आहे ते कागदावर उतरवावं या हेतूनं 'सहावं बोट', 'शल्य', 'न्याय', 'वेगळी' अशा स्त्रीप्रधान कथा मी लिहिल्या. स्त्री असल्यानं त्या जाणीवा रेखाटणं मला माझ्या वकुबानुसार सोपं गेलं.

'सहावं बोट' या कथेत अपत्यहीन स्त्रीची पारंपरिक वेदना ना. सी. फडके टाईप कोडं, उत्कंठा, उकल असं काहीतरी तंत्र वापरून मी प्रकट केली. स्नेहा नावाच्या स्त्रीला मूल नाही. तिच्या नवऱ्याला झालेल्या ॲक्सिडेंटमुळे मूल होईलच याची खात्री नाही. अशा वेळी स्नेहाला दिवस जातात आणि ते कुणापासून, हा प्रश्न तिच्या नवऱ्याचं डोकं पोखरतो. तो आपल्या मित्राचा संशय घेतो. स्नेहाचा छळ करतो. अखेर स्नेहा प्रसूत होते तेव्हा तिला झालेल्या मुलाच्या हाताला सहा बोटं असतात. तिच्या नवऱ्याच्याही हाताला सहा बोटं असतात आणि ते मूल त्याचंच हे उघड होतं, पण तेव्हा मानसिक व शारीरिक त्रासातून स्नेहाचा अंत होतो आणि तिच्या नवऱ्याला पश्चात्ताप होतो वगैरे वगैरे...

'शल्य' कथेत ज्योतीला पाचही मुलीच होतात. मुलगा झाल्याशिवाय तिची बाळंतपणातून सुटका नसते. सहाव्या खेपेला ती बाळंतपणासाठी दवाखान्यात जाते तेव्हा आपल्याला मुलगीच होणार असंच तिला वाटत असतं. त्याचवेळीं दुसरी एक बाळंतीण दवाखान्यात येते. तिला मुलगा झाला व आपल्याला मुलगी झाली तर आपण मुलांची अदलाबदल करूया असं ज्योतीला वाटतं आणि तसंच घडतं. ज्योती आपली मुलगी त्या स्त्रीला देते पण नंतर ज्योतीला कळतं की ती स्त्री कुमारी माता असून ती ते मूल मारून टाकायला गेलेली आहे. अशा वेळी ज्योतीच्या मनाची झालेली प्रचंड तगमग आणि आपण आपल्या मुलीला मृत्यूच्या दाढेत

ढकललं या भावनेचं 'शल्य' हा माझ्या त्या कथेचा विषय झाला.

अशाच साधारण बारा तेरा कथा मी निवडल्या आणि त्याचा 'सहावं बोट' या नावानं संग्रहही प्रकाशित केला. तोपर्यंत त्या कथा फुटकळपणानं इथे तिथे छापून येत होत्या. त्यांच्याकडे कुणाचं लक्ष गेलं नाही पण कथासंग्रह रूपाने त्या हातात पडताच मला कथालेखिका हे विरुद मिळालं. त्याबरोबर मी दलित समाजातली असल्यामुळं दलित लेखिका असंही गौरवलं गेलं. पण त्याचवेळी माझ्या कथांवर दलित साहित्यप्रांतात जोरदार टीका झाली. टीकेचं कारण होतं माझ्या कथा फुले-आंबेडकरी प्रेरणेच्या नाहीत म्हणून त्या दलित कथा नाहीत. उर्मिला पवार हिला दलित कथा लेखिका म्हणता येणार नाही. खरं तर इथे एका विशिष्ट साहित्यप्रवाहात मला न कोंडता संपूर्ण मराठी साहित्यातच माझ्या कथांना प्रवेश मिळतो आहे याचं खरं तर कौतुक किंवा समाधान वाटायला हवं होतं. कारण याचवेळी काही दलित लेखक आपलं साहित्य केवळ दलित नाही ते मराठी साहित्याचा अविभाज्य भाग आहे असा आक्रोश करतच होते व तसं होण्यासाठी धडपडतही होते. मग मला का झिडकारलं जात आहे? हा प्रश्न मला अस्वस्थ करू लागला व परस्परविरोधाचं कोडंही पडलं. मात्र हे कोडं पुढे जसजशी फुले-आंबेडकरी विचारांची समज उमज पडत गेली तसं तसं उकलत गेलं.

दलित साहित्य फुले-आंबेडकरी प्रेरणेवर उभं आहे. विषमतावादी वर्ण आणि वर्ण-व्यवस्थेनं आपल्या देशातील प्रत्येक माणसामाणसांत श्रेष्ठ-कनिष्ठ, पवित्र-अपवित्रतेची भिंत उभी केलेली आहे. वर्ण-व्यवस्थेने तळातल्या शूद्र अतिशूद्र वर्गाला त्याचा हक्क, अधिकारापासून आणि विकासापासून वंचित ठेवलं गेलं. त्या व्यवस्थेच्या समर्थनार्थ धार्मिक ग्रंथ, पोथ्या-पुराणात माणुसकीला काळिमा फासणारे आणि बुद्धीला मुंग्या आणणारे नीतिनियम सांगितले गेले. रामायण-महाभारतासारखी कथा-काव्यं रचली गेली. विषमतावादी तत्त्वज्ञान संक्षिप्त रूपानं सांगणारी रूपकं आणि मिथ्स् तयार झाली आणि या सर्वांना वेढून या जगण्याचं प्रतिबिंब दाखवणारी साहित्यनिर्मिती होऊ लागली. या विषमतावादी जगण्यातील एकांगीपणा स्पष्ट करून या साहित्यनिर्मितीला 'फुले-आंबेडकरी प्रेरणेने' नकार दिला, त्याचबरोबर पर्यायी विचार आणि मूल्येही दिली. आणि त्यानुसार साहित्यनिर्मिती व्हावी अशी अपेक्षा केली गेली.

आंबेडकरी प्रेरणेमुळे नुसती अक्षरओळख झालेली दलित व्यक्तीही आपल्या व आपल्या समाजाच्या दुःखाबद्दल बोलू लागली, लिहू लागली. 'अस्पृश्यता'या संकल्पनेमुळे भोगावा लागलेला तिरस्कार, अवहेलना, उपेक्षा, पशुवत् दिली गेलेली वागणूक याबाबतची चीड, आक्रोश लाव्हासारख्या अनेक कथा-कवितांमधून प्रकट झाला. हा लाव्हा माझ्या कथांमध्ये आला नाही. याचं कारण मी खेड्यातल्या दलित समाजांत जरी जन्मले होते तरी शहरात अन्यवर्णीय व्यक्तींच्या सहवासात लहानाची मोठी झाले. कोकणात दलित वस्त्या अन्य वर्णीय वस्त्यांपासून फारशा दूर नसल्याने आणि गरिबीचे जास्त चटके कोकणातला दलित समाज भोगत असल्यामुळे 'अरे ला का रे' न म्हणता शक्यतो अगदी लाचारीनंसुद्धा आपलं जगत राहायचं ही इथली वृत्ती होती. त्यामुळे इथला समाज दलित चळवळीतही फारसा पेटून उठला नाही. साहजिकच साहित्यातही नाही. आपलं जगणंसुद्धा तो सांगत नव्हता. माझंही तसंच











होतं. फुले-आंबेडकरी विचार मी जाणतेपणी ऐकून, वाचून, समजून घेतले आणि जोपर्यंत मन एखादी गोष्ट पहात नाही तोपर्यंत डोळ्याला ती दिसत नाही, तसं झालं. लहानपणी भोगलेली गरिबी, जातीमुळे झालेला अपमान, अवहेलना, दलित स्त्रियांच्या जगण्याची दुहेरी वेदना, आपोआपच शब्दांचा आधार घेऊ लागली. याच सुमारास माझ्या तरुण मुलाचं निधन झालं आणि ते दु:ख मनावेगळं करण्यासाठी मी स्वत:ला लेखनात बुडवलं. 'चौथी भिंत' हा माझा दुसरा कथासंग्रह तयार झाला. त्यातील 'चौथी भिंत' या कथेत मृत्यूच्या दारात उभ्या असलेल्या कुटुंबानं घराबाहेर काढलेल्या वृद्ध मंडळींच्या मनातही जातीयतेची, स्पृश्यास्पृश्यतेची जाणीव इतकी तीव्र असते की तिथेही ही माणसं ज्याला त्याच्या आंबेडकरी चळवळीतील कार्यकर्त्या मुलांनी घराबाहेर हाकललं आहे अशा एका दलित वृद्धाला जगणं असह्य करतात. तो तिथेही बहिष्कृत जीवन जगू लागतो पण अखेर शेवटच्या श्वासापर्यंतही आपण दुसऱ्यासाठी, त्याच्या विकासासाठी काहीतरी करू शकतो, ही फुले-आंबेडकरी विचारांची प्रेरणा घेऊन तो वृद्ध, आदिवासी मुलांना शिकवण्यासाठी आश्रम सोडून त्यांच्या वस्तीत निघून जातो.

त्यानंतर अनेक दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या 'धिंड', 'कार्यकर्ता', 'जाब' अशांसारख्या कथांमधून दलित प्रश्नांचा वेध घेण्याचा प्रयत्न मी केला व व्यवस्थेच्या बदलाची फुले-आंबेडकरी प्रेरणेनुसार मांडणी केली. 'धिंड' या कथेतला कार्यकर्ता सवर्णांनी धिंड काढलेल्या दलित स्त्रियांना न्याय मिळवून देण्याच्या प्रयत्नात स्वत:च्या बायकोची, आईची आणि मुलीची धिंड काढतो आणि ते त्याच्या लक्षातही येत नाही असं चित्र मी उभं करण्याचा प्रयास केला. 'कार्यकर्ता' कथेत कार्यकर्त्याला त्याचा समाजच कसा विसरून जातो आणि त्याच्या बायकापोरांच्या दु:खाकडे पाठ फिरवतो हे दाखवून माणसातील सुष्टदुष्ट प्रवृत्तींकडे मी बोट दाखवलंय. मग तो समाज कोणताही असो.

फुले-आंबेडकरी प्रेरणा ही विशिष्ट समाजाला दिलेली किंवा आवश्यक असलेली प्रेरणा नाही. ती संपूर्ण मानवी जीवनाला आवश्यक असलेली प्रेरणा आहे. माणसाला माणूस म्हणून जगण्याला व त्याच्या विकासात जे जे अडथळे आणले ते ते मोडा, तोडा, फेका किंवा बदला आणि माणसाचं जगणं सोपं करा असं ही प्रेरणा सांगते. (म्हणूनच आक्रोश किंवा शिव्या हा माणसाच्या अभिव्यक्तीचा एक प्रकार मानला गेला तरी तो भाव कलात्मकतेनं मांडल्याखेरीज आपण रसिकांपर्यंत पोहोचवू शकत नाही.)

माझ्या कथेत हे दोन्ही समाजाकडून (दलित, अदलित) अपेक्षित आहे. त्यामुळे डॉ. एलिनॉर झेलियट सारख्या परदेशी दलित साहित्य समीक्षक विदुषीकडून माझ्या कथांबद्दल समाधान व्यक्त झालं आहे. दिल्लीहून प्रसिद्ध होणाऱ्या 'मानुषी' या जानेवारी-फेब्रुवारी २००१च्या अंकात त्या माझ्या चौथी भिंत कथेबद्दल लिहिताना म्हणतात,

'Chauthi Bhint (the Fourth Wall) is one of Urmila Pawar's best known stories and Urmila herself is probably the best known Dalit woman writer. Urmila combines the common theme of honouring Ambedkar and glorifying social work with the equally common theme of the shallowness of the commitment of some to Ambedkar and to social work. She does not hesitate to expose the cruelty of a family.....Dr. Eleanor Zelliot.

हीच कथा मुर्तुजापूर येथे १९९८ मध्ये भरलेल्या अस्मितादर्श साहित्य संमेलनात मी कथन केली तेव्हा तिथले काही श्रोते माझ्यावर चिडले होते. अशा तऱ्हेने उलट्या दुगाण्या तुम्ही झाडू नका अशी मला समजही देण्यात आली. अर्थात त्यांना फुले-आंबेडकरी प्रेरणेचा अर्थच कळला नव्हता. माझ्या दलित स्त्रीप्रश्नांचं सूचन करणाऱ्या कथांच्या बाबतीतही पुरुषवर्ग समाधानी नाही. दलित साहित्याला स्त्रीपुरुष समतावादाची आवश्यकता नाही. सती, विधवाविवाह, पुनर्विवाह, बालाजरठ विवाह, उंबरठ्याच्या आतील स्त्रीजीवन यांमधील समस्यांपासून आमची स्त्री पूर्वीपासूनच मुक्त आहे, स्वतंत्र आहे, तेव्हा तुमची दृष्टी विरुद्ध दिशेला वळवा असा उपदेशही मला केला जातो. अर्थात सर्व तऱ्हेच्या फायद्यावर, मानसन्मानावर पोसलेल्या सवर्ण पुरुषाचा पिंड आणि या फायद्यांपासून, आत्मगौरवापासून वंचित झालेल्या दलित पुरुषाचा पिंड यांच्या जडणघडणीत मुळातच फरक असल्यानं तो त्याच्या वागण्यातून येणं, दिसणं आपण समजून घतलं पाहिजे. दलित पुरुषांना स्वत:लाच विकसित होण्यासाठी अवधी दिला पाहिजे, याचं भानही मला एकीकडे आहे तरीही परिवर्तनाच्या किंवा क्रांतीच्या दिशेनं जाताना सुक्याबरोबर ओलंही जळतं हे लक्षात घ्यायला हवं असं मला वाटतं.

मराठी साहित्य पारंपरिक विचारांवर उभं असल्यामुळे त्यात स्त्री-पुरुषांची भाषासुद्धा पारंपरिकच आहे. पुरुष ज्या मुक्तपणानं शब्दांचा वापर करू शकतो ते स्वातंत्र्य स्त्रियांना नाही. स्त्री साहित्यामध्ये गौरी देशपांडे किंवा अलीकडे मेघना पेठे यांनी आपल्या कथा किंवा साहित्यात पुरुषांची मक्तेदारी असलेले शब्द वापरले आहेत. मीही माझ्या 'कवच' या कथेत आशय विषयाला आवश्यक अशा शब्दांचा वापर केला आहे. उदा. बाजारात आंबे, पेरू, चिकू, भोपळा, केळी विकायला जाणाऱ्या स्त्रीची त्या फळांवरून द्वयर्थी शब्द वापरून काही आंबटशौकीन पुरुष टिंगल टवाळी करतात. पोटासाठी ती स्त्री निमूटपणानं त्या अपमानाला सामोरी जाते. हा आशय कथेत मांडताना मला स्वाभाविकच ते द्वयर्थी बोलणं आणि त्या तळागाळातल्या समाजातल्या स्त्रीच्या नवऱ्याच्या व इतर माणसांच्या तोंडी असलेल्या शिव्या कथेत लिहाव्या लागल्या. मी त्या लिहिल्या आणि माझ्या कथेवर अश्लीलतेचं शिक्कामोर्तब करण्यात आलं. बऱ्याच वृत्तपत्रांतून, अंकांमधून उलटसुलट चर्चा-चर्वण झालं आणि अखेर ती कथा अश्लील नसल्याचं आणि अश्लीलता ही शब्दात नसते ती विषयात असते, मनात असते हे स्पष्ट झालं.

'कवच' ही कथा एस्. एन्. डी. टी. च्या बी. ए.च्या दुसऱ्या वर्षासाठी अभ्यासक्रमात समाविष्ट केलेली होती. ती काढून टाकावी अशीही ओरड झाली. तरुण पिढीच्या मनावर या अश्लील कथेचा विपरीत परिणाम होईल या टीकेला विद्यार्थिनींनीच सडेतोड उत्तर देऊन हे जीवनही आमच्या समोर आलं पाहिजे, त्याचा परिचय झाला पाहिजे असं त्यांनी सांगितलं. मला ही गोष्ट फारच समाधानकारक वाटते.

आंबेडकरी विचारांच्या प्रेरणेच्या मुळाशी गौतम बुद्धाच्या निरीश्वरवादी, विज्ञानवादी तत्त्वज्ञानाची बैठक आहे म्हणूनच 'ठेविले अनंते तैसेची रहावे', 'असेल माझा हरी देईल खाटल्यावरी' किंवा 'फळाची आशा न करणारा निष्काम कर्मयोग' वगैरे या 'प्रेरणे'मागे नाही.











देव किंवा दैवामुळेच घटना होत असतील तर त्यांच्या विरोधात बोलण्याचं, अपेक्षा करण्याचं किंवा हातपाय हालवण्याचंही काही कारणच उरणार नाही. कोणत्याही घटनेमागे फार मोठी कारणपरंपरा (कार्यकारणभाव) असते. तिचा शोध माणसाला विज्ञानाकडे नेणारा असतो. डोळस बनवत असतो. हा विचार आंबेडकरी प्रेरणेतून दलित साहित्यात आला आहे. हे साहित्य कालचक्र, निसर्गचक्र, त्याची गूढता, भव्यता मानतं. यात चमत्काराला स्थान नाही. किंबहुना तो शब्दही ते मानत नाही.

मराठी साहित्यात सहज येणारे सुदैवानं, दुर्दैवानं, स्वर्ग, पाताळ, आत्मा, पुनर्जन्म, नरक, भूत, पवित्र, अपवित्र या संकल्पना मीही माझ्या लेखनात वापरत नाही. त्यासाठी विज्ञानवादी पर्यायी शब्द देताना शब्दांसाठी खूप कसरत करावी लागते. चाचपडावं लागतं, शोध घ्यावा लागतो. पण मी ते सर्व प्रयत्नपूर्वक करते. 'रामबाण', 'द्रौपदीची थाळी' 'अश्वत्थाम्याची चिरंतन जखम', 'द्रौपदीला कृष्णानं पुरवलेलं वस्त्र', 'चिलिया बाळ', 'नरसिंह', 'हा सूर्य हा जयद्रथ', 'जरासंध', 'रेड्याच्या तोंडातील वेद', 'गंगाधारी शंकर', 'समुद्र गिळणारा अगस्ती', 'देव', 'दानव', 'पवित्र गंगा', 'सटवी', 'शुभ-अशुभ', 'शकुन' इत्यादी अनेक शब्द उपमा, प्रतीकं, मिथ्यसूचं शब्दांभोवतीचं पारंपरिक कवच तोडून निखळ शब्द बाजूला काढून त्यांना शास्त्रीय परिमाण देण्याची माझ्या लेखनात धडपड असते. आणि त्याचवेळी निसर्गातील ।तिमा, प्रतिकांचा मी वापर करते.

मराठी साहित्याचं सौंदर्यशास्त्र आणि दलित साहित्याचं सौंदर्यशास्त्र हा आजही वादाचा विषय आहे. काळा रंग कुरूपतेचं, नकाराचं प्रतीक म्हणून मराठी साहित्यात अनेकदा येतो. पण ब्लॅक इज ब्यूटी असं म्हणून निग्रोंनी जशी नवी सौंदर्यदृष्टी दिली तशीच दलित साहित्याच्या रूपात आंबेडकरी प्रेरणेने मराठी दलित साहित्याला नवी दृष्टी दिली आहे. आचार-विचारांतील सौंदर्य शोधण्याची, टिपण्याची, वैज्ञानिक आधाराची ती दृष्टी आहे.

दलित साहित्य फुले, आंबेडकरी प्रेरणेचं साहित्य आहे. ती एक सामाजिक चळवळ आहे, हे मान्य करूनही ते केवळ प्रचारकी साहित्य नाही हे काही अंशी रसिकांना पटलेलं आहे. एखादा रोग झाल्यानंतर त्यावर उपचार हे योग्यच आहे पण तो रोग होऊच नये याची खबरदारी जास्त महत्त्वाची असते. दलित साहित्य हे वरवरच्या समाजसुधारणांचं पर्व नाही. तर अमानुष रीतिरिवाज, मूल्यव्यवस्था मुळापासून उखडणारं ते साहित्य आहे याची पूर्ण जाणीव कोणतंही लेखन करतांना मला असते. 'धम्मचक्र' या कथेत मृत शरीर जाळून प्रदूषण निर्माण करण्याऐवजी ते पुरल्याने त्याच्या अणुरेणूंतून सृजन (नवनिर्मिती) होत रहाते, ज्याला पुनर्जन्म म्हटलं जातं पण बुद्ध तत्त्वज्ञानात याहीपेक्षा पुनर्जन्माच्या विविध छटा दाखवणारा शास्त्रीय विचार प्रचारात्मक पातळीवर उभा असला तरी तो बटबटीतपणानं रसिकांसमोर न येण्याची खबरदारीही मी घेतली आहे. अशाच मग वर्तुळ (ज्वाळा-९२), बस्ता (लोकानुकंप-९६) कौल (अभिव्यक्ती-९८) अशा काही कथा मी खबरदारी घेत लिहिल्या.

हीच खबरदारी 'मॉरिशस एक प्रवास' हे प्रवासवर्णन लिहिताना मी घेतली. 'इलास पावन्यानूं, बसा बसा' आणि 'मुक्ती' या दोन एकांकिकाही मागे उल्लेखलेले पारंपरिक शब्द,



अनुक्रमणिका

प्रतिमा, प्रतीकं टाळून लिहिण्याचा प्रयत्न केला. 'आम्हीही इतिहास घडवला' हे आंबेडकरी चळवळीतील स्त्रियांच्या सहभागाचं संशोधनात्मक पुस्तक सहलेखिका म्हणून माझ्या नावावर आहे. 'उदान' या गौतमबुद्धाच्या मुखातून त्या त्या प्रसंगी निघालेल्या उद्‌गारांचं व त्या प्रसंगांचं पाली भाषेतील पुस्तक आहे. त्याचं मी भाषांतर केलं 'एक दुवा खंडणारा'. हा माझा तिसरा कथासंग्रह लवकरच प्रकाशित होणार आहे. अधूनमधून लेख वगैरे मी लिहीत असते. सध्या आत्मकथनही मी लिहीत आहे, पण माझा खरा ओढा कथालेखनाकडेच आहे.

'एक दुवा खंडणारा' (मृण्मयी १९९४), चकवा (सांज-लोकसत्ता दिवाळी अंक १९९६) 'सुटे गिरान' (अक्षर-२००१) या कथा व सध्या माझ्या मनात जी कथाबीजं घोळत असतात त्यांचा विचार करता आताही माझ्यां असं लक्षात येतं की आज छापले, उद्या रद्दीत गेले अशाच काही अंकांमधून मी लिहिते आहे आणि मला काहीतरी विचार द्यायचा आहे, बदल घडवायचा आहे असा कोणताही हेतू माझ्या मनात नाही. केवळ कलेसाठी कला, निर्मितीसाठी निर्मिती एवढ्याच अर्थानं कथा घडत आहेत. चांगल्या उतरल्या तर आनंद होतो आहे, न उतरल्यास पुन्हा कधीतरी चांगली उतरेल अशी आशाही वाटते आहे, आणि इथे जोपर्यंत समाजात सुष्टदुष्ट प्रवृत्तींचा झगडा आहे तोपर्यंत दुष्ट प्रवृत्तींच्या विरोधात सुरुवातीला सांगितलेला माझ्या आईचा शब्द 'पेरना' (पेरलं की काहीतरी उगवेल या अर्थानं) मनात उरतोच आहे.

❑

ऊर्मिला पवार,
बी-६०७, विल्मर हौसिंग सोसायटी,
दत्ताणी पार्क, कांदिवली (पू.) मुंबई ४०० ००१.

**शहापूर शाखेचे कार्यकारी मंडळ**

कार्याध्यक्ष : श्री. सूर्यकांत पांडुरंग देशमुख
अध्यक्ष : श्री. भगवान दत्तात्रय धर्मे
उपाध्यक्ष : श्री. प्रकाश बाबुराव माळी
सौ. कुमुदिनी दिनकर घोडके
कार्यवाह : श्री. गंगाधर परशुराम पंडित
सहकार्यवाह : श्रीमती लता यशवंत बढे
कोषाध्यक्ष : श्री. प्रकाश पांडुरंग भागरथ

सदस्य :
श्री. वीरेंद्र भिकुभाई शहा
श्री. रमाकांत देशमुख
श्री. वसंतभाई गांधी
श्री. संजय प्रभाकर श्रीमाळी
श्री. आत्माराम तुकाराम सूर्यराव
श्री. सुधाकर बाळकृष्ण जोशी
श्री. भानुदास ओंकार काकडे
सौ. विद्या शरद वानखेडे
श्रीमती शुभांगी गोरे

दि. २२ जुलै २००१ रोजी स्थापन करण्यात आलेल्या म.सा.प.च्या शहापूर (जि. ठाणे) शाखेला रीतसर मान्यता देण्यात आली आहे.

# भोवतालच्या परिसरातून लेखनाची प्रेरणा मिळते



सदानंद देशमुख



**आ**पण लेखक कसे झालो, हा प्रश्न कधी कधी मनाचे पीठ करतो. घरात कुठलेच वाङ्मयीन वातावरण नव्हते आणि रात्रंदिवस ढोरमेहनत करूनही कडकी भोगणारे असे कुटुंब. स्थैर्य, स्वस्थता नाहीच. दुपारची भाकरी हातावर घेऊन रोज खावी आणि मनात सगळ्यांच्या घ्यास बारोमास न संपणाऱ्या कामाचा. बापाची कामाची शिस्त भयानक. त्यामुळे वाचन दूर, शाळेत जाण्याचीही चोरी. 'कुठं शिकून बॅरिस्टर होणार हाये बे! चाल, व्हय वावरात.' वावरात, घरात, बायकात, मायची जन्मजात वेदना मात्र काळजात. भोगवटाच तिच्या आयुष्याचा. गाण्याचा, पोथ्या-पुराणाचा तिला नाद भारीच. रात्री झोपताना पदरात घेऊन कुठल्या कुठल्या कथा सांगायची. राजा-राणीच्या आणि देवादिकांच्या, भूताखेतांच्या. हे लोककथांचं धन तिच्यात संस्कारित झालं असावं वंशपरंपरेने. तसेच ती गीतंही. काळजाचा ठाव घेणारी. बहिणाबाईच्या कुळाचीच होती ती. अस्सल आई असावी तशी. शारीरिक जडणघडणीत अनुवंशिकता येते तशीच ती मनाच्या जडण-घडणीतही येत असावी आणि ती आल्यामुळेच आपण लेखक झालो असावं, असं वाटत राहतं.

गावात योगायोगाने ग्रंथालय होतं आणि कमिशनची आशा ठेवून फोकलट पुस्तकांची गर्दी करणाऱ्यांपैकी ग्रंथपाल नव्हता. त्यामुळे चांगलीच पुस्तके होती. तिथे फडके, खांडेकर, माडखोलकर, गडकरी, गो. नी. दांडेकर केव्हाच म्हणजे सातव्या-आठव्या वर्गातच संपवले. पुस्तक घ्यायचं आणि ढोराकडं असताना बापाच्या चोरून वाचायचं. उन्हाळ्याच्या सुटीत एकपारणी काम असायचं आणि मग दुपार आपली हक्काची. इकडं-तिकडं टिवल्याबावल्या करणाऱ्या पोरांना टाकून आपण अंगणातल्या लिंबाखाली वाचत बसायचं खाट टाकून. कधी




प्रा. सदानंद देशमुख

- जानेफळ (ता. मेहकर, जि. बुलढाणा) येथील श्री. स. क. कला विज्ञान महाविद्यालयात प्राध्यापक
- ग्रामीण कादंबरीकार आणि कथाकार, तहान आणि बारोमास या दोन कादंबऱ्या आणि लचांड, उठावण, महालूट व रगडा असे चार कथासंग्रह.
- लेखनाचे दहा पुरस्कार प्राप्त झालेले
- विदर्भ साहित्य संघाच्या केंद्रीय कार्यकारिणीचे सदस्य.

कधी बाप चिडायचा. पण माय पाहत राहायची डोळ्यांत कौतुक घेऊन.

'एवढं काय वाचतू बाप्पा पुस्तकात ?'

'मां, तू सांगते तशा गोष्टी अस्तात इच्यात.'

'वाच बाप्पा ! पुढं सागाय कामी येतील.'

वाचनाचं वेडच लागलं होतं आणि नको त्या वयात नको त्या गोष्टीवर झिलप्या झाडण्याची सवयच लागली मग. वाचलेलं, वाचून झालेलं तिथंच संपत नव्हतं. ते सारखं मनात धुडगूस घालत राहायचं. पुढं पुढं वाढत्या वयात हे फारच झालं. नांगराची मूठ धरून चालताना आगोलीतला माणूस बैल हाकायचा आणि कुई कुई वाजणाऱ्या चाकाच्या गतीनं पुस्तकातलं माझ्या मनात. किंवा उन्हाळपाळीत वखराची माती पाशीवरून पडताना मनाच्या पाशीवरूनही तशीच वाचनातल्या संस्मरणीय गोष्टीची माती उचकटत रहायची. येथे आवर्जून एक खुलासा करावासा वाटतो. शेतकऱ्याच्या कुणबिकीत जसा गोऱ्हा आंड ठेचून फार लवकर औताफाट्याला पेटवला जातो, तसंच पोर्गही जरासं टणक झालं की त्याचीही ढोराकडून लवकरच औताफाट्याच्या कामावर बढती होते. आणि फार दिवस ढोरं चारणारं पोरगं पुढं नेभळट समजलं जातं आणि तसं म्हणू म्हणू ते होतंही.

बनगरवाडी, महानंदा, चक्र, स्वगत, कोसला, गोतावळा, पाचोळा या आणि अशाच कितीतरी कादंबऱ्यांची कथानकं, त्यातली पात्रं मनात फेर धरून. अम्मा सकाळी तंगड्या फाकून का चालत असावी ? कारभारी आपल्या गावातल्या अमृतराव आप्पासारखाच आहे. नारबाचं असं का होत असावं ? आपल्या कामावरच्या मुंज्या दौलात नारबा दिसायचा. गावाच्या पाणवठ्यावरल्या अलका तनपुरेत महानंदा दिसायची. असंच काही पुस्तकातलं मनात घोळत रहायचं आणि भक्कम करमायचं.

आणि असं ज्यात भक्कम भक्कम करमते, त्याच विश्वात मग हरवून गेलो. कथा, कादंबऱ्यांचं विश्व मन:चक्षुपुढे साकार होताना अद्भुत वाटायचं आणि कादंबरीतला मृत्युंजय कर्ण माझ्या शेती-शिवारात अवतीभवती सांजवता-उगवता दिसायचा आणि मग ते लिहिणाऱ्या लेखकांप्रती मी भलताच नम्र व्हायचो. त्यांना पत्र लिहायचो. त्या काळात जयवंत दळवी, शिवाजी सावंत, ना. धों. महानोर, आनंद यादव यांनी पत्रांना जी उत्तरं दिलीत, ती काळजावर मोहोर उठवणारी ठरली. आपणही आपल्या भोवतीचं जे आहे, ते कथेत, कवितेत शब्दबद्ध करू शकतो, असा आत्मविश्वास ग्रामीण पार्श्वभूमीवरच्या सर्वच कथा-कादंबऱ्यांनी दिला.

या काळात किंवा आधीही जी अंगभूत संवेदनशीलता होती, ती वाचनाने भलतीच शीगवर झाली आणि मी भलताच हळवा, चिंतनशील, चिकित्सक झालो. हे सगळं दहावीच्या आतलं. आणि त्याही पलीकडचं एक सांगितलंच पाहिजे. गावात मोकाट फिरणारे भाकरीसाठी तडफडणारे कुत्र्याचे पिलू पाहून गलबलून यायचं आणि असं वाटायचं की, पुढे मोठे झाल्यावर आपण खूप श्रीमंत होऊ आणि सगळ्या बेवारस पिलांना एकत्र पाळू. त्यांना भरपेट भाकरी घालू किंवा डोईवर बोचकं, बगलेत लेकरू आणि हातात काठी अशा थिगळाच्या लुगड्यात त्या काळात खेड्यापाड्यांतल्या गल्लीबोळात 'भाकर वाढ ग मायऽऽ' असं ओरडत पारधी समाजाच्या











बायका फिरायच्या. या सगळ्या भिकारणींना भरपूर वाढून आपण त्यांचं भीक मागणं बंद करू. आणि गावात अमुक एक असा श्रीमंत माणूस आहे पण तो असं का करत नसावा, असं वाटून त्याचा राग यायचा.

याच काळातल्या दोन घटनांचा उल्लेख करतो. आणीबाणीचा काळ आणि पोलिसांना भलतंच महत्त्व. पोलीस दिसला की, भल्याभल्यांच्या काळजाला कंप, घशाला कोरड, आणि अंगावरचे रोमांच ताठ. कारण त्या काळात सरसकट सुरू झालेली कटाई. भोळ्या, भाबड्या, नसबंदीला कटाई म्हणणाऱ्या लोकांची धरपकड. पोलीस गाडी घेऊन यायचे आणि जीपमध्ये कोंबायचे. दवाखान्यात रवानगी आणि सक्तीची नसबंदी. भले भले लोक त्या काळात शेता-शिवारात पांढरीतल्या पंधाडात लपून बसायचे. सरकारी कर्मचारी त्यांना तिथून हुडकून काढून दवाखान्यात न्यायचे. तेव्हा रस्त्यावरून बायका 'माह्या नवऱ्याचं आपरेशन नका करू हो सायेबऽऽ' म्हणून टाहो फोडत गाडीमागे पळायच्या. पोरंसोराचं लेंढार त्यांच्यामागे रडत बोंबलत पळायचं. गावपातळीवर बसलेला आणीबाणीचा हा उल्लेखनीय फटका. गढीवर शाखा भरायची. ती शाखा घेणाऱ्या आर. एस. एस.च्या बऱ्याच लोकांना तुरुंगात नेतानाही पाहिलं. काहींनी धाकमारी संघ सोडल्याची चर्चाही गावगप्पांत ऐकली. या सगळ्यांतून गावाला ढवळून काढू शकणारी अशी एक सरकारी शक्ती असते, याची जाणीव होऊन दृष्टी अधिक व्यापक झाली.

दहावीनंतरच्या काळात लागोपाठ मायबाप मेले. आम्ही भाऊ उघडे झालो. मिळेल त्या दिशेने जो तो वाटेल तसा मनमानी झाला. पण शेतीला चिकटून राहणं अणि पुस्तकाचं वाचन ह्या गोष्टी कायम. नंतर कुटुंबाचं गाडं व्यवस्थित सूती पाती लागल्यावर पुन्हा दोन वर्षांनी कॉलेजला प्रवेश घेतला. पण दरम्यानच्या काळात उसवून टाकणारं बरंच काही वाट्याला आलेलं. त्या ध्यासातून 'देवाघरचं मरण' ह्या पहिल्या कथेने सुरुवात झाली. ही कथा महाराष्ट्र टाइम्सच्या रविवार पुरवणीत छापून आली आणि मग आपल्या भोवतीचं वास्तव, व्यक्तिरेखा, समस्या, यांना कागदावर मांडण्याचा ध्यासच लागला. दुःख, अस्थिरता हे सगळं होतंच. पण शब्दाच्या संगतीमुळे सारे अनुभव घेण्याच्या भूमिकेतून घेतलेले. तरुणभारत, लोकमत, लोकशिक्षण, किर्लोस्कर इत्यादीमधून कथा येत होत्या. पहिला संग्रह बी. ए. होण्याच्या आधीच. नंतर 'अंधारबन' ह्या नावाने तो प्रकाशित होऊन अंधारबनातही गेला.

ह्या काळात मग लेखनाचं वेडच लागलं. साभार परतचा फारसा फटका बसला नाही. त्यामुळे सातत्य कायम राहिलं. एक गोष्ट मात्र झाली. 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये जी कथा छापली गेली, त्या कथेला फारच सुंदर कथाचित्र काढलं होतं दत्तात्रय पाडेकर यांनी. मोट-नाडा, विहीर, विहिरीच्या काठावरचा घनदाट आंबा, फेटेवाला आज्या आणि अंगावर कावळे बसलेला कासावीस झालेला, घायाळ उंगऱ्या बैल बगळ्या. आपण लिहिलेल्या गोष्टीसाठी एवढं सुंदर चित्र, एवढं सुंदर रेखाटन चित्रकार करू शकतो, हे पाहून तर मी भारावूनच गेलो. आणि आता पाठवलेल्या कथेसाठी कसं चित्र असेल याची आतुरता वाटू लागली. लेखकाला त्याच्या लेखनांसाठी चित्रंही प्रेरणा देऊ शकतात, याचा प्रत्यय आला.

मग मात्र काय लिहायचं, कसं लिहायचं ह्या बाबी नंतर आपल्या आपल्यालाच कळू लागतात. ज्याला कळतात त्याच्यातल्या बाळबोध गोष्टी संपून जगण्याला अणि लेखनालाही पोक्तपणा येतो. ज्याला कळत नाही, त्याचं शंभर पुस्तकं लिहूनही त्याच्या मरण्याआधीच मातेरं होतं.

'लचांड', 'उठावण', 'महालूट' ह्या संग्रहांतल्या कथा ह्या दुसऱ्या वळणावरच्या थांबून, मागे पाहून लिहिलेल्या कथा होत्या. बेकारीनंतरच्या काळात जे चटके, जो मनस्ताप, ज्या वेदना मला सहन कराव्या लागल्या, दुसरीकडे शहरी-ग्रामीण माणसांची तुलना करताना अन्यायग्रस्ताची असहायता कळून आली आणि एकूणच समाजव्यवस्थेतील चीड आणणाऱ्या ज्या गोष्टी होत्या, त्या अधिक समजून घेऊन त्यातून कथा आकारत गेल्या. लेखनातला हौसेचा भाग संपला होता आणि लेखन ही एक गरज झाली होती.

लेखक म्हणून आपण मराठी साहित्यक्षेत्रात स्थिर होऊ शकतो, असा आत्मविश्वास आल्यानंतर मग लेखन हे एक व्रत म्हणून स्वीकारणारी दृष्टी आली आणि व्रतसाधनेसाठी जी काही म्हणून तयारी करावी लागते, ती करीत असताना अस्तित्ववाद आणि वास्तववाद हे अधिक जवळचे झाले. महत्त्वाच्या सामाजिक समस्यांना व्यक्तिगत, कौटुंबिक आणि गावपातळीवरच्या समतळातून स्पर्श करता येऊ शकतो, असा निष्कर्ष मी 'तहान' कादंबरीच्या लेखनपूर्व अवस्थेत काढला आणि पाणीटंचाईच्या पार्श्वभूमीवरील भयावह नाट्य मनाभोवती फेर धरून नाचत राहिले.

पाणीटंचाईच्या भयानक दिवसांत केवळ मानवी जीवनच होरपळून निघत नाही, तर या ग्रामीण जीवनाचा अविभाज्य घटक असणारे शिवार-शेते, गुरे-ढोरे, पशु-पक्षी व प्राणी यांनाही या अभावग्रस्त परिस्थितीची फ़ार मोठ्या प्रमाणात झळ पोहोचते. त्यामुळे त्यांच्या चित्रणालाही महत्त्वाचे स्थान प्राप्त होणे अपरिहार्य होते.

'तहान' कादंबरीच्या लेखनात आणि चिंतनात चार वर्षे गेली होती. ती लिहीत असताना आजचे खरे खेडे मराठी साहित्यातून दिसत नाही. शहरात स्थायिक झालेले ग्रामीण लेखक आपले पूर्वानुभव पुरवून पुरवून लेखनातून वापरत आहेत. त्यामुळे ग्रामीण लेखनातील उत्कटता हरवून ते जुनाट व शिळे झाले, त्यात ताजेपणा वाटत नाही, असे मध्यंतरीच्या काळात ऐकायला येत होते. त्या दृष्टिकोनातून मी अधिक जागरूक व अंतर्मुख झालो होतो. आपण स्वतः खेड्यातले आहोत, हे मांडण्यासाठी जाणीवपूर्वक खेड्यात राहात आहोत, त्यामुळे आपल्याला ही उणीव भरून काढता येईल असे वाटत होते. बदलत्या ग्रामीण समाजजीवनाला, अर्थार्जनाच्या अपुऱ्या संधीमुळे मानसिकदृष्ट्या सैरावैरा झालेल्या माणसांच्या व्यथा-वेदनांना शब्दरूप देण्यासाठी माझी नेहमीच झटापट सुरू असते. या कादंबरीत त्या संदर्भात आपण यशस्वी होऊ किंवा नाही, असे मला वाटत होते.

पण 'तहान'ला जे वाङ्मयीन यश नंतरच्या काळात मिळाले, त्यामुळे त्या संदर्भात आपण यशस्वी झाल्याचे समाधान मला मिळाले. 'तहान'ला 'मॅजेस्टिक प्रकाशन'चा — जयवंत दळवी स्मृती कादंबरी पुरस्कार — मिळाला आणि माझ्या लेखनाचे, धडपडीचे, निष्ठेने

केलेल्या कार्याचे खरे कौतुक होऊन आपल्याला न्याय मिळाला, असे मला वाटले.

भावनेला चिंतनाने आणि चिंतनाला अक्षरांनी साद घातली आणि सूर जुळत गेले हे एक बरंच झालं म्हणायचं. नाहीतर प्राथमिक अवस्थेत पायाखालची वाट अशी खडतर आणि अवघड होती की, केव्हाही कुठेही पाय घसरून पडतो तर ह्या क्षेत्रात पुन्हा उठतोच ना. असे पर्यावरण भोवती होते. पण ते होणे नव्हते. हें होणे होते —

*मज कळेना चालताना दु:ख कैसे फूल झाले*
*अन् कुणाचे दिव्य आशीर्वाद मज घेऊन आले*
*अक्षरे चुरगाळिता मी अमृताचे कुंभ प्यालो*
*अन् उद्याच्या जीवनाची सांगता घेऊन आलो...*

अर्थात दमछाक करणारा हा प्रकार आपण कशासाठी करतो ? अशा प्रश्नाचे मळभ दाटून येते. सातत्य आणि ते टिकवण्यासाठी वैयक्तिक आयुष्यात बऱ्याच गोष्टींचा करावा लागणारा त्याग, यातून मनासारखे काही मिळत असले तरी बरेच काही गमवावे लागते. अर्थात ते फारच वैयक्तिक आणि तकलादू आहे, याचीही जाणीव संवेदनशीलतेचा कहर झाला की होते.

थोडं परंतु लक्षवेधी असं काहीतरी लिहून व्हावं असं वाटत राहतं. मनात जे काही दाटून येतं, ते आवेगात लिहून न काढता थोडं थांबून, कशासाठी ? काय ? कसं ? असे प्रश्न केले की उत्तरं आपोआप मिळत जातात. आणि आवश्यक ते योग्य तो परिवेष घेऊन साकार होतेच होते. तिथे मग आपला नाईलाज होतो. असा नाईलाज होणे महत्त्वाचे. मुळात काही अनुभवच असे असतात की, ते थांबायला तयार नसतात. या संदर्भात 'तहान' आणि 'बारोमास' ह्याही कादंबरीचे उदाहरण देता येईल.

मानवी जीवनातल्या विपरीत, नाट्यमय, अनाकलनीय अशा गोष्टी आणि थांग न लागणारा मानवी मनाचा तळ, वैफल्य, उदासीनता आणि तेवढीच पराकोटीची उत्कटता अणि संवेदनशीलता ह्या बाबी लेखनासाठी पहिल्यांदा अंगभूत असाव्या लागतात. बाकी सगळं मग सातत्य आणि मेहनतीने येत जातं. वैचारिक वाचन लेखनाला शिस्त आणि भारदस्तपणा देतं.

मी स्वत: शेती केलेली असल्यामुळे शेतीतील अस्मानी-सुलतानी अनुभव काळजातून घेत आल्यामुळे हे सारं विस्तारानं आलं पाहिजे असं सारखं वाटतं रहायचं. आणि सगळे धागे जवळ यायचे. एकांताच्या पारावर ह्या आशयसूत्राच्या हाका असह्य होत होत्या. आणि निश्चित असे कथानक, पात्र, प्रसंग, संवाद असे भोवतालातून आपले आपण तयार होत होते. तसे मी ते होऊ देत होतो. अशा त्या आकाराला वाढू देताना, आल्हाद, आस्वाद, अस्वस्थता अनुभवताना मग व्यवस्थित सिद्ध होऊन निश्चित अशी वैचारिक बैठक घेऊन मनातल्या भावनेला आभाळपाखराने भुईवर उतरावे, तसे कागदावर उतरू दिले. पण हे करताना पुन:पुन्हा स्वत:ला सावरून धरले. कारण मला केवळ भावकथा नको होती. एका कलात्मक मांडणीसोबतच, वर्तमान ग्रामीण समाजव्यवस्था, वास्तवदर्शी जीवनदर्शन, बदलती मूल्ये ह्या सर्व बाबींचा समतोल साधायचा होता. 'बारोमास' कादंवरी लिहिताना काही निश्चित भूमिका होती. ती खालीलप्रमाणे —

भारतीय कृषी व्यवस्थेची रोगट अवस्था सनातन आहे. सततच्या आक्रमणाच्या रेट्याखाली पहिल्यांदा रगडा व्हायचा तो ह्या देशातील शेतकऱ्यांचा. इंग्रजांच्या एकछत्री राजवटीत तर कहर झाला. रयतवारी, महालवारी, कायमधारा अशा प्रत्येक पर्यायी करपद्धतीत येथील शेतकरी डोके वर काढू शकणार नाही, कायम कर्जाच्या ओझ्याखाली दडपला जाईल, अशी व्यवस्था केली गेली. येथील असंघटित व पिचलेल्या शेतकऱ्यांनी तोंड दाबून तो मार सहन केला. नव्या लोकशाही व्यवस्थेत करपद्धतीत सुधारणा झाल्या ही बाब दिलासा देणारी भासली, तरी व्यापारी आणि नोकरशाही यांच्या तुलनेत शेतीचा दर्जा कनिष्ठ झाला असून आपले जगणे कितीतरी मागासलेले आणि लाजिरवाणे आहे, याची जाणीव शेतकरी वर्गाला होऊन आपल्या व्यवसायाबद्दलच त्यांच्या मनात घृणा निर्माण झाली आहे. रोगट कृषी व्यवस्थेचा जुनाट रोग आता एवढा विकोपाला गेला आहे की, तो औषध उपचाराने बरा होणार नाही. त्यावर निर्णायक शस्त्रक्रिया हाच एकमेव उपाय आहे, अशा प्रतिक्रिया आता मातीतून उमटू लागलेल्या आहेत.

फार झपाट्याने आणि अनाहूतपणे शेतकऱ्यांना खुल्या व्यापारी धोरणाला, जागतिकीकरणाच्या लाटेला सामोरे जावे लागत आहे. इतर वस्तूंप्रमाणेच कमी दरात उपलब्ध होणारा परदेशी शेतमाल ही महत्त्वाची समस्या आहे. आयात आणि निर्यातीचा समतोल साधला गेला नाही तर परिणाम भीषण होणार आहेत.

आधीच पेरले तर पिकत नाही आणि पिकले तर विकत नाही, अशा अस्मानी सुलतानी गर्तेत शेतकरी वर्ग सैरभैर झाला आहे. त्याला सावरायचे असेल तर शेतमालाच्या निर्यातीवर भर देणे जसे आवश्यक आहे, तसेच अर्थव्यवस्थेचे विकेंद्रीकरणही आवश्यक आहे. त्यासाठी भविष्यात कारखाने आणि उद्योगधंदे निर्माण झालेच तर ते निग्रहाने ग्रामीण भागातच निर्माण केले जावेत. तेथील प्रक्रिया केंद्रातून शेतकरी कुटुंबातील निदान एकाला तरी अर्थार्जनाची शाश्वत मासिक सोय उपलब्ध होईल, अशी व्यवस्था करणे आवश्यक आहे. त्यामुळे विकल मानसिकतेच्या शिक्षित बेकार पिढीला नवी दिशा गवसू शकेल. अन्यथा शेतकऱ्यांच्या मुलांचा हा बेकारीचा आणि वैफल्याचा लोंढा कोणत्या दिशेला आणि किती वेगाने भरकटत जाईल, ते सांगता येणार नाही. आधीच टीव्हीवरील विविध वाहिन्यांवरून संपन्न शहरी भागाचे, तेथील धनिक वर्गाचे, भौतिक सुखसोयींनी युक्त असे भपकेबाज व वैभवशाली जीवन ग्रामीण भागातील बेकार तरुण हपापल्या मनाने पाहतो आहे. त्यातून त्याच्या मनात स्वतःच्या जगण्याबद्दल आणि परिसराबद्दल न्यूनगंड निर्माण व्हावा असे वातावरण सामाजिक पर्यावरणात निर्माण झाले आहे. अशी ह्या तरुण वर्गाची बदलती मानसिकता सर्व कंगोऱ्यांसह मांडणे, हा माझा हेतू होता. त्याचप्रमाणे शेतकरी कुटुंबातील स्त्रीची वेदनाही काळजाच्या चिंध्या करून टाकत होती, हे वास्तव एकीकडे आणि राजकीय निर्णय आणि अस्मानी संकटापुढे हतबल ठरलेला शेतकरी वर्ग दुसरीकडे. सगळ्याच गोष्टी असह्य झाल्यावर आणि लागवडीचा खर्च वसूल होत नाही, कर्जबाजारीपणा वाढत जातो. त्यातून आत्महत्या हाच पर्याय बाकी राहतो. मात्र आत्महत्या करणे हे भ्याडपणाचे लक्षण आहे, असे तत्त्वज्ञान शब्दातून मांडणे सोपे असले तरी आत्मगौरव











हरवलेला भूमीपुत्र काही अचानक आत्महत्या करीत नसतो. खरे म्हणजे ह्या अशाश्वत आतबट्ट्याच्या व्यवसायात पदोपदी दडपून चालताना एकूण व्यवस्थेकडून, गणागोताकडून त्याच्या आत्म्याची हत्या केली जात असते आणि फक्त दृश्य स्वरूपात तो देहहत्या करीत असतो, असे सत्य या प्रश्नाचा मागोवा घेतल्यानंतर हाती आले. ते कलात्मक पातळीवर मांडताना एकूण जीवनव्यवहाराची सांगती लावताना पार दमछाक झाली.

समाजव्यवस्थेच्या वर्तुळाचे पहिले आणि शेवटचे टोक कुटुंब असते. मूल्यभेदातून निर्माण होणारे ताणतणाव ही आजच्या कुटुंबाची जटील समस्या झाली आहे. समकालीन वास्तव लेखनातून अभिव्यक्त करण्याचे व्रत घेतल्यानंतर मानवी जीवनातील प्रेम, ईर्ष्या, द्वेष, महत्त्वाकांक्षा, अपेक्षा आणि अपेक्षाभंग, निष्ठा, मनोधैर्य या व इतर मानवी मनाशी निगडित असणाऱ्या गुणधर्मांना आपोआप महत्त्व प्राप्त होत असते. शेतकऱ्याच्या जीवनाला 'बारोमास' वेढून असणाऱ्या जन्मजात वेदनेच्या हुंकारातून ही कादंबरी आकाराला आली आहे. माझ्या भोवतालचा ग्रामीण परिसर हेच तिचे आणि माझ्या एकूण लेखनाचे प्रेरणास्थान आहे. ह्या माणसांच्या समस्या साहित्यातून मांडून झाल्या, असे वाटले तर त्या ठिकाणी थांबताही येईल. आणि मग रस्त्यावर उतरून प्रत्यक्ष चळवळ उभारणे हा पर्याय ह्या थांबण्यानंतरचा असेल.

❑

सदानंद देशमुख
जानेफळ, ता. मेहकर, जि. बुलढाणा.
दूरध्वनी : (०७२६८) ६२८१८

---

**सप्रेम नमस्कार... !**

मित्रहो,

म. सा. प. चा ९६ वा वर्धापनदिन दि. २६ मे रोजी साजरा झाला आणि पाठोपाठच साहित्यपत्रिकेचा हा ३०१ वा अंक आपल्याकडे रवाना होत आहे. आता पुढील चार वर्षांत मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती या क्षेत्रांत सातत्याने कार्यरत असलेली आपणा सर्वांची महाराष्ट्र साहित्य परिषद, शताब्दी साजरी करेल. ही चार वर्षे आपणा सर्व कार्यकर्त्यांच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाची आहेत. शाखा-विस्तार, शाखा-मेळावे, विभागीय संमेलने याचबरोबर आपापल्या शाखेचे विविध वार्षिक कार्यक्रम आयोजित करून, जात-पात-धर्म-पंथ या चौकटी मोडून आपण आपल्या मातृभाषेला अधिकाधिक समृद्ध करू या ! माऊलीच्या आकांक्षेला सत्यरूप देऊ या ...!

*माझा मराठाचि बोलु कवतुके ।*
*परी अमृतातेहि पैजासि जिंके ।*
*ऐसी अक्षरे रसिके । मेळवीन ॥*

**रवीन्द्र भट**, प्रमुख कार्यवाह



अनुक्रमणिका







# माझ्या कलाविष्कारांची पार्श्वभूमी

❑

डॉ. सुधीर रा. देवरे

❑

**काल :**

बालपणापासून साहित्याचा छंद असला तरी मी साहित्याकडे सजग आणि चिकित्सक दृष्टीने पहायला लागलो ते १९८२ -१९८३ च्या आसपास. पण माझे दुर्दैव असे की, जेव्हा मला 'सत्यकथा'सारख्या साहित्यदृष्ट्या गंभीर आणि प्रायोगिक नियतकालिकाचा पत्ता लागला, तेव्हाच ते नेमके बंद पडले.

लहानपणी इसापनीती, पंचतंत्र, बिरबलाच्या गोष्टी, हातिमताई, अलिबाबाच्या गोष्टी, शिवलीलामृत, नवनाथाची पोथी, पांडवप्रताप, रामरक्षा, हरिपाठ, व्यंकटेशस्तोत्र अशा पोथ्या-पुस्तकांपासून मला वाचनाची आवड लागली. इयत्ता पाचवीत असतानाच राम गणेश गडकरी यांचे 'भावबंधन' हे नाटक अपघाताने माझ्या हातात आले आणि अनेक संवाद कळले नाहीत, तरी ते नाटक पूर्ण होईपर्यंत मी वाचत राहिलो. त्या भाषेच्या मोहिनीचीच ती किमया होती. पुढे 'श्यामची आई', 'ययाती', 'मृत्युंजय', 'स्वामी' अशी अनेक पुस्तके कुठून कुठून मिळवून वाचली. याच काळात शशी भागवत यांच्या 'मर्मभेद' या पुस्तकानेही माझ्यावर चेटूक केले होते. मात्र घरात वाचन-लेखनाची कोणतीही पूर्वपरंपरा नव्हती. वडील साधे प्राथमिक शिक्षक होते. शाळेत मराठीचा तास हा माझा सर्वांत आवडता तास असायचा. लेखकांबद्दल जबरदस्त आकर्षण वाटायचे. शिक्षक कविता शिकवायला लागले की, तेव्हा मी समरसून देहभान हरपून जायचो. माझ्यातील कवीचा पिंड शालेय अभ्यासक्रमातील पाठ्यपुस्तकातील विविध कवितांवरच पोसला गेला.

दरम्यान काहीतरी लिहीत होतो. शिवलीलामृताच्या जबरदस्त पगड्याने मी प्रथम इयत्ता सातवीत असताना शंकराची नवी आरती लिहिली होती. ती आरती मी लिहिली असेल, यावर घरातील कोणाचाही विश्वास बसत नव्हता. यावेळी मी 'शिवलीलामृत' या ग्रंथाची पारायणांवर पारायणे करत होतो. या ओवीरूप गेय भाषेवर मी लुब्ध झालो होतो. अकरावा अध्याय तर



डॉ. सुधीर रा. देवरे, एम्. ए., पीएच्. डी.

- अहिराणी भाषा, आदिवासी संस्कृती आणि लोकसाहित्य यांचे अभ्यासक-संशोधक
- अनेक मराठी नियतकालिकांतून सातत्याने लेखन
- एकूण सहा पुस्तके प्रसिद्ध झालेली. काही पुरस्कार मिळालेले.

माझा तोंडपाठ झाला होता. या अकराव्या अध्यायात इयत्ता आठवीत असताना मी 'सती पतिव्रता महानंदा' नावाचे नाटक लिहिले होते. त्यात 'भावबंधन'च्या प्रभावाने मी नाट्यपदेही लिहिली होती. हे नाटक पाच अंकात लिहून पूर्ण केले होते. ते आता सापडत नाही. अधूनमधून कविता, कथा लिहित होतो. त्यासाठी मी परवडत नसतानासुद्धा, स्वतंत्र वह्याही ठेवत होतो.

दहावीची बोर्डाची परीक्षा झाली आणि मी नव्या जोमाने वाचनाकडे वळलो. वाचायची भूक वाढत गेली पण विरगावसारख्या खेडेगावात पुस्तके मिळून मिळणार किती आणि कोणती? मग हातात पडेल ते बरे-वाईटही वाचण्यात आले. अशा काहीही वाचण्यातून चांगले काय ते कळू लागले. एक स्वत:चाच दृष्टिकोन तयार झाला.

पुढे कवितारती, संवाद, अक्षर चळवळ, प्राजक्त, ओवी, अभिरुची, रुची, किर्लोस्कर, स्त्री, वाङ्मयशोभा, उगवाई, ब्र, शब्दालय, सत्याग्रही विचारधारा, सावाना, आविष्कार, जाणीव, कला-आविष्कार, ललित, आरती, अनुष्टुभ आदी नियतकालिकांतून माझ्या कविता येऊ लागल्या.

**आदिवासी जीवन-जाणिवा :**

बालपणापासूनच वरील अनुभवांच्या समांतर आदिवासी जीवन जाणिवाही माझ्या मनात आकार घेत होत्या. आमच्या घरापासून हाकेच्या अंतरावरच भिल्ल लोकांची भिलाटी वसलेली होती. भिलाटीत कोणताही उत्सव, कार्यक्रम असला की, मला लगेच सुगावा लागत असे.

भिलाटीतील लग्न, चिरा बसवण्याचा कार्यक्रम, होळी, आखाजी, ढोलावरचा नाच, पावरी गीतं, डोंगऱ्या देवाचां उत्सव, थाळीवरची कहाणी, खंजिरी, तुणतुणे अशा लोकवाद्यांची धून, सांबळावरचा नाच प्रत्यक्ष पहायला-ऐकायला मिळायचा. मन हरखून जात असे. सर्व लोककलांची अस्सलता त्या बालवयातही लक्षात येत असे.

कानबाई, रानबाई, गौराई, काठीकवाडी, आईभवानी, सप्तशृंगी, आसरा, खंडोबा, म्हसोबा, रोकडोबा, वीरदेव ही लोकदैवते आजूबाजूला पहात होतो. त्यांची उग्र उपासना पहात होतो. गोंधळी, मरीआई, वासुदेव, रायरंग, नंदीबैलवाले, टिंगरीवाले यांची कला, नकला, आवाज, गाणे ऐकून नकळत एक स्वतंत्र दृष्टी तयार होत होती. हे विश्व वेगळे आहे, आदिम आहे आणि आपण त्यात संमोहित होऊन आकर्षिले जात आहोत, याची जाण मला तेव्हाही असे. अशा आदिवासी उत्सवात दिवसभर तहानभूक विसरून मी भावनिकदृष्ट्या सामील झालेलो असायचो.

विरगावला भोवाडा हा लोकोत्सव सलग तीन रात्रभर चालत असे. दिवसा अजिबात झोप न घेता मी सलग तीन रात्री जागून संपूर्ण भोवाडा पहात असे. खंडोबाचा 'आडीजागरण' कार्यक्रम असाच रात्रभर चालत असे. हा कार्यक्रमही लहानपणी मी आख्खी रात्र जागून पहात असे. रानबाई, काठीकवाडी आणि भिलाटीतील डोंगऱ्या देवाचा उत्सव हे कार्यक्रमही रात्र-रात्र जागून पहात असे.

विरगावातले हे विश्व सोडून दूर शहरात गेल्यानंतर आदिवासी लोककलांचे महत्त्व मला जास्तच जाणवू लागले. त्याच्यातली नैसर्गिकता आणि सहजता यांची ओढ वाढू लागली. आदिवासी जीवन जाणिवांच्या कला ह्या काळाला पुरून उरणाऱ्या आहेत, याचा साक्षात्कार

झाला आणि लहानपणी प्रत्यक्ष अनुभवलेलं कागदावर हळूहळू उतरायला लागलं. त्यातून वेळोवेळी आदिवासी कला, लोकजीवन व लोक वाङ्मयावर थोडेफार लिखाण होऊ लागले, होत आहे. माझ्या शोधनिबंध, प्रबंध लेखनाबरोबर कथा, कविता आणि नाटकांतही म्हणूनच आदिवासी जीवनबंधाचे प्रतिबिंब पडलेले दिसते.

**आज :**

कलाकार बालपणी अनुभवलेलं विश्व आयुष्यभर आपल्या कलाकृतींतून आविष्कृत करीत असतो. खरे तर कलाकाराला नकळत त्या विश्वाचे प्रतिबिंब त्याच्या कलाकृतीत डोकावताना दिसते. पीएच. डी.च्या प्रबंधाचा विषय ठरविताना आणि अधाशी वाचन करताना द. ग. गोडसे यांच्या कलामीमांसेने माझे लक्ष वेधून घेतले. याचे कारण 'शक्तिसौष्ठव'मधील ग्रामदैवतांचे उपयोजन आणि 'लोकधाटी', 'मातावळ', 'उर्जायन', 'वाक्‌विचार' या ग्रंथातील लोकवाङ्मय, लोककला, लोकवास्तू, लोकशिल्प, लोकचित्र, लोकपरिमाणे यांचे उपयोजन, तसेच 'पोत'मधील चित्र शिल्पकलेचे आकर्षण आणि या सर्वांमागे प्रेरणा होती माझ्या बालपणातील भावविश्वाची.

प्रबंधाप्रमाणे हातून लिहून झालेले काही निंबध आणि 'अहिराणी लोकपरंपरे'तील लेखातही हीच प्रेरणा कार्यरत आहे. 'डंख व्यालेलं अवकाश' (मराठी कवितासंग्रह), 'आदिम तालनं संगीत' (अहिराणी कवितासंग्रह) आणि 'फूल आणि फुलपाखरू' (नाटक) यांच्यातही आदिवासी जीवन जाणिवांचे स्पष्ट प्रतिबिंब पडलेले आहे.

प्रबंध लेखनाप्रमाणेच काही शोधनिबंध राष्ट्रीय पातळीवरील परिसंवादात मांडण्याची संधी मला 'साहित्य अकादमी' आणि 'भाषा केंद्रा'ने दिली. त्यात 'घुमऱ्या : डोंगऱ्या देवाचे उपासक', 'डोंगऱ्या देव : रानखळी आणि धाणी', 'डोंगऱ्यादेव : साधक-बाधक विचार', 'आदिवासीपण जपायला हवे', 'तंट्या भिल : एक शोध', 'भिल : वृत्ती आणि काही समस्या', 'डंख व्यालेलं अवकाशचं निमित्त', 'अहिराणीचे भवितव्य' अशा अवकाश शोध निबंधातून लोकजीवन, लोकभाषा, लोकवाङ्मय व आदिवासी कला यांच्यावर झोत टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

**उद्या :**

आदिवासी मौखिक वाङ्मयातून आदिम मानवी वर्तन, मूल्य आणि संस्कृतीचे खोल व अनोखे दर्शन घडते. म्हणून मौखिक वाङ्मयाकडे व लोकसाहित्याकडे माझी नैसर्गिक ओढ असल्याचे मला जाणवते. तरीही मांझ्यात आदिवासी जीवन-जाणीव, अहिराणी जीवन-जाणीव व मराठी जीवन-जाणीव अशा तिन्हीही जीवन-जाणिवा घट्ट रुतलेल्या आहेत आणि तत्कालीन अनुभूतीनुसार त्या कार्यरत असतात. म्हणूनच माझ्यावर कोणताही एक शिक्का मारून घेण्यास मी अनुत्सुक आहे. सर्व प्रांतात विहार करत राहणे मला आवडते. आनंद देते. आदिवासी वाङ्मयातून मी अहिराणी लोकवाङ्मयात कशी उडी घेतो ते मलाही कळत नाही. आणि अहिराणी लोकसाहित्य वैश्विक अक्षर साहित्याचा भाग केव्हा बनून जाते, तेही समजत नाही.

लेख, कथा, कविता, नाटकातही असेच होत राहते. फक्त आपण लिहितो ते अस्सल











अनुभूतीतून यायला हवे. मग ती कथा असो, कविता असो, नाटक असो की लेख. वाङ्मयीन दर्जा आहे की नाही, यापेक्षा अस्सल अनुभूतीतून कलाकृतीचा पोत वास्तववादी आहे की नाही, यावर माझा कटाक्ष असतो. माझ्याकडून लिहून झालेल्या मजकूराला मी 'आविष्कार' म्हणतो. हा आविष्कार 'कलाविष्कार' आहे की नाही, हे काळ ठरवेल.

लिखाण करताना मी काही गोष्टींची काळजी घेत असतो. आविष्कार कोणती भाषा मागतो ? आविष्कारात विशिष्ट ठिकाणी अहिराणीतले विशिष्ट शब्द योजता येतात का ? नेमके व परिणामकारक शब्द, वाक्य वापरण्याचा प्रयत्न, घाट-रूप तपासून पाहणे आणि आविष्काराची मागणी काय ? हे झाले प्रयोगांविषयी. लिखाणातील वेगळेपणासाठी अनुकरण वगळायचे. केवळ शब्दांच्या आणि कल्पनांच्या आहारी जाणे टाळायचे. जगणंच शब्दांत ओतता आलं पाहिजे, हा अट्टहास असतो.

हे सर्व करताना आत्मसंतुष्टपणा येऊ न देण्याची काळजी घेत असतो. आविष्कारातून समाधानी होत नाही. अस्वस्थता वेढून राहते. आविष्कारात जीवन-जाणिवा येतात का नुसताच कल्पनाविलास आहे ? लिखाणात अनुभूती येतेय का ? का नुसताच वाचून झालेल्या ग्रंथाचा काही पगडा आहे ? अनुकरण आहे ? याची चिकित्सा मनात होत राहते. तटस्थ दृष्टीने वाचन करताना प्रतिबिंब दिसत असेल तर प्रकाशनाला देतो. नाहीतर नाही.

तरीही आत्मपरीक्षण करताना डोळ्यांसमोर अनेक त्रुटी आणि चुका दिसत राहतात. आजपर्यंत कोणताही आविष्कार लिहून झाल्यावर मला 'संतुष्टता' जाणवली नाही. लिहून मोकळा झालो अशी सुटकेची भावना होते. पण कलाकृतीच्या पूर्णतेबद्दल साशंक असल्यामुळे मी खूप अस्वस्थ राहतो. 'ज्युनिअर लेखक सिनिअर लेखक' ही कथा वेगळा प्रयोग म्हणून 'अभिरुची'ने छापली. तरी तसाच प्रयोग म्हणून पुढे तसे कथालेखन मी मुद्दाम टाळले. 'उंदरांचा संसार' नावाचे लिहिलेले नाटक तर मला सामान्य वाटत असल्यामुळे त्याचा उल्लेख करणेही मी टाळतो.

मराठी साहित्यात अत्युच्च शिखर गाठणे ही फार लांबची गोष्ट. पण काही साहित्यिकांच्या साहित्याच्या आसपासही आपण पोचू शकत नाहीत, याचे फार शल्य आहे.

कादंबरी क्षेत्रातील भालचंद्र नेमाडे. चिं. त्र्यं. खानोलकर, किरण नगरकर, कथा क्षेत्रातील जी. ए. कुलकर्णी, भारत सासणे, श्याम मनोहर, कविता क्षेत्रातील विलास सारंग, अरुण कोल्हटकर, दिलीप पु. चित्रे आणि नाटक क्षेत्रातील विजय तेंडुलकर, गिरीश कर्नाड, सतीश आळेकर हे लेखक मला थोर वाटत आलेत. यांच्या साहित्याने मी संमोहित होतो. मात्र अनुकरण कटाक्षाने टाळतो.

केव्हातरी उद्या लिखाणाला नीट सूर सापडेल आणि हातून काही बरे लिखाण होईल, अशा आशेने आज अभ्यास आणि परिश्रम सुरू आहेत. बघू या. ❑

डॉ. सुधीर रा. देवरे

टेलिफोन कॉलनी, बसस्थानकामागे, सटाणा ४२३ ३०१ (नाशिक).

दूरध्वनी : ०२४४४-२४३५७.

# काहीतरी सांगायचे असते म्हणून...

❑

**विश्वास वसेकर**

❑

प्रत्येक माणसाला कुठल्या ना कुठल्या स्वरूपात स्वत:ला व्यक्त करावे वाटत असते. गुरुवर्य वा. ल. कुलकर्णी म्हणायचे, ज्याला स्वत:ला व्यक्त करावे वाटते तीच 'व्यक्ती', बाकी सगळे 'इसम'! चित्रकार, गायक, शिल्पकार, विचारवंत यांची अभिव्यक्तीची माध्यमं भिन्न असतील परंतु 'मला काही सांगायचंय' ही प्रकर्षाची प्रेरणा त्यांच्या आविष्कारामागे असते. एक संवेदनाक्षम माणूस म्हणून मलाही सतत काही सांगायचं असतं. स्वत:ला व्यक्त करणे आणि त्यातून हजारो, लाखो लोकांशी संवाद साधणे ह्या दोन्ही गोष्टी लिहिण्यातून मी साधू शकतो, साधतो. त्यातूनच मी लेखक झालो. कवी झालो!

अर्थात कवी म्हणजे कुणी ईश्वराची लाडकी, दैवी वरदान लाभलेली, अलौकिक व्यक्ती असते असे मात्र नाही. तसेच कविता ही सुद्धा मंतरलेली, स्वर्गीय घटना नसते. हाडामांसाच्या माणसाची ती एक लौकिक कृती असते. मी कवी म्हणवणारा एक सामान्य माणूस आहे. अवतीभवतीच्या घटनांकडे उघड्या डोळ्यांनी पाहणारा. इतिहास आणि राजकीय परिस्थितीच्या संदर्भात माझ्या अवतीभवतीच्या सामान्य माणसाची वेदना, आवेग, दडपणे, अभाव या सर्वांचे ताणतणाव मी उत्कटपणे अनुभवत असतो आणि कवितेतून व्यक्त करतो. त्यामुळे माझ्या अनुभवाबरोबरच माझी जीवनदृष्टी, विचारसरणी, मूल्यकल्पना यांचेदेखील दर्शन माझ्या कवितेतून होणे स्वाभाविक आहे.

माणूस हा माझ्या मूल्यकल्पनांचा केंद्रबिंदू आहे. त्या माणसाला त्याची आत्मप्रतिष्ठा प्राप्त करून देणारे स्वातंत्र्य हे मी सर्वांत महत्त्वाचे मूल्य मानतो. लोकशाही ही जीवनप्रणाली, तर सामाजिक न्याय हे प्राणतत्त्व मानतो. शोषण, हुकूमशाही, अन्याय यांची मला विलक्षण घृणा आणि चीड आहे. माझ्यावर परिणाम करणाऱ्या सर्व घटनांना स्वीकारताना कविता हा माझ्या



प्रा. विश्वास वसेकर जन्म : २० ऑगस्ट १९५२. सेलू (जि. परभणी)

- येथील नूतन (कनिष्ठ) महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक
- मुख्यत: कवी असले तरी ललित गद्य, व्यक्तिचित्रे, कादंबरी, समीक्षा, अनुवाद या प्रकारातही लेखन केलेले आहे. आजवर १८ पुस्तके प्रकाशित झाली असून 'पैगाम' (काव्य) आणि 'बालसाहित्याचे अंतरंग' (समीक्षक) या पुस्तकांना पुरस्कार मिळालेले आहेत.

संवेदनशीलतेचा केवळ आविष्कारच नाही तर सामाजिक, राजकीय आणि वैयक्तिक पातळीवर मूल्यांसाठी कराव्या लागणाऱ्या संघर्षात, द्याव्या लागणाऱ्या लढाईत ते माझे भरवशाचे शस्त्र आहे. कवितेच्या मदतीनेच मी सगळ्या लढाया खेळत असतो, सारे आघात छातीवर झेलू शकतो. प्रश्नांचा वेध घेण्यात, त्यांची उत्तरे शोधण्यात मदत करणारी आणि जीवनाची सगळी आव्हाने स्वीकारण्याचे साहस देणारी ती माझी एक जीवनशक्ती आहे.

मी जीवनवादी, आशयवादी आहे. माझ्या दुर्दैवाने मराठी वाङ्मयीन संस्कृतीचे गाव कलाआकृतीवादी समीक्षेच्या धुक्यात गुरफटले असतानाच मी जन्मलो, शिकलो, वाढलो. तसा born कवी असल्याने आयुष्य आठवते तिथून कविता सोबत आहेच. बा. भ. बोरकर मला म्हणाले होते की तुझ्या कवितेचे आवाहन भावनेपेक्षा विचारांना अधिक आहे. कविवर्य अनिलांनी माझ्या कवितेतील 'प्रक्षोभरसा'चा शोध लावला होता. पण मराठी समीक्षेत त्याची कुठे तरतूद नव्हती. मराठी कवींपैकी नारायण सुर्वे मला माझे वाटले. कवितेच्या बालपणी त्यांचं बोट धरून मी थोडं चाललोही. नंतर ते सुटून मी मावशीच्या म्हणजे हिंदीच्या गावात ज़ास्त रमलो. माझे खरेखुरे वाङ्मयीन सहोदर मला तिथे भेटले. आजही हीच परिस्थिती आहे. त्यामुळे माझी अवस्था 'असुनि खास कवी मराठीचा, म्हणती विस्थापित त्याला' अशी झालेली आहे. तरीदेखील 'समानधर्मा' भेटण्याच्या बाबतीत मी भवभूतीइतकाच आशावादी मात्र आहे.

कवितेची मी माझ्यापुरती एक व्याख्या करीन. कविता ही मानवी जीवनाची आणि विश्वाची कवीने केलेली अत्यंत संश्लिष्ट अशी समीक्षा असते. कवी स्वत:ची स्वत:च्या स्वप्नांच्या संदर्भात समीक्षा करतो तेव्हा भावकविता होते, तो समाजाची मूल्यांच्या संदर्भात समीक्षा करतो तेव्हा विचारकविता होते. माझ्या दृष्टीने कवितेचे हे दोनच प्रकार. मानव्यावर आणि स्वत:वर अपार प्रेम करणाऱ्या भूमिकेतून हे दोन प्रकार जन्मतात. (या दोन्ही प्रकारची कविता मी लिहिली आहे.)

इलियट कवीने म्हटले आहे की माणूस जेव्हा समाजाशी संघर्ष करतो तेव्हा त्यातून वक्तृत्व निर्माण होते आणि तो जेव्हा स्वत:च्या मनाशी संघर्ष करतो तेव्हा कवितेची निर्मिती होते. धूमील कवीने तर असे म्हटले आहे की प्रत्येक चांगली कविता सगळ्यात आधी एक अर्थपूर्ण वक्तव्य असते. मला वक्तृत्व, कवित्व आणि समीक्षा या संकल्पना काव्यनिर्मितीच्या पातळीवर समानार्थीच वाटतात. किंबहुना कवीला या तिन्हींना आपल्या कवितेत एका पातळीवर आणता आले तरच ती परिपूर्ण कविता.

माझे एकूण चार कवितासंग्रह. तीस वर्षांतील कवितांची संख्या सुमारे एकशे नव्वद. म्हणजे माझे कविता लिहिण्याचे प्रमाण वर्षाला सहा कविता असल्याने मीही अनिलांच्या ऐटीत विचारू शकतो, मी थोड्याच कविता लिहिल्या म्हणून काय झाले?

'कोरस' या पहिल्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनसमारंभात प्रा. रंगनाथ तिवारींनी प्रश्न उपस्थित केला 'को रस:?' आणि उत्तर दिले 'प्रेमरस:.' माझ्या चारही संग्रहातून प्रेमकवितेची एक धारा वाहत आलेली आहे. मी मराठीतील अत्यंत वेगळी, वैशिष्ट्यपूर्ण अशी प्रेमकविता लिहिली आहे. 'मर्लिन', 'जालीम', 'तहान', 'निवड', 'माझे मृत्युपत्र' या प्रेमकविता मला महत्त्वाच्या

वाटतात. उत्कट प्रेमाची एक तहान, त्या प्रवासातून घेतलेला स्वत:चा एक शोध, प्रेमानुभवाचा शरीर मनावरील एक तीव्र परिणाम, प्रेमात अभिप्रेत असलेला 'रक्ताचा सुवास' आणि प्रेमामुळे लाभणारा वेगवेगळ्या पातळ्यांवरचा मरणार्थ ही माझ्या प्रेमविषयक जाणीवेची वैशिष्ट्ये आहेत. शरीर न नाकारणारी तरीही आत्म्याची तहान बनलेली एक अत्यंत पृथगात्म प्रेमजाणीव माझ्या कवितेतून प्रकटताना दिसते.

माझ्या कवितेचे वेगळेपण नोंदवताना माझ्या विचारकवितांचा आता विचार करू. जातिविषयक जाणीव ही माझ्या कवितेतून प्रारंभापासून विचारानुभवाचा एक घटक होऊन प्रकटत असल्याचे दिसते. स्वजातीची आणि एकूण जातिव्यवस्थेची इतकी परखड समीक्षा मला अन्य कोणाच्या कवितेत आढळली नाही.

सर्व प्रकारच्या, लहानमोठ्या सत्तेची ॲलर्जी हे माझ्या विचारकवितेचं एक सूत्र राहात आलेलं आहे. किंबहुना सत्तेची घृणा ही या कवितांतून प्रकटत राहिलेली आहे.

माणसाला भ्रष्ट करणारी, चांगुलपणावर मात करणारी, विकासकामांचा कर्करोग झालेली सत्ता आणि तिचे सत्ताधीश असणारे आमदार-मंत्री-नगराध्यक्ष-वरिष्ठ अधिकारी यांपासून लेखक-कलावंतांनी कायम फटकून राहिले पाहिजे, सत्तेचा आपला संघर्ष सनातन आहे हा कवी फैजने माझ्यावर केलेला संस्कार आहे -

या सर्व भूमिकेतील 'मी' हा सामान्य माणसाचा प्रतिनिधी आहे.

अशा रीतीने हा 'मी' क्रांतीचा पुरस्कार करणारा, परिवर्तनाची स्वप्नं पाहणारा, आहे त्याहून हे जग सुंदर झालं पाहिजे असे वाटणारा, त्याच्या आड येणाऱ्या सत्ता, संपत्ती, भ्रष्टाचार, विषमता, जातीयवाद यांचा प्रखर विरोध करणारा 'कवी' आहे.

मी केलेल्या प्रयोगाबद्दल काय लिहावे. आपले वेगळेपण जपणे हा काय कमी महत्त्वाकांक्षी प्रयोग नाही. गझल लिहिण्यासारखे काही प्रयोग फसले कारण मला तंत्रावर, छंदशास्त्रावर प्रभुत्व मिळवता आलं नसेल.

मराठीत पोट्रेट कविता हा प्रकार मी प्रथमत: लिहिला हा एक प्रयोग म्हणता येईल. ललित गद्यात मी विपुल व्यक्तिचित्रं लिहिली होती. पण कवितेत हे एकाएकी आतून करावसं वाटलं खरं. पोर्ट्रेट ही चित्रकलेतील संकल्पना. काही चेहरे चित्रकाराला आव्हान देत असतात तशी काही व्यक्तिमत्त्वं मला कविता लिहायला भाग पाडत होती. या व्यक्तिमत्त्वांमध्ये मला अस्वस्थ करून टाकणारं असं काही होतं. त्यांच्या व्यक्तित्वाचा अर्क आणि माझा संवेदनस्वभाव यांच्या अद्‌भुत रसायनातून ही पोर्ट्रेटस् जन्मली.

कवितेखालोखाल माझ्यातल्या कलावंताला आवडणारा प्रकार ललितगद्य हा आहे. इतर कथनपर वाङ्मयप्रकारापेक्षा कवितेला अतिशय जवळ असणारा. गद्याचं पौरुष आणि कवितेचं लालित्य एकवटणारा. मला त्यातही कवींनी लिहिलेले ललितगद्य विशेष आवडते.

पहिल्या कवितासंग्रहानंतर माझं दुसरंच पुस्तक ('रेघोट्या'-१९८४) ललितगद्याचं होतं. ललितगद्याच्या इतर पोटप्रकारांपेक्षा वेगळं काही करण्याचा प्रयत्न त्यात होता. काहीसं विमुक्त

स्वरूपाचं हे ललितगद्यच होतं.

माझ्या ललितगद्याच्या 'रेघोट्या' आणि 'जग सुंदर करण्याचा ध्यास' या दोन्ही पुस्तकात व्यक्तिचित्रसदृश्य काही लेखन आहे. 'सुहृदगान' हे माझे व्यक्तिचित्रांचे पुस्तक.

बांडगुळे हे माझे सर्वांत लाडके पुस्तक. विडंबनकविता ही दर वीस पंचवीस वर्षांनी लिहिली जाणे ही निकोप वाङ्मयीन संस्कृतीची गरज असते. मी माझ्या काळातली विडंबन कविता अत्यंत आवडीने लिहिली. 'झेंडूच्या फुलांचा समकालीन बहर' अशी त्याची जाहिरात केली होती. प्रस्तावना, ब्लर्ब, अर्पणपत्रिका, तळटीपा, कविपरिचय अशी नखशिखांत विडंबनं त्यात होती. खूप शत्रू जोडणे हे त्याचे एक उत्तम फलित होते.

झेंडूच्या फुलांशी तुलना होणारच. मी एकच सांगतो, आचार्य अत्र्यांना नवकविता कळत नव्हती म्हणून झेंडूची फुले रविकिरणांपुरतीच मर्यादित झालीत. मी नवकवितेचा कट्टर समर्थक असूनही नवीन कवितांची विडंबने केलीत हें विशेष! खूप बारीक बारीक विनोदी कामं केलीयत एका पुस्तकात.

माझी जवळपास वीस पुस्तक आहेत. प्रत्येकाविषयी मी लिहिलंच पाहिजे असं नाही. आपल्याला जे करायचं होतं, साधायचं होतं ते नीटपणे पोचलंय की नाही या काळजीतून हे आत्मपरीक्षण. चांगला भविष्यकाळ यावा म्हणजे वाईट भूतकाळ विसरता येईल. अशी इच्छा आणि तयारी निदान माझी तरी आहे. निर्मितीची धुंदी मी अनुभवलीय. कुसुमाग्रजांनी फार छान म्हटलंय की विजयासाठी माझी कविता कधीच नव्हती म्हणून तिला पराजयाची भीती नाही. जन्मासाठी कधी ती अडून बसली नव्हती म्हणून तिला मरणाचे भय नाही. मी सुद्धा एके ठिकाणी म्हटलंय की -

*सावलीचे धरावे लागत नाही बोट*
*तशी कविता चालत राहिली सोबत*

❑

विश्वास वसेकर
अंबिका, क्रांती चौक, परभणी ४३१ ४०१.

---

**विशेष सूचना**

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार दि. २९ सप्टेंबर रोजी आयोजित करण्यात येत आहे. वार्षिक कार्यवृत्त आणि ताळेबंद उत्पन्न खर्चपत्रक आणि अंदाजपत्रकासाठी सभेपूर्वी १५ दिवस आधी मुख्य कार्यालयाशी संपर्क साधावा.

— **रवीन्द्र भट**, प्रमुख कार्यवाह.

# गझल ते तीर्थंकर गाणी

❑

प्रदीप निफाडकर

❑

**श**ब्दाच्या जंगलात फिरताना एखाद्या सुंदर फुलाच्या सुगंधाने, अजगर ओढतो तसे आपल्याला खेचावे आणि आपणही 'अरेच्या, गुलाब राजा असेल पण या फुलाचा सुगंधही आपल्याला कैद करणारा आहे' असे म्हणत काही काळ त्या फुलाच्या सोबतीने घालवावा, त्याला प्रयोग म्हणायचे तर खुशाल म्हणावे. पण मी गझल लिहिता लिहिता अशा कैक फुलांच्या कैदेत सापडलो. आणि 'नाही काष्ठाचा गुमान, गोवी भ्रमरा सुमन' म्हणत अडकलो.

मी १९७९ पासून गझला लिहितोय. विस्तारभयास्तव येथे फक्त मी केलेले प्रयोग (?) सांगतो. मराठी गझल प्रकारात मी सर्व संत आणले. असे उदाहरण उर्दूत नाही. त्या गझलेचे तीनच शेर पहा -

*पालखी आणू नका दारात माझ्या*
*संत सारे नांदती देहात माझ्या*
*पेटला पंजाब अन् धावून आली*
*नानकाची आसवे डोळ्यांत माझ्या*
*ही जनाबाई दळे आयुष्य माझे*
*मीच वर्षे टाकतो जात्यात माझ्या*

असो. गझलेत एखादा शेर प्रेमावर तर दुसरा सद्यस्थितीवर शकतो. मग मुलांवर का नाही ? बालवाङ्मय हाताळणे अवघड असते. मलाही ते जमलेले नाही. पण गझल मुलांसाठी लिहिण्याचा प्रयोग केला :

*मी गोष्ट सांगतो ही आहे खरीखुरी*
*स्वप्नात काल माझ्या आली खरी परी*



प्रदीप निफाडकर
जन्म : २ जुलै १९६२. शिक्षण : एम. ए. (मराठी)
व्यवसाय : पत्रकार
सध्या नाशिक येथे 'देशदूत' चे कार्यकारी संपादक.
मराठी गझलकार म्हणून ख्याती. 'स्वप्नमेणा' (काव्यसंग्रह) आणि 'वेगळे वाटसरू' (व्यक्तिचित्रणे) ही पुस्तके प्रसिद्ध. काही पुरस्कार मिळालेले. त्यात 'उर्दूमित्र पुरस्कार' महत्त्वाचा.

*आकाश देत असते तेव्हा मला मुका*
*जेव्हा हसून घेते आई कडेवरी*

गझलमध्ये वेगवेगळे रदीफ-काफिया (यमक-अंत्ययमक) आणणे, वेगवेगळी वृत्ते हाताळणे हे केलेच. पण आणखी एक गोष्टी मी केली. ती म्हणजे स्वत:चे नाव रदीफ म्हणून वापरून गझल लिहिली -

*तुला न होणार कधी जगाची उकल प्रदीप*
*तू तुझ्या वागण्यात कर थोडा बदल प्रदीप*
*संपल्यावर कविसंमेलन जो तो म्हणाला —*
*"अरे, ही तर माझीच वाटते गझल प्रदीप."*

सर्वांत मोठा रदीफ घेऊनही गझल लिहिली आणि सर्वात कमी काफिया, वृत्त, रदीफमध्येही लिहिली. मराठीतील सर्वांत लहान वृत्त (केवळ १० मात्रांचे) घेऊनही लिहिली -

*दिवे टाळतो मी*
*मला जाळतो मी*
*जरा हासता तू*
*किती भाळतो मी ?*
*नसे जिंदगी ही*
*हवा पाळतो मी !*

कल्पनेबाबत तर सतत संघर्ष असतो. आपली प्रत्येक ओळ निर्दोष, आशयघन आणि दाद घेणारीच पाहिजे हा अट्टाहास असतो. अनेकदा हरतो पण कधीकधी जिंकतोही. त्याची दोनच उदाहरणे देतो. कल्पना किती वेगळ्या आहेत पहा —

*रात्र होताच या तारका मोजती*
*जागणारे किती ? झोपणारे किती ?*

आतापर्यंत गझलेत तारे मोजण्याच्या कल्पना सर्वत्र आल्या. पण तारे काही मोजतात ही वेगळी कल्पना आहे. अशीच आणखी एक —

*जीवनाशी मी कुठे तडजोड केली*
*चित्रगुप्तानेच खाडाखोड केली.*

किंवा

*कसे काय सांगू किती देखणी मी*
*कधी गीत असते कधी लावणी मी*
*मला मोह झाला मला पाहण्याचा*
*न ही बंद केली तुझी पापणी मी*

स्त्री स्वत:च्या सौंदर्याबद्दल बोलू शकत नाही. तिला स्वत:ला निवांत पाहण्याचा मोहही होतो, हे सारे मी मांडू शकलो. आता आजचे सर्वश्रेष्ठ शायर — निदा फाजली — यांनी माझी एक गझल उर्दूत भाषांतरित केली आहे. गझलेच्या एका वळणापर्यंत येऊन पोहोचलो

आहे. अजून खूप चालायचंय.

गझल सोडून मी जे काही लिखाण केले, त्यात सकाळ वृत्तपत्रातली १३ वर्षे व दैनिक देशदूतचा गेलेल्या वर्षभराचा संपादक नात्याचा भाग आहे. कवितेचा पत्रकारितेला फायदा असा होतो की, दसऱ्याच्या दिवशी 'ते चिंध्या पांघरून सोने विकायला बसले' अशी आपट्याची पाने विकणाऱ्यावर बातमी लिहू शकतो किंवा दिवाळीची बातमी लिहिता लिहिता 'सगळं शहर कसं सुखाचा सदरा घालून हिंडतंय्' असे लिहिले जाते. पण हे क्वचित. एक मालिका अशी केली होती की, कोण्याही अभिनेत्या किंवा नेत्याबरोबर दिवस न घालविता चक्क मजूर, गाढव पाळणारे, रिक्षावाले यांच्यासमवेत दिवस घालवायचे. ती छान झाली. मग कचराकुंडीत सापडणारी पोरं अनाथालयात वाढून संसारापर्यंत कधी पोचतात त्यावर 'आभाळ पेलणारं आयुष्य' ही मालिका लिहिली. पुढे एक मालिका लिहिताना व्यक्तिचित्रण हा प्रकार हाताळला. ती म्हणजे 'वेगळे वाटसरू'. नाशिकमधील अशी ५० माणसे हुडकून काढली की, ज्यांनी आपल्या वेगळ्या वाटेने आयुष्याचे सोने केले, पण त्यांनी कधीही प्रकाशाचा शिंतोडा, अंगावर पडू दिला नाही. गझलांचे जसे 'स्वप्नमेणा' पुस्तक प्रसिद्ध झाले तसे 'वेगळे वाटसरू' ही प्रसिद्ध झाले आहे.

आता अगदी अलीकडचा प्रयोग म्हणजे तीर्थंकरांची गाणी. जैन धर्मातले आदिनाथ ते महावीर हे २४ तीर्थंकर अभ्यासून त्यांच्यावर गाणी लिहिली. ती सुरेश वाडकर यांनी गायली. त्याचे जे पुस्तक निघेल, त्यासाठी सुप्रसिद्ध साहित्यिक व जैन वाङ्मयाचे अभ्यासक निर्मलकुमार फडकुले यांनी प्रस्तावना लिहिली आहे. जैन तीर्थंकर अहिंसावादी असले तरी या गीतांमध्ये सर्व रसाबरोबर एकदा वीररसही आला आहे. नांदी, भारुड प्रकारही मी त्यात हाताळले आणि मराठी मातीशी जैन नागरिकांचे किती नाते घट्ट आहे, तेही दाखविले आहे. ही गीते लिहिताना जैनांमधील श्वेतांबर-दिगंबर भेद टाळले. अशी गीते लिहिताना एक धोका असतो, तो म्हणजे सर्वच गाणी आरती होतील याचा. तो धोका टाळला. आज धर्माधर्मांत तेढ व दरी वाढत असताना माझ्यासारख्या अजैनाकडून झालेले हे एक चांगले काम आहे, असे मला वाटते.

मी फक्त मला आकर्षित करणाऱ्या फुलांबद्दल लिहिले आहे. सगळ्याच फुलांपर्यंत जाता येत नाही, हे दुःख आहे. पण सगळं रान आपलं करायचा प्रयत्न आहे. ❑

प्रदीप निफाडकर, 'स्वप्नमेणा',
एन ४२, सी जी २/२/४, सरस्वती चौक, सिडको चौथी योजना, नाशिक - ९.
दूरध्वनी : ३९०४३०.

---

**एक उल्लेखनीय वार्ता**

मराठी साहित्य, भाषा आणि संस्कृती यांच्याविषयी आस्था असणारे ज्येष्ठ बांधकाम व्यावसायिक श्री. व्ही. एस. ऊर्फ मधुकरराव जोशी यांनी आपल्या म. सा. प. ला अत्याधुनिक संगणक भेट दिला आहे. संस्थेच्या आधुनिकीकरणाचा हा शुभारंभ आहे. आपणा सर्वांतर्फे त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार !

---

## कार्यवृत्त : संकलन-श्री. रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह
(१ जानेवारी २००२ ते ३१ मार्च २००२)

**११ जानेवारी २००२ : वि. स. खांडेकर जन्मदिन :** यंदाचा कै. वि. स. खांडेकर जन्मदिवस एक अभिनव कार्यक्रम आयोजित करून साजरा करण्यात आला. 'कै. खांडेकरांचे जीवन व त्यांचे साहित्य' यांचे वेबसाईटवर सचित्र दर्शन, खांडेकरांचे नातू श्री. पराग खरे व श्री. सचिन पाटील यांनी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात प्रोजेक्टरद्वारे अतिशय बहारदारपणे घडविले. या प्रसंगी खांडेकरांचे नातू श्री. पराग खरे यांनी वेवसाईटवरून दिसणाऱ्या प्रत्येक चित्राची समर्पक माहिती नेमक्या शब्दांत उपस्थितांना कथन केली. ज्येष्ठ साहित्यिक डॉ. आनंद यादव यांनी कै. खांडेकरांच्या साहित्याविषयी प्रमुख पाहुणे या नात्याने भाषण केले. कै. खांडेकरांच्या कुटुंबियांपैकी त्यांच्या कन्या श्रीमती कल्पलता खरे यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत केले. दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभारप्रदर्शन केले.

**२५ फेब्रुवारी २००२ : कै. वि. द. घाटे जन्मदिन :** यंदाच्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या तारखा १८, १९, २० जानेवारी २००२ याच आल्याने दि. १८ जानेवारी २००२ रोजी दरवर्षी साजरा केला जाणारा कै. वि. द. घाटे स्मृतिदिन २५ फेब्रुवारी रोजी परिषदेत साजरा करण्यात आला. 'वि. द. घाटे - लेखक आणि माणूस' या विषयावर डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचे व्याख्यान झाले. स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**२० मार्च २००२ : कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन :** कै. बा. सी मर्ढेकरांचा ४६ वा स्मृतिदिन निमंत्रित कवींचे कविसंमेलन आयोजित करून साजरा करण्यात आला. 'महाराष्ट्र साहित्य परिषद' आणि 'रंगतसंगत प्रतिष्ठान' यांच्या संयुक्त विद्यमाने रंगलेल्या या कविसंमेलनाचे प्रास्तविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. स्वागत 'रंगतसंगत प्रतिष्ठान'चे अध्यक्ष श्री. प्रमोद आडकर यांनी केले. तसेच परिषदेचे परीक्षाविभाग कार्यवाह व प्रसिद्ध कवी डॉ. कल्याण इनामदार यांनी मर्ढेकरांच्या निवडक कवितांचे वाचन केले. कवयित्री डॉ. अरुणा ढेरे यांनी कविसंमेलनाचे अध्यक्षपद भूषविले होते. परिषदेचे पुणे जिल्हा प्रतिनिधी अरविंद भुजबळ यांनी बहारदार सूत्रसंचालन केलेल्या या कविसंमेलनात दुर्गेश सोनार, डॉ. संगीता बर्वे, ज्योत्स्ना चांदगुडे, मन्मथ बेलूरे, स्वाती सामक, संगीता जोशी, दीपक करंदीकर, आसावरी काकडे, विमल लिमये, डॉ. शंतनू चिंधडे या कवी-कवयित्रींनी आपल्या काव्यरचना सादर केल्या. काव्यरसिकांनी तुडुंब उपस्थितीने कविसंमेलनास प्रतिसाद दिला. परिषदेच्या कार्यवाह श्रीमती नंदा सुर्वे यांनी आभार मानले. (रविवार दि. ३१ मार्च रोजी या कविसंमेलनातील काही अंश आकाशवाणीच्या पुणे केंद्रावरून सकाळी ७.१० ते ७.४५ या वेळात 'रंगतसंगत' कार्यक्रमातून प्रसारित करण्यात आला.)

**दि. ३१ मार्च २००२ : कै. अरविंद भुजबळ यांना श्रद्धांजली :** दि. २४ मार्च २००२ रोजी रात्री उशीरा महाराष्ट्र साहित्य

परिषदेचे कार्यवाह व पुणे जिल्हा प्रतिनिधी कवी अरविंद भुजबळ यांचे अपघाती निधन झाले. त्यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी परिषदेतर्फे मा. श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली पटवर्धन सभागृहात ३१ मार्च रोजी शोकसभा आयोजित करण्यात आली. प्रेरणा साहित्य कला प्रतिष्ठानचे कार्यवाह श्रीकांत चौगुले, परिषदेचे धुळे जिल्हा प्रतिनिधी डॉ. भगवान ठाकूर, मसापच्याच हडपसर उपशाखेचे कार्याध्यक्ष श्री. जि. जा. पवार, रंगतसंगत प्रतिष्ठानचे अध्यक्ष श्री. प्रमोद आडकर, श्री. वासुदेव फाटक, 'साहित्य संवाद, पुणे'चे श्री. मनोहर सोनवणे, शब्दवैभवचे डॉ. शंतनू चिंधडे, दलित साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. बाळ आल्हार, सौ. मंदा नाईक, सौ. मीनल बाठे, श्री. उद्धव कानडे, सौ. प्रभा सोनवणे, म. सा. पत्रिकेचे संपादक डॉ. अ. वा. कुळकर्णी आणि कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. तसेच श्री. उमाकांत भेसके यांनी कै. भुजबळांबद्दलच्या आपल्या भावना काव्यातून प्रकट केल्या. अध्यक्षीय समारोप मा. श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी केला. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सर्व पदाधिकारी या शाकेसभेस उपस्थित होते. शिवाय पिंपरी-चिंचवडचे माजी महापौर श्री. संजोग वाघिरे, ज्येष्ठ कवी श्री. रामदास फुटाणे इत्यादी मान्यवर उपस्थित होते. परिषदेचे स्थानिक कार्यवाह श्री. दीपक करंदीकर यांनी शोकप्रस्तावाचे वाचन केल्यावर कै. भुजबळ यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**दीपक करंदीकर,**
स्थानिक कार्यवाह, म.सा.प., पुणे.

## पारितोषिके

**दि. १० फेब्रुवारी २००२**
**श्रीमती पुष्पलता रानडे पुरस्कृत कै. लक्ष्मीबाई टिळक पुरस्कार**

यावर्षीपासून 'आत्मचरित्र' या वाङ्मय-प्रकाराला हा पुरस्कार देण्यास आरंभ झाला. हा पहिला रु. २०००/- चा पुरस्कार श्रीमती सरस्वतीबाई अकलूजकर (सहलेखिका डॉ. सरोजिनी वैद्य) यांना त्यांच्या 'आठवणी : काळाच्या, माणसांच्या' या आत्मचरित्र लेखनाबद्दल प्रदान करण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्रीमती शांताबाई किर्लोस्कर होत्या. डॉ. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. श्रीमती पुष्पलता रानडे यांनी मनोगत व्यक्त केले. सहलेखिका म्हणून डॉ. सरोजिनी वैद्य यांनी पुरस्कार स्वीकारला व मनोगत व्यक्त केले. परीक्षक म्हणून डॉ. मंदा खांडगे यांचे भाषण झाले. आशा कर्दळे या सहपरीक्षक होत्या. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले.

**दि. २१ फेब्रुवारी २००२ :**
**प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पारितोषिक :**

म. सा. परिषदेतर्फे प्रतिवर्षी (२१ फेब्रुवारी रोजी) प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पारितोषिक देण्यात येते. (लेखकास रु. ३५०० व प्रकाशकास रु. ७५०) या वर्षी या पारितोषिकासाठी डॉ. सुधा जोशी यांच्या 'कथा : संकल्पना आणि समीक्षा' या पुस्तकाची निवड करून पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. नागनाथ कोत्तापल्ले होते. परीक्षकांच्या वतीने डॉ. अंजली सोमण यांचे भाषण झाले. डॉ. आनंद यादव व डॉ. गं. ना. जोगळेकर हे सहपरीक्षक होते. शेवटी डॉ. मृणालिनी



अनुक्रमणिका







शहा यांनी आभार मानले.

**दि. २६ फेब्रुवारी २००२ : कै. चिं. वि. जोशी स्मृतिदिन व पारितोषिक वितरण :**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत विनोदी पुस्तकाच्या लेखकास रु. १५००/- चे व प्रकाशकास रु. १०००/- चे पारितोषिक दिले जाते. या वर्षी डॉ. महेश केळुसकर लिखित 'साष्-टांग नमस्कार' या पुस्तकाला व प्रकाशक म्हणून डिंपल प्रकाशन, डोंबिवली, यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. मुकुंद टाकसाळे होते. परीक्षक म्हणून संतोष शेणई यांचं भाषण झालं. माधुरी वैद्य या सहपरीक्षक होत्या. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रस्ताविक केलं. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. २७ फेब्रुवारी २००२ : कविवर्य कुसुमाग्रज जन्मदिन व पुरस्कार वितरण :**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत उत्कृष्ट कवितासंग्रहाच्या कवीस रु. १५००/- व प्रकाशकास रु. १०००/- चे पारितोषिक दिले जाते. या वर्षी 'बरेच काही उगवून आलेले' या कवितासंग्रहासाठी कवी द. भा. धामणकर यांना व प्रकाशक म्हणून मौज प्रकाशन, मुंबई यांना हे पारितोषिक प्रदान करण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. अरुणा ढेरे होत्या. परीक्षक म्हणून डॉ. नीलिमा गुंडी यांचं भाषण झालं. प्रा. सुजाता शेणई या सहसमीक्षक होत्या. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केलं. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचलन केलं व आभार मानले.

**८ मार्च २००२ : श्रीमती ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत शरदबाबू पुरस्कार :**

हा रु. ५०००/- चा पुरस्कार या वर्षी ज्येष्ठ लेखिका वसुंधरा पटवर्धन यांना देण्यात आला. समारंभाच्या अध्यक्षस्थानी लीलाताई भागवत होत्या. ज्योत्स्ना देवधर यांनी मनोगत व्यक्त केले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**९ मार्च २००२ : महाराष्ट्र कवी यशवंत पुरस्कार :**

हा पुरस्कार या वर्षी कवी श्रीकृष्ण राऊत (अकोला) यांना त्यांच्या 'एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर जन्म घेणाऱ्या तान्ह्या मुला' या कवितासंग्रहाबद्दल देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कवी हेमंत जोगळेकर होते. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. किशोर पेंढारकर (कवी यशवंतांचे पुत्र) यांनी कवी यशवंतांची कविता सादर केली.

**नंदा सुर्वे,** कार्यवाह

**५ सप्टेंबर २००१ : प्रा. श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी व्याख्यान :**

म. सा. परिषद, श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी समिती आणि श्री. के. क्षी. कुटुंबीय यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. ग. प्र. प्रधान यांचे 'श्री. के. क्षी. यांचा टीकाविवेक' या विषयावर भाषण झाले. प्रा. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी आभार मानले.

**९ सप्टेंबर २००१ : 'मराठी भाषा : वाढ आणि बिघाड' या पुस्तकावर चर्चासत्र :**

म. सा. परिषद, श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी समिती आणि मराठी अभ्यास परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने चर्चासत्रांचा कार्यक्रम झाला. प्रा. डॉ. कल्याण काळे यांनी

आपल्या टिपणाचे वाचन केल्यावर प्रा. डॉ. अंजली सोमण, प्रा. डॉ. विद्यागौरी टिळक, प्रा. ल. ना. गोखले, प्रा. डॉ. अशोक केळकर, प्रा. प्र. ना. परांजपे, श्रीमती सत्त्वशीला सामंत इत्यादींनी त्यावरील चर्चेत भाग घेतला. चर्चासत्राचे अध्यक्ष प्रा. डॉ. द. ना. धनागरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यक्रमाच्या आरंभी प्रा. डॉ. नीलिमा गुंडी यांनी उपस्थितांचे मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने स्वागत केले. म. सा. प.च्या वतीने प्रा. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

**५ ऑक्टोबर २००१ : 'उमर खय्यामची फिर्याद'मधील श्री. के. क्षी. यांची समीक्षा'** : प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचे 'उमर खय्यामची फिर्याद'मधील श्री. के. क्षी. यांची समीक्षा' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले व श्री. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**६ नोव्हेंबर २००२ : श्री. के. क्षी. यांची 'सूफी लीव्हज्'** : प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या 'सूफी लीव्हज्' या अप्रकाशित इंग्रजी मुक्त काव्यातील काही पर्णांचे मराठी भाषांतर व त्यावरील मराठी-उर्दू शेरोशायरीतील उदाहरणे देऊन श्री. अशोक जावडेकर यांनी आपले विवेचन केले. आरंभी श्री. शंकर सारडा यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी आभार मानले. या कार्यक्रमास श्री. के. क्षी. जन्मशताब्दी समिती अध्यक्ष प्रा. डॉ. द. ना. धनागरे आणि उपाध्यक्ष प्रा. डॉ. प्र. ल. गावडे आवर्जून उपस्थित होते.

**श्रीमती शकुंतला क्षीरसागर**

❑

## सोलापूर शाखा

**काव्यसंग्रह प्रकाशन :** सोलापूरच्या प्रख्यात कवयित्री सौ. विजया जहागीरदारलिखित 'रानवा' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन दि. १३ मार्च २००२ रोजी झाले. या कार्यक्रमास प्रमुख पाहुणे म्हणून महाराष्ट्रातले प्रख्यात निसर्ग कवी ना. धों. महानोर हे उपस्थित होते. या समारंभाच्या अध्यक्षस्थानी डॉ. निर्मलकुमार फडकुले हे होते. या प्रसंगी श्री. विवेक घळसासी, संजय आवटे, उत्तम कोळगावकर, दत्ता हलसगीकर आदी मान्यवरांची भाषणे झाली.

**ना. धों. महानोर यांचे काव्यवाचन :**

कविश्री ना. धों. महानोर यांच्या काव्यवाचनाचा कार्यक्रम दि. १४ मार्च २००२ रोजी संपन्न झाला. श्री. महानोर यांनी आपला काव्यप्रवास रसिल्या शैलीत कथन केला. त्यांच्या विविध कवितांचा उद्बोधक असा लेखनप्रसंग श्रोत्यांच्या समोर त्यांनी सजीव चितारला. साक्षात् कवीच्या तोंडून रसाळ कविता ऐकण्याचे भाग्य सोलापूर रसिकांना या कार्यक्रमामुळे लाभले. रसिक श्रोत्यांची या प्रसंगी झुंबड उडाली होती.

**साहित्यिकांचा मेळावा :**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्या सूचनेनुसार सोलापूर साहित्य परिषदेने हा कार्यक्रम दि. १९ मार्च २००२ रोजी येथील 'सुशील रसिक सभा' येथे संपन्न झाला. या एका कार्यक्रमात ३ कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते.

१) साहित्य परिषदेच्या वतीने साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष प्रा. रा. रं. बोराडे, सदस्य डॉ. निर्मलकुमार फडकुले, सदस्य लक्ष्मण गायकवाड, श्री. आदलिंगे आदींचा

सत्कार करण्यात आला.

२) राजा मंगळवेढेकर लिखित 'सानेगुरुजी' या पुस्तकाचे प्रकाशन डॉ. निर्मलकुमार फडकुले आणि डॉ. र. पु. कुलकर्णी लिखित 'प्रासाद मंडन' या पुस्तकाचे प्रकाशन डॉ. द. ता. भोसले यांच्या हस्ते झाले. यावेळी डॉ. फडकुले, डॉ. भोसले यांची समयोचित भाषणे झाली.

**३) साहित्यिकांचा मेळावा :**

सोलापुरातील ज्येष्ठ आणि नवोदित साहित्यिकांचा मेळावा भरला गेला. यात साहित्य प्रकाशनासंबंधी चर्चा झाली. साहित्यिकांनी विचारलेल्या प्रश्नांना प्रा. रा. रं. बोराडे यांनी उत्तरे दिली. या मेळाव्यास सुमारे १५० साहित्यिक उपस्थित होते.

**लक्ष्मीनारायण बोल्ली**

कार्याध्यक्ष, म. सा. प. शाखा, सोलापूर.

**भिवंडी शाखा**

भिवंडी तालुक्यातील नवोदित कवींच्या प्रतिभेस वाव देण्यासाठी प्रथमच म. सा. प.च्या शाखेतर्फे 'काव्यवाचन स्पर्धा' आयोजित करण्यात आली होती. १६ नवोदित कवींनी यात भाग घेतला होता. सर्व कवितांचे विषय, आशय यात विविधता होती. काही उपहासात्मक कवितांनी फारच मनोरंजन केले. शिवाय विचारही करायला उद्युक्त केले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. सुनील पाटील यांनी आपल्या मार्मिक आणि उत्स्फूर्त अशा काव्यांतून करून रसिकांची मने जिंकली. बक्षीसपात्र विजेत्यांचे ६ मे च्या पहिल्या वर्धापनदिनी पारितोषिके देऊन सत्कार होणार आहे. रसिकांची उपस्थिती लक्षणीय होती.

दि. २० एप्रिल २००२ रोजी 'एकपात्री अभिनय स्पर्धा' भिवंडी शाखेतर्फे घेण्यात आली. १० स्पर्धकांनी यात भाग घेतला होता. स्पर्धकांनी निवडलेल्या नाटकांमध्ये विविधता होती. नाट्यच्छटा स्वलिखित नाट्यप्रयोग सादर केले गेले. या कार्यक्रमासही प्रेक्षकांची लक्षणीय उपस्थिती होती. या स्पर्धेतील विजेत्यांना दि. ६ 'मे च्या वर्धापनदिनी प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात येतील.

**सौ. निर्मला लाहोटी**

कार्यवाह, भिवंडी शाखा.

**इस्लामपूर शाखा**

६ जानेवारी २००२ (रविवार) :

लोकनेते राजारामबापू पाटील यांच्या स्मृतीप्रित्यर्थ आणि महिला सबलीकरण वर्षाचे निमित्त साधून दहावे मराठी साहित्य संमेलन घेतले. ज्यामध्ये फक्त महिलांनीच सर्व संमेलनाचे संयोजन केले, सहभाग साधला.

रविवार दि. ६ जानेवारी २००२ सकाळी १०.०० ते १.००: उद्घाटन, सत्कार, पुस्तक प्रकाशन व अध्यक्षीय भाषण

उद्घाटक : सौ. शैलजादेवी जयंतराव पाटील

स्वागताध्यक्ष : प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे

संमेलनाध्यक्ष : श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक

दुपारी २ ते ३.३० परिसंवाद

विषय : स्त्रीलेखिकांनी मराठी साहित्याला दिलेले योगदान. सहभाग : डॉ. तारा भवाळकर, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. सुनिता लेंगडे

दुपारी ३.३० ते ५.०० कविसंमेलन

कविसंमेलनाध्यक्ष : प्रा. शैला सायनाकर

सहभाग : निलांबरी कुलकर्णी, निलम माणगावे, स्वाती पवार-शिंदे, वासंती मेरू आणि नवोदित कवी

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या इस्लामपूर शाखेने एक संकल्प सोडला आहे. प्रत्येक महिन्यातून किमान दोन कार्यक्रमाच्या निमित्ताने एकत्र येऊन विधायक स्वरूपाच्या सहित्यिक गप्पा कराव्यात. असे तिचे प्रयत्न आहेत. राजारामबापू ज्ञानप्रबोधिनीचे कार्यवाह प्रा. शामराव पाटील, म. सा. प.चे अध्यक्ष प्राचार्य शरद भोसले, कार्याध्यक्ष प्रा. दशरथ पाटील, म. सा. प., पुणे, येथील कार्यकारिणीवर निवडून गेलेल्या सांगली जिल्ह्याच्या प्रतिनिधी प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे, डॉ. मंगल कोकाटे, सौ. वृषाली आफळे, राजा किणीकर, श्री. धोंडीराम सलगर, सदानंद पाटील आणि सर्व सदस्यांच्या अखंड परिश्रमामुळे कार्यक्रमाची ही सलगता अखंड आहे.

**श्री. शामराव पाटील,**
कार्याध्यक्ष, इस्लामपूर शाखा.

**अंबरनाथ शाखा**

**२६ मार्च २००२ : कै. भाऊसाहेब परांजपे स्मृति व्याख्यानमाला :**

सुर्योदय सोसायटी, अंबरनाथच्या आर्थिक सहकार्याने शाखेने एक पाच दिवसीय व्याख्यानमाला आयोजित केली. गोदातटीचे वैभवलेणे, प्रतिष्ठान - डॉ. ब्रह्मानंद देशपांडे, एका जनार्दनी शरण, गाभाऱ्याबाहेरील निरांजने, संत साहित्यातील जीवनयोग - डॉ. यशवंत पाठक यांची २ व्याख्याने, आतंकवादाचा जनक - पाकिस्तान - मुजफ्फर हुसेन अशी व्याख्याने झाली. सुर्योदय सोसायटीचे संस्थापक कै. भाऊसाहेब परांजपे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ह्या व्याख्यानमालेचे आयोजन होते. अंबरनाथकरांनी या व्याख्यानमालेचे जोरदार स्वागत केले. 'सुर्योदय'चा मोठा हॉलही अपुरा ठरला. ही व्याख्यानमाला दरवर्षी आयोजित करण्याचा मानस आहे.

**३१ मार्च २००२ :** म. सा. प.च्या सदस्या सौ. शशिकला टाकळकर यांच्या 'सवंगडी' या बालकथासंग्रहाचे प्रकाशन डॉ. विजया वाड यांच्या हस्ते संपन्न झाले. या कार्यक्रमाचे आयोजन शाखेने केले तर खर्च टाकळकर कुटुंबियांनी केला.

व्यासपीठावर सुंदर नक्षीकाम केलेली रंगीबेरंगी हंडी बांधलेली, छोट्या बालगोपालांनी कृष्ण आणि त्याचे सवंगडी यांचे पोशाख धारण केलेले. कृष्णाने हंडी फोडली आणि 'सवंगडी कृष्णकथांचा संग्रह आणि चॉकलेटस् रंगमंचावर विखुरली. एक आगळावेगळा प्रकाशन सोहळा. डॉ. विजया वाड आणि साऱ्या रसिकांनी प्रचंड दाद दिली. हा कार्यक्रमही रसिकांच्या मनात दीर्घकाळ रेंगाळत राहिला.

म. सा. प. अंबरनाथ आणि रसिक यांचं एक जिव्हाळ्याचं नातं या अनेकविध कार्यक्रमांतून आकारलं. 'आता पुढला कार्यक्रम कधी?' असे सतत कुतूहलाचे प्रश्न येतात. हेच शाखेचे बळ. या सर्व कार्यक्रमांत कार्यकारिणीचे सदस्य विशेषत: पूर्वा अष्टपुत्रे, हरिश्चंद्र खळे, प्रशांत असलेकर, राजेश गोखले, महेंद्र पाटील इत्यादींचा उत्स्फूर्त सहभाग असतो. अध्यक्ष श्री. अरुण मैड यांचे मार्गदर्शन, कामाची शिस्तबद्ध पद्धती, सतत संपर्क, उपक्रमशीलता, साहित्याची नेमकी जाण व कार्यकर्त्यांची त्यांना मिळणारी साथ यामुळे शाखेची वाटचाल चांगली समाधानकारक आहे.

**प्रा. रेखा मैड,** कार्याध्यक्ष, अंबरनाथ शाखा.

■



अनुक्रमणिका







## स्वागत

### मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई यांची प्रकाशने

**गहिरे पाणी :** रत्नाकर मतकरी.
**पीपी लांग स्टुम्फि भाग १ ला :** मूळ लेखक आस्ट्रीड लिंडग्रेन, अनुवाद उमा झिमरमन व विमल मोरे.
**BEHIND THE MASK :** सुभाष मुंजे, अनुवाद श्यामला वनारसे.
**चल रे भोपळ्या ! आणि हंडाभर मोहरा :** भारत सासणे.
**वाटेवरले सोबती :** विजय पाडळकर.
**द फ्रन्टलाईन स्टोरी :** अनंत सामंत.
**सूर-संवाद :** मूळ लेखक अतनू चक्रवर्ती, अनुवाद विलास गिते.

**चौखुर :** विलासदत्त राऊत, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
**जागतिकीकरण शाप नव्हे वरदान ! :** डॉ. मुकुंदराव गायकवाड, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
**रोख-ठोक :** विवेकानंद मोरे, सुयश प्रकाशन, नवी सांगवी.
**मराठी गझल संग्रह 'आभाळ पंख' :** वा. न. सरदेसाई, इंद्रनील प्रकाशन, मुंबई.
**भारतीय संप्रदाय (खंड ३ रा) :** डॉ. शंकर अभ्यंकर, आदित्य प्रतिष्ठान, पुणे.
**उमदा लेखक उमदा माणूस :** संपादक अरुणा ढेरे, अभिजित प्रकाशन, पुणे.
**न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे :** म. श्री. दीक्षित, शिव पब्लिकेशन, पुणे.
**गुलमोहर :** विजय कुलकर्णी, राजश्री प्रकाशन, पुणे.
**मनमाधवी :** माधवी पटवर्धन, नीहारा प्रकाशन, पुणे.
**तुझ्यासाठी :** जोगिंदर कौर महाजन, जगजीतसिंग महाजन प्रकाशन.
**गुलाबाचा राजवाडा :** सायली फडके, सुमंगल प्रेस प्रा. लि., मुंबई.
**भारतीय संगीत स्वरूप आणि प्रयोजन :** कृष्णचंद्र ज्ञाते, मौज प्रकाशन, मुंबई.
**काही साहित्यिक व्यक्ती :** अनंत कदम, सप्तर्षी प्रकाशन, वसई.
**आपण गाफील राहिलो तर :** सर्जेराव चव्हाण, संत गाडगेमहाराज प्रकाशन, बुलढाणा.
**परस्पर पंचनामा :** सौ. वसुंधरा हुईलगोळ, दिलीपराज प्रकाशन, पुणे.
**सारे छान छोटे :** सौ. वसुंधरा हुईलगोळ, दिलीपराज प्रकाशन, पुणे.

### अस्मिता प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने

**अशी घरं अशी माणसं :** मंगला गोडबोले.
**जंतर मंतर :** डॉ. बाळ फोंडके
**सार्वजनिक ग्रंथालय संगणकीकरण :** डॉ. रा. शं. नालेकर.
**शोभायात्रा :** दिगंबर जैन.
**ललित रंग :** अनंत मनोहर.
**भगवान श्रीकृष्ण :** उषा परांडे.

**उणापुरा गावठी :** भगवान जाधव, आरती प्रकाशन, डोंबिवली.
**युग साहित्य (डॉ. यशवंत मनोहर) :** संपादक चंद्रकांत नगराळे, सुजाता नगराळे, श्रेयस प्रकाशन, वरोरा.
**अभिषेक :** संपादक श्रेणिक अन्सदाते, सुमेरु प्रकाशन, डोंबिवली.
**काही विज्ञानप्रसार आणि भाषाविचार :** म. ना. गोगटे, प्रकाशक स्वत: लेखक.
**एका प्राचार्याची झुंज आणि झेप :** मा. गो. माळी, आशा प्रकाशन, गारगोटी.
**महात्मा फुले :** मा. गो. माळी, जनसाहित्य परिषद, अमरावती.
**मॅट्रिक पुढारी :** मिरदेव गायकवाड, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे.
**देह संमेलन :** मिरदेव गायकवाड, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे.
**अंतर्वेध :** मीनल वाठे, सुयश प्रकाशन, नवी सांगवी.
**लाडके सूनबाई :** रचना-वि. ज. शाळीग्राम, प्रकाशक : आनंद जगदीश शाळीग्राम, कोल्हापूर.
**दाह :** भालचंद्र त्रिवेदी, प्रकाशक हर्षा त्रिवेदी, निपाणी.
**हे भारत देशा ! :** भारत सातपुते, प्रकाशक सौ. सुषमा भारत सातपुते, गातेगाव, लातूर.
**तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर :** सायमन मार्टिन, सहयोग प्रकाशन, वसई.

**साहित्य अकादमी, मुंबई यांची प्रकाशने**

**भारतीय साहित्याचे निर्माते विठ्ठल सीताराम गुर्जर :** महादेव नामदेव अदवंत.
**आरोग्य-निकेतन :** मूळ लेखक : ताराशंकर बंदोपाध्याय, अनुवाद : श्रीपाद जोशी.
**बाणभट्टाची आत्मकथा :** हजारीप्रसाद द्विवेदी, अनुवाद : र. श. केळकर.
**सआदत हसन मंटो :** मूळ लेखक-वारिस अल्वा, अनु.- विश्वास वसेकर.
**चाफा :** मूळ लेखक-चंद्रशेखर कंबार, अनुवाद-संध्या देशपांडे.
**जीवी :** मूळ लेखक-पन्नालाल पटेल, अनुवाद-आनंदीबाई शर्के.
**मातीचा माणूस :** मूळ लेखक-कलिंदीचरण पाणिग्राही, अनुवाद वामन कृष्ण चोरघडे.
**देहवाली साहित्य :** संकलन आणि मराठी अनुवाद चामुलाल राठवा.
**सात पाऊले आकाशी :** कुन्दतिका कापडिया, अनुवादिका उषा पुरोहित.
**आरण्यक :** विभूतिभूषण बन्द्योपाध्याय, अनुवाद-शंकर बाळाजी शास्त्री.
**शौर्यगाथा सौराष्ट्राची :** मूळ लेखक झबेरचंद मेघाणी, अनुवादिका-अंजनी नरवणे.
**मौखिकता आणि लोकसाहित्य :** संपादक-मधुकर वाकोडे / सुषमा करोगल.
**अण्णाभाऊ साठे :** मूळ लेखक-बजरंग कोरडे, अनुवाद-विलास गिते.

**मौज प्रकाशन, मुंबई यांची प्रकाशने**

**जीवनायन :** यशवंत मनोहर.
**अवकाश :** सानिया.
**मेक्सिकोपर्व :** मीना प्रभु.
**सोव्हिएत साम्राज्याचा उदय अणि अस्त :** गोविंद तळवलकर.

साहित्य विचार आणि सौंदर्यशास्त्र : रा. भा. पाटणकर.
**काळी माती निळी नाती :** मधुकर वाकोडे, साहित्य प्रसार केंद्र, नागपूर.
**अनिवार :** सुजाता लोहकरे, सुविद्या प्रकाशन, सोलापूर.
**'कोसला'कारांची सतरा वर्षे :** श. रा. राणे, सुविद्या प्रकाशन, पुणे.
**एकविसाव्या शतकातील शिक्षणापुढील आव्हाने :** संपा. भानू चौधरी, सुविद्या प्रकाशन, पुणे.
**काव्य माधवी :** शुभा बेहेरे, मृणाल आशापुरक गोसावी, चिंचवड, पुणे.
**एक सावली कडुलिंबाची :** केशव बोबडे, सोनल प्रकाशन, दर्यापूर (अमरावती).
**हर झॉग :** मूळ लेखक-सॉलंबेलो, स्वैर अनु. छाया महाजन, साहित्यसेवा प्रकाशन, औरंगाबाद.
**कलेचे कातडे :** आनंद यादव, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
**किल्लीची गुरुकिल्ली :** शकुंतला फडणीस, ज्योत्स्ना प्रकाशन, पुणे.
**आशय आयुष्याचा :** वीणा मालशे, कलम प्रकाशन, पुणे.
**अप्रिय पण :** शेषराव मोरे, अतुल बुक एजन्सी, नांदेड.
**मुस्लिम मनाचा शोध :** शेषराव मोरे, संगत प्रकाशन, नांदेड.
**हसत जगावं :** डॉ. रमा मराठे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
**हास्यवेला वेणा :** मधुवंती सप्रे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे.
**भारतायन :** गंधाली कोठाडिया, डॉ. अनिल गांधी प्रकाशन, पुणे.
**जादूची अंगठी आणि इतर कथा :** सीमा बापट, ज्ञानराज प्रकाशन, पुणे.
**समिधा :** साधना आमटे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.
**माझ्या आयुष्याच्या गोष्टी :** गिरिजा कीर, कै. हरि नारायण आपटे प्रकाशन संस्था (नियोजित), दहिसर, मुंबई.
**संस्कृतीच्या पाऊलखुणा :** द. ता. भोसले, पद्मगंधा प्रकाशन, पुणे.

**साप्ताहिक विवेक, हिंदुस्थान प्रकाशन संस्था यांची प्रकाशने**

**प्रल्हाद उवाच :** संपादक-चित्तरंजन द. पंडित.
**संघर्ष महामानवाचा :** रमेश पतंगे.
**राष्ट्रसाधना (खंड १ व २) :** संपादक-रमेश पतंगे.
**वि. स. खांडेकर-सचित्र चरित्रपट :** जया दडकर, देशमुख आणि कंपनी, पुणे.
**पूर्ण विरामानंतर :** राही अनिल बर्वे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.
**पदरी आलं आभाळ :** विनीता ऐनापुरे, अनंत प्रकाशन, कल्याण.

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

**बिटस्, बाईटस् आणि तुम्ही :** दीपक शिकारपूर.
**इनामदारी :** ना. सं. इनामदार.
**निसर्गाच्या 'आशा' वाटा :** प्रकाश गोळे.
**Speak Good English :** विलास भट, किशोर भिडे
**गुरू-शिष्य कला-बालगंधर्वांची कला व हरिभाऊ देशपांडे यांचे चरित्र :** अनिल हरिभाऊ

देशपांडे, मे. शुभम् प्रकाशन, पुणे.
**शेषप्रश्न :** श्रीरंग विष्णू जोशी, आर्यता प्रकाशन, सांगली.
**मागे फिरा पतंगांनो :** नारायणराव मुंढे, सत्संग प्रकाशन, गेवराई.
**अनुभूती :** स्वाती शहा, नीळकंठ प्रकाशन, पुणे.
**लगीन :** संजीव गिरासे, राजश्री प्रकाशन, पुणे.
**धुनी गझलांची :** दीपक करंदीकर, गौरा प्रकाशन, पुणे.
**श्री शिवछत्रपती विजय :** विभा वा. दातार, साहित्य कला यात्री प्रकाशन, पुणे.
**चौतिशीपर्यंतच्या कविता :** हेमंत दिवटे, प्रभात प्रकाशन, मुंबई.
**तू :** अतिश सुरेश सोसे, दीपाली प्रकाशन, कान-शिवणी, ता. जि. अकोला.
**समीक्षा 'सद्य:स्थित लोकशाहीवर विचारमंथन' :** डी. बी. शिरसाठ, रौनक प्रकाशन, श्रीरामपूर.
**मृगजळी केले स्नान :** रंगा मराठे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे.
**तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर :** सायमन मार्टीन, सहयोग प्रकाशन, भूईगाव, वसई.

**महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, यांची प्रकाशने**

**महाराष्ट्राचे शिल्पकार एस्. एम्. जोशी :** ग. प्र. प्रधान.
**स्वामी रामानंद तीर्थ यांची दैनंदिनी :** संपादक - प्रा. वि. पां. देऊळगावकर.
**ग. त्र्यं. माडखोलकर व्यक्तित्व आणि कर्तृत्व :** संपादक - डॉ. वि. स. जोग, प्रा. राम शेवाळकर, सौ. उमा माडखोलकर, प्रा. वैकुंठ इंगळे.

**स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, यांची प्रकाशने**

**पाणसावल्यांची वसाहत :** वसंत नरहर फेणे.
**साहित्य प्रत्यय :** भास्कर लक्ष्मण भोळे.
**आणि तोपर्यंत :** चंद्रकांत पाटील.
**मूल्यशोध :** मोतीराम कटारे.
**साहित्याचे परीघ :** निशिकांत ठकार.
**समीक्षेतील नव्या संकल्पना :** संपादक - मनोहर जाधव.

**स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, यांची प्रकाशने**

**निवडणूक कशी लढवावी :** डॉ. य. ग. शिंदे.
**पुणे महानगरपालिका निवडणूक :** डॉ. य. ग. शिंदे.
**पुणे जिल्हापरिषद निवडणूक :** डॉ. य. ग. शिंदे.
**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका निवडणूक :** डॉ. य. ग. शिंदे.
**प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास :** प्र. न. जोशी.
**अस्मिता आणि अस्तित्व :** संजय संगवई.
**अद्‌भुत किमया :** निरंजन घाटे, शिव पब्लिकेशन्स, पुणे.
**आपली पृथ्वी भाग १ व २ :** प्रभाकर सोवनी, शिव पब्लिकेशन्स, पुणे.
**साहित्यिक खसखस :** अरुण नासिककर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

## श्रीविद्या प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने

**युगप्रवर्तक बाळशास्त्री जांभेकर काळ आणि कर्तृत्व :** नीला उपाध्ये

**संगणक युगातील आरोग्य :** मंदार राजाराम जोशी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

**एक क्रांतीकारी महानंदा :** एस. आर. डोंबे, लोकसाहित्य प्रकाशन, औरंगाबाद.

**वैभव पेशवेकालीन वाड्यांचे :** मंदा खांडगे, साई प्रकाशन, पुणे.

**शूर झाले वीर :** प्रशांत गौतम, साकेत प्रकाशन प्रा. लि., औरंगाबाद.

**श्रेष्ठ भारतीय बालकथा :** संपादक - बाबा भांड, साकेत प्रकाशन प्रा. लि., औरंगाबाद.

## मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, यांची प्रकाशने

**रंग अंतरंगातले :** उषा शेठ,

**महाराष्ट्राबाहेरील मराठी २००१ :** संपादक - निरंजन उजगरे, संपादन सहाय्य : अनुपमा उजगरे.

**स्पर्श परिसाचा एका दिग्दर्शकाचा :** सुनंदा नंदकुमार रावते.

**रंगरूपदर्शन :** मधुकर तोरडमल.

**सौंदर्य सम्राज्ञींच्या यशाची रहस्ये :** संपादन - जयश्री दि. पाठक.

**यशोधारा :** शांतीलाल भंडारी, प्रसाद प्रकाशन, पुणे.

**भगवान महावीर :** शांतीलाल भंडारी, चिरायु प्रकाशन, पुणे.

**झंकार फुलांचा :** दि. आ. कुलकर्णी, अंजली दि. कुलकर्णी प्रकाशन, पुणे.

**प्रश्न आणि प्रश्न :** अनिल अवचट, मौज प्रकाशन गृह, मुंबई.

**झळाळ :** वासंती मुझुमदार, मौज प्रकाशन गृह, मुंबई.

श्रीयुत बाळकृष्ण जगन्नाथ कुलकर्णी यांनी (भावार्थ दीपिका) सुलभ भावार्थ ज्ञानेश्वरी खंड १-२-३ यांची प्रत्येकी एक प्रत ग्रंथालयास सप्रेम भेट म्हणून दिले आहेत. (धन्यवाद).

## मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, यांची प्रकाशने

**द लास्ट डॉन :** मूळ लेखक - मारिओ पुझो, अनुवाद - अनिल काळे.

**गढुळं :** रवींद्र बागडे.

**कांचनगंगा :** माधवी देसाई.

**अंधाराचे वारसदार :** दादासाहेब मोरे.

**वडवाई :** अंजली नरवणे.

**भूमिकन्या :** आनंद यादव.

**चाकाची खुर्ची :** नसीमा हुरजूक.

**व्हर्च्युअल रिॲलिटी :** बाळ फोंडके.

**किनारा :** माधवी देसाई.

**असं म्हणू नकोस :** माधवी देसाई.

**रिवणावायली मुंगी :** राजन गवस.

**शोध सुखाचा :** संजीवनी वाडेकर.

**अवती भवती :** वसुधा पाटील.
**सुखशांतीच्या शोधात :** अंजली ठकार.
**अमृतधारा :** संपादक - निर्मलकुमार फडकुले, द. ता. भोसले.
**।।स्वामी।। एक शोध :** संपादन व प्रस्तावना - मीरा घांडगे.
**१९६० नंतरची सामाजिक स्थिती आणि साहित्यातील नवे प्रवाह :** आनंद यादव.
**अक्षय सुखाचे वरदान रेकी :** नीलम दोशी.
**करोडोंचे सामान्यज्ञान :** सुनीता दांडेकर.
**कोटीमोलाची पश्नोत्तरे :** उमा खरे.
**माझं कुवारपण (आमार मेयेबेला) :** मूळ लेखिका - तसलिमा नाससिन, अनुवाद मृणालिनी गडकरी.
**फुलांचे बोल :** मूळ लेखिका - आन्ना सावसे, अनुवाद - सुनिती देशपांडे.
**रावीपार :** मूळ लेखक - गुलजार, अनुवाद - विजय पाडळकर, मोहन वेल्हाळ.
**फिआ इज द की :** मूळ लेखक - ॲलिस्टर मॅक्लीन, अनुवाद - अशोक पाध्ये.
**डॉक्टर झिवागो :** मूळ लेखक - बोरीस पास्तर नाका, अनुवाद - आशा कर्दळे.
**द मिरॅकल :** मूळ लेखक -आयर्विंग वॅलेस, अनुवाद - जयवंत चुनेकर.
**क्रोमोझोम - ६ :** मूळ लेखक - डॉ. रॉबीन कुक, अनुवाद - वैशाली जोशी.
**कारगिल नामा :** अनुवाद - नारायण आवटी.
**साक्षात्काराची देणगी :** मूळ लेखक - ओशो, अनुवाद - प्रज्ञा ओक.
**नवी पहाट :** मूळ लेखक - ओशो, अनुवाद - प्रज्ञा ओक.
**द अदर साईड ऑफ सायलेन्स (हिंदुस्थानच्या फाळणीतील व्यथा) :**
मूळ लेखक - उर्वशी बुटालिया, अनुवाद - नारायण प्रल्हाद आवटी.
**बिग इगोज स्मॉल मेन :** मूळ लेखक - राम जेठमलानी, अनुवाद - माधव मोर्डेकर.
**ख्यातनाम इतिहासकार :** मूळ लेखक - अरुण शौरी, अनुवाद - सुधा नरवणे.
**टाईमपास :** संपादन - पूजा वेदी-इब्राहिम, अनुवाद - सुप्रिया वकील.
**मजल दरमजल :** मूळ लेखक - किरण बेदी सहाय्यक सरोज वशिष्ठ, अनुवाद - भारती पांडे.
**ब्लास्फेमी :** मूळ लेखक - तेहमिना दुर्रानी, अनुवाद - भारती पांडे.
**एका ज्योतिषाची डायरी :** जवाहर मुथा, हेमंत प्रकाशन, अहमदनगर.

**मराठी लघुकथा :** संपादक - भालचंद्र फडके, नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, मुंबई.
**अजब तुझे सरकार :** मूळ लेखक - प्रभाकर देवधर, अनुवाद - अनुराधा गानू.
**हसती दंत :** हर्षद सरपोतदार, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.
**ओंजळीतले मोती :** भाग्यश्री कुलकर्णी स्वत: लेखिका प्रकाशक, धुळे.
**निर्झर :** द. ना. प्रभु, लाटकर प्रकाशन, कोल्हापूर.
**लोकसंख्येमुळे उडाला स्वर्गातही गोंधळ :** ब्रिजमोहन दायमा, विद्याभारती प्रकाशन, लातुर.











**मराठी बालवाङ्मय स्वरूप आणि अपेक्षा :** सुलभा शहा, लीलावती प्रकाशन, धुळे.
**स्वयंसिद्धा :** वर्षा माडगूळकर, एम. एस. नाईक प्रकाशन, पुणे.
**टाईम प्लीज :** नारायण चारी, ग्रंथ विशेष प्रतिष्ठान, सातारा.
**निर्णय :** अशोक गोडबोले, तोरणा प्रकाशन, पुणे.
**वेदना :** अशोक गोडबोले, निशीराज पब्लिकेशन, पुणे.

### देशमुख आणि कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., पुणे, यांची प्रकाशने

**अंतःपुरुष :** बाबू बिराजदार.
**गाथा सप्तपदी :** राजेंद्र मेलोसे.
**झेडवाईचे दिवे :** प्रतिमा इंगोले.

### राजहंस प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने

**एक होती बाय :** मूळ लेखक - सुरेन आपटे, अनुवाद - विनया खडपेकर.
**गाथा मुहूर्तमेढीची :** वि. गो. कुलकर्णी.
**महाराणी व्हिक्टोरिया :** आशा कर्दळे.
**जन्मलेल्या प्रत्येकाला :** प्रिया तेंडुलकर.
**बोर्डरुम :** अच्युत गोडबोले.

### साकेत प्रकाशन प्रा. लि., औरंगाबाद, यांची प्रकाशने

**आंधळी कोशिंबीर :** भालचंद्र देशपांडे.
**वारुळधर्म :** सुधाकर जोशी.
**सीताफळ बागेची गोष्ट :** ना. धो. महानोर.
**चार मित्र :** बाबा भांड.
**सशाची चतुराई :** बाबा भांड.
**गोष्टीरूप लालबहादूर :** शंकर कऱ्हाडे.
**गोष्टीरूप वासुदेव बळवंत फडके :** शंकर कऱ्हाडे.
**अध्यात्माकडून अमेरिकेकडे :** माधवी आपटे, घरकुल प्रकाशन, पुणे.
**परदेशी पाकोळ्या :** माधवी आपटे, घरकुल प्रकाशन, पुणे.

### कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने

**गोकुली :** प्रफुल्लता जाधव.
**फुलांना घर नसतं :** उषादेवी विजय कोल्हटकर.
**प्रकाशयात्री जयप्रकाश :** चंद्रकांत पाटगावकर.
**कीटक निरीक्षकांच्या सोबत :** पुरुषोत्तम जोशी.

**प्रेमाचा शब्द :** गोविंद कुलकर्णी, प्रतिभा प्रकाशन, औरंगावाद.
**डॉ. श्री. र. कावळे : व्यक्ती आणि विचार** श्री. अनंत लक्ष्मण जोशी यांच्याकडून भेट.
**घर हीच प्रयोगशाळा :** रघुवीर अनंत साखवळकर, दिलीपराज प्रकाशन प्रा. लि., पुणे.

**श्रीवामनराज प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने**

**सारस्वताची पालवी :** शिरीष शांताराम कवडे.
**इंदिराबाईंची गाणी :** संपादक - शांताराम कवडे.
**होआवें आसन ऐसे :** शिरीष शांताराम कवडे.
**मुंगी उडाली आकाशी :** शकुंतला जयंत आगटे.
**ईश्वरभक्तीची आवश्यकता :** कै. श्री. म त्रिं. पुरंदरे.
**प्रतिबिंब :** सीमा मराठे, प्रकाशन उन्मेष प्रकाशन, पुणे.
**प्राक्तन :** सीमा मराठे, प्रकाशन उन्मेष प्रकाशन, पुणे.
**भाषण व नाट्यविषयक विचार :** अशोक दा रानडे, पॉप्युलय प्रकाशन प्रा. लि., मुंबई.
**रस्ते :** गोविंद पुरुषोत्तम देशपांडे, पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., मुंवई.
**आधुनिक मणिपुरी कविता :** भगवान ठग, महाराष्ट्र अनुवाद परिषद प्रकाशन, बुलढाणा.
**सहज सुचलं म्हणून :** विश्वजित तुळजापूरकर, सोनल प्रकाशन, दर्यापूर.
**शब्द भेटण्याच्या वयातच :** राजेंद्र दास, सुविद्या प्रकाशन, सोलापूर.
**पंढरीची वारी :** सूर्यकांत मालुसरे, एकनाथ पाटील प्रकाशन, मुंबई.

---

**नवे आजीव सदस्य**

(यादी मागील अंकावरून पुढे चालू)

देशपांडे विष्णु वामन, ठाणे
कुलकर्णी आशालता मनोहर, ठाणे
मांडके मधुकर विश्वनाथ, पुणे
हुंडेकर माधव वसंत, पुणे
बेटावदकर वर्षा रामकृष्ण, पुणे
साठे निळकंड जेकब, हडपसर
गोकुळ नागेश पंडितराव, कोन
पातकर घन:श्याम, भिवंडी
जगताप विजया, भिवंडी
भालेराव सुहासिनी सुधाकर, भिवंडी
मुळे सूर्यकांत हनुमंत, पुणे
कानिटकर संजय विश्वनाथ, डोंबिवली
देशपांडे विनीता वसंत, डोंबिवली
बर्डे सुधीर गणेश, डोंबिवली
डांगी राजेश र., डोंबिवली
जगदाळे वर्षा संदेश, डोंबिवली
तारे मानसी मिलिंद, डोंबिवली
कोल्हटकर उल्हास विश्वनाथ, डोंबिवली
दिवाण राजेंद्र उर्फ राजाभाऊ ज., डोंबिवली
अलशी राजन, भिवंडी
लाहोटी पुष्पा, भिवंडी
टेकसिंग विजया गो., पुणे
वाघमारे अविनाश तुकाराम, पुणे
जोशी वसंत केशव, पुणे

---

अनुक्रमणिका

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपादक : **प्रा. रा. श्री. जोग**

| | |
|---|---|
| खंड १ ला | रु. ४००/- |
| खंड २ रा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३००/- |
| खंड ३ रा | रु. ३५०/- |
| खंड ४ था | रु. ४००/- |
| खंड ५ वा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३५०/- |
| खंड ६ वा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३००/- |
| | रु. ३,१५०/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनीही रु. २५००/- आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस्. टी. पार्सलने पाठवू.**

*(वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपाल खर्च वेगळा.)*

---

*मराठी साहित्यसृष्टीतील अभिनव उपक्रम म. सा. परिषदेने सिद्ध केलेला अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास खंड*

**A HISTORY OF MODERN MARATHI LITERATURE - VOL. I**

■

संपादक

**श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर**

■

पृष्ठसंख्या ३५०, किंमत रु. ४००/- ग्रंथ विक्रेत्यांना भरपूर सूट
वैयक्तिक ग्राहकांनीही सवलतीसाठी संपर्क साधावा.

या ग्रंथाचा दुसरा खंड यथावकाश प्रसिद्ध होत आहे.

■

: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी : ४४७५९६३.

Maharashtra Sahitya Patrika Quarterly April-May-June 2002
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

प्रति,

प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका